ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला रत्न १७ वें.

श्रीशंकरानन्दप्रणीत कौषीतकिसारार्थप्रकाशरूप

# आत्मपुराण.

अध्याय २ रा.

( अन्वय व सविस्तर अर्थ यांसह )

संपादक व प्रकाशक.

आचार्यभक्त—विष्णु वामन बापटशास्त्री.

पुणें सदाशिव पेठ, २४१

श्रावण कृ. ८ शके १८४१ सिद्धार्थीनाम संवत्सरे,

ता. १९–८–१९.

किंमत १। रुपया.

ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला रत्न १७ वें.

श्रीशंकरानन्दप्रणीत कौषीतकिसारार्थप्रकाशरूप

# ात्मपुराण.

## अध्याय २ रा.

( अन्वय व सविस्तर अर्थ यांसह )


ंपादक व प्रकाशक.

आचार्यभक्त—विष्णु वामन बापटशास्त्री.

पुणें सदाशिव पेठ, २४१



श्रावण कृ. ८ शके १८४१ सिद्धार्थीनाम संवत्सरे,

ता. १९-८-१९

किंमत १। रुपया.

# प्रस्तावना.

श्रीमदात्मपुराणाचा हा दुसरा अध्याय आज आम्ही प्रसिद्ध करून तो वाचकांस सप्रेम अर्पण करीत आहों. आत्मपुराणाच्या पहिल्या अध्यायांत श्रीशंकरानंदांनीं ऋग्वेदाच्या ऐतरेयोपनिषदाचें सविस्तर व्याख्यान केलें आहे व तें सुमारें सहा वर्षांपूर्वी आम्ही म. वि. ग्रं. रत्नमालेंतून ( रत्न ३ रें ) प्रसिद्ध केलें आहे. त्यानंतर सहाच महिन्यांनीं म्ह० सुमारें साडे पांच वर्षांपूर्वी आत्मपुराणाचा तैत्तिरीयोपनिषदर्थप्रकाशरूप दहावा अध्याय प्रसिद्ध केला. पुढें अगोदर भाष्यार्थासह दशोपनिषदांचेंच प्रकाशन करावें व नंतर क्रमानें आत्मपुराण व अनुभूतिप्रकाश हे ग्रंथ संपवावे अशा पुष्कळांच्या सूचना आल्यामुळें आम्ही प्रथम दशोपनिषद्भाष्यार्थालाच आरंभ केला; व त्या मोठ्या कामांतून पार पडेपर्यंत 'जन्मान्तराणीव दशान्तराणि' या न्यायानें अनेक प्रतिकूल दशांचा अनुभव घेतला. आमचा 'दशोपनिषद्भाष्यार्थसमूह' आतां वाचकांच्या पुढें आहेच. तेव्हां त्याविषयीं अधिक कांहीं लिहिण्याची आवश्यकता नाहीं. तथापि त्याला आमच्या पूर्वी अनेकांनीं आरंभ केलेला असून जे सर्वांच्या अगोदर आम्हीच त्या मोठ्या कामांतून पार पडलों, असें मोठ्या आनंदानें व सात्त्विक अभिमानानें म्हणण्याचा सुयोग ईश्वरानें आम्हांला आणून दिला, याबद्दल त्याच्या विषयीं जितकी कृतज्ञता व्यक्त करावी तितकी थोडीच आहे. काल अनुकूल असता तर आम्ही या वेळेपर्यंत अंगीकृत कार्यांत याहीपेक्षां अधिक मजल मारली असती. असो;

आतां अगोदर आत्मपुराण संपवून नंतर अनुभूतिप्रकाशाचे राहिलेले अध्याय प्रसिद्ध करण्याचा विचार आहे. आत्मपुराणाची योग्यता केवढी आहे, हें त्याचा एकेक अध्याय वाचल्यावर वाचकांच्या ध्यानांत अनायासानेंच येईल. या दुसऱ्या अध्यायांत ग्रंथकार श्रीशंकरानन्दसरस्वती यांनीं ऋग्वेदाच्याच कौषीतकी शाखेच्या ब्राह्मणारण्यकोपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायाचें व्याख्यान केलें आहे. कौषीतकिब्राह्मणारण्यकाचे एकंदर नऊ अध्याय आहेत. त्यांतील शेवटच्या चार अध्यायांस उपनिषद् म्हणतात. अर्थात् प्रस्तुत अध्याय हा कौषीतकी उपनिषदाचा तिसरा अध्याय असून कौ. ब्राह्मणारण्यकाच्या क्रमानें आठवा आहे. पहिल्या पांच अध्यायांत चित्तशुद्धिकारक कर्में व कर्मांगावबद्ध उपासना सांगितल्या आहेत. सहाव्या म्ह० उपनिषदाच्या पहिल्या अध्यायांत पर्यंकविद्या सांगितली आहे. शेवटीं दक्षिणायन व उत्तरायण मार्गही सांगितले आहेत. दुसऱ्या अध्यायांत प्राणोपासना व प्राणोपासकांना विशिष्ट फळ मिळावें म्हणून बाह्य व आध्यात्मिक

कर्में सांगितलीं आहेत, आणि तिसऱ्या व चवथ्या अध्यायांत आत्मविद्या सांगितली आहे. शंकरानंदांनीं उपनिषदाच्या या चारी अध्यायांवर दीपिका केली आहे. पण आत्मपुराण केवळ आत्मविद्याप्रतिपादकच करण्याचा त्यांचा उद्देश असल्यामुळें त्यांत त्यांनीं पहिल्या दोन अध्यायांचें व्याख्यान केलें नाहीं. तर आत्मपुराणाच्या दुसऱ्या अध्यायांत कौषीतकि उपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायाचें व आत्मपुराणाच्या तिसऱ्या अध्यायांत कौ. उपनिषदाच्या चवथ्या अध्यायाचें व्याख्यान केलें आहे. श्रीविद्यारण्यांनींही आपल्या अनुभूतिप्रकाशाच्या आठव्या व नवव्या अध्यायांत याच दोन अध्यायांचें व्याख्यान केलें आहे. तथापि हें सर्वच उपनिषद् अत्यंत महत्त्वाचें आहे. शारीरक भाष्यांत याचा उल्लेख वारंवार येतो. पहिल्या अध्यायांतील " स एतं देवयानं पन्थानमासाद्य अग्निलोकं आगच्छति स आगच्छति विरजां नदीं तां मनसैवात्येति तत्सुकृतदुष्कृते विधूनुते " हें वाक्य उत्तरमीमांसेच्या तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादाच्या सोळाव्या अधिकरणाचें विषयवाक्य आहे. उत्तरमीमांसेच्या चवथ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादाच्या पहिल्या व दुसऱ्या अधिकरणांचेंही हेंच वाक्य विषयवाक्य आहे. दुसऱ्याही पुष्कळ ठिकाणीं त्याचा असाच वारंवार उल्लेख केलेला आढळतो. या पुस्तकांत ज्याचें वर्णन केलें आहे त्या इंद्र व प्रतर्दन यांच्या संवादांतील ' प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा तं मामायुरमृतमित्युपास्व ' ( पृ. ७१ ) हें वाक्य उत्तरमीमांसेच्या पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादाच्या अकराव्या अधिकरणाचें विषयवाक्य आहे. असाच आणखीं पुष्कळ ठिकाणीं या उपनिषदांतील वाक्यांचा उल्लेख शारीरक भाष्यांत आहे. तथापि खुद्द आचार्यांनीं यावर भाष्य कां नाहीं, कांहीं कळत नाहीं. शंकरानन्द व विद्यारण्य यांनीं आत्मपुराण व अनुभूतिप्रकाश यांत कौषीतकीच्या तिसऱ्या व चवथ्या अध्यायांचेंच व्याख्यान केलें आहे, म्हणजे पहिले दोन अध्याय सोडले आहेत, हें वर सांगितलेंच आहे. छान्दोग्य, बृहदारण्यक यांच्या कर्मांगवद्ध उपासना व केवल उपासना सांगणाऱ्या पहिल्या अध्यायांचेंही व्याख्यान त्यांनीं आत्मपुराण व अनुभूतिप्रकाश यांत केलेलें नाहीं. यावरून केवल ब्रह्मविद्याप्रतिपादक उपनिषद्भागांचेंच व्याख्यान करण्यासाठीं आत्मपुराण व अनुभूतिप्रकाश हे ग्रंथ त्यांच्या कर्त्यांनीं केले आहेत हें उघड होतें. तथापि वर सांगितल्याप्रमाणें कौषीतकि उपनिषदाच्या पहिल्या व दुसऱ्या अध्यायांतील विषयाचाही शारीरकांत विचार केलेला असल्यामुळें आत्मपुराणाच्या तिसऱ्या अध्यायाच्या आरंभीं आम्हीं त्या दोन अध्यायांचेंही मूळासह भाषांतर देणार आहों. तसें केलें म्हणजे ' सार्थ ब्रह्मसूत्र ' किंवा ' वेदान्त दर्शन ' हें दर्शनमालेंतील अखेरचें दर्शन वाचतांना

---

१ म्हणजे त्या अधिकरणांत या वाक्याचा विचार केला आहे.

वाचकांना तो विषय अपरिचित वाटणार नाहीं, व आम्हांलाही त्यांत अधिक वि-स्तार करावा लागणार नाहीं, असो, आतां या उपनिषदांतील प्रतिपाद्य विषयाचें दिग्दर्शन करून ही प्रस्तावना संपवितों.

काठकोपनिषदांत नचिकेत व यम यांचा जसा आत्मविद्येविषयीं सुंदर संवाद आहे तसाच या कौषीतकी उपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायांत प्रतर्दन व इंद्र यांचा संवाद आहे. दिवोदासाचा पुत्र प्रतर्दन काशीदेशाचा राजा होता. तो अतिशय धार्मिक व शूर होता. त्यानें या लोकाच्या सर्व शत्रूंना धर्मयुद्धांत जिंकून इंद्राला जिंकण्यासाठीं स्वर्गलोकीं गमन केलें. त्यानें आपल्या उत्साहानें व पराक्रमानें इंद्राला संतुष्ट केलें. तेव्हां इंद्रानें त्याला ‘ इष्ट वर देतों ’ असें म्हटलें, पण ‘ मनुष्याला अत्यंत हितकर असें जें कांहीं असेल तो वर मला तूंच दे, मी स्वतः कांहीं मागत नाहीं ’ असें जेव्हां प्रतर्दन बोलला तेव्हां इंद्र आपलें सत्यवचन पाळण्यासाठीं ‘ मामेव विजानीहि एतदेवाहं मनुष्याय हिततमं मन्ये ’ ( पृ. २७ ) असें म्हणाला. येथील ‘ मलाच जाण ’ यांतील ‘ मी ’ म्हणजे सशरीर इंद्र ही देवता नसून नित्य ज्ञानस्वरूप आत्मा आहे, असें शारीरकाच्या अ० १ पा० १ अ० ११ यांत मीमांसा करून ठरविलें आहे. अर्थात् ‘ मामेव विजानीहि ’ या वाक्यानें इंद्रानें ‘ आत्मज्ञानच मनुष्याला अत्यंत हितावह आहे, ’ असें सांगितलें, व त्या आत्मज्ञानाकडे मनुष्याची प्रवृत्ति व्हावी, त्याविषयीं त्याच्या मनांत आवड उत्पन्न व्हावी, म्हणून इंद्रानें ‘ मी मोठमोठीं पापेंही केलीं, अनेक क्रूर कर्में करणारे ब्राह्मण, वेदान्तज्ञानशून्य यति इत्यादिकांची हिंसा केली, पण त्यामुळें आत्मज्ञानी असलेल्या माझी कांहीं एक हानि झाली नाहीं. त्याचप्रमाणें मला म्ह० आत्म्याला जो साक्षात् जाणतो त्या दुसऱ्याही कोणाची महापातकांच्या योगानेंही कांहींएक हानि होत नाहीं. त्याच्या मुखावरील कांति नाहींशी होत नाहीं. ’ अशी त्याची स्तुतिही केली आहे. हा अर्थवाद आहे, व तो भूतार्थवाद आहे. म्ह० त्यांत खरा तत्त्वार्थ सांगि-तला आहे. आत्मज्ञानानें ज्याची कर्तृत्व-भोक्तृत्वबुद्धि नष्ट झाली आहे, त्याच्या-कडून वरील पापें अभिमानपूर्वक होणें शक्यच नाहीं, पण तीं प्रारब्धदोषामुळें जरी कदाचित् झालीं तरी तीं साहंकार व फलाभिलाषानें घडत नसल्यामुळें त्यांनीं तो आत्मा लिप्त होत नाहीं. श्रीगीतेंतील ‘ यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वापि स इमाँल्लोकान् न हन्ति न निबध्यते ’ या वचनांतही वरील भूतार्थवादच सांगितला आहे.

असो; याप्रमाणें आत्मज्ञान हेंच मनुष्याला हिततम आहे असें सांगून इंद्रानें ‘ प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा० ’ ( पृ. ७१ ) या वाक्यानें आत्म्याचें स्वरूप सांगितलें; व आत्मसाक्षात्कार होईपर्यंत ‘ मी प्राण प्रज्ञात्मा आयु अमृत इंद्र आहें ’ अशी उपा-सना-निरंतर चिंतन करण्याचा उपदेश केला आहे. पुढें प्राणच आयु व अमृत

कसा हें सांगून प्राणात्मरूप इंद्राचें ' आयु व अमृत ' या गुणानें विशिष्ट असें उपासन जो करितो त्याला पूर्ण-शतसंवत्सर आयुष्य प्राप्त होतें, असें हष्ट फलही सांगितलें आहे. ( पृ. ७२ )

इंद्रानें सांगितलेला हा प्राणशब्द ऐकून प्रतर्दनानें पूर्वीं कांहीं मुनींच्या तोंडून प्राण व इंद्रियें यांचें एकत्व आहे, असें जें ऐकलें होतें त्याचें त्याला स्मरण झालें; व त्यानें त्या मुनींच्या म्हणण्याचाच अनुवाद केला. तो असा-" इंद्रियें जरी अनेक आहेत तरी तीं एकभावासच प्राप्त होतात, कारण कोणीही एकाच वेळीं सर्व इंद्रियांचीं कार्यें करीत नाहीं, तर एक इंद्रिय आपलें भाषणादि कार्य करूं लागलें म्हणजे इतर इंद्रियें त्यालाच अनुसरतात. " पण हें त्यांचें म्हणणें खरें आहे का ?

प्रतर्दनाचा हा प्रश्न ऐकून इंद्र म्हणतो-" तें खरें आहे. वाक्-चक्षु इत्यादि गौण प्राण म्ह० इंद्रियें एकाच वेळीं आपापले व्यापार करूं शकत नाहींत, पण मुख्य प्राण सर्वांत श्रेष्ठ आहे. तो सर्वांच्या ऐहिक व पारलौकिक जीवनाचें निमित्त आहे. म्हणूनच वागादि इंद्रियांच्या अभावींही मनुष्यादि प्राणी जिवंत रहातात, पण मुख्य प्राणावाचून कोणी जिवंत राहूं शकत नाहीं. म्हणूनच ' प्राण प्रज्ञात्मा आहे, ' असें मीं तुला वर सांगितलें. तोच शरीराला आसन-शयन इत्यादिकांवरून उठावितो. जो प्राण तोच प्रज्ञा व जी प्रज्ञा तोच प्राण. कारण त्या दोन्ही शक्ति म्ह० क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति बरोबरच या शरीरांत राहतात व बरोबरच हें शरीर सोडून जातात. याविषयीं सुषुप्ति व मरण हेंच प्रमाण आहे. प्राणी जेव्हां गाढ निजतो तेव्हां त्याचीं वागादि इंद्रियें आपापल्या व्यवहारासह प्राणांत लीन होतात व तो जेव्हां उठतो तेव्हां अग्नीपासून जशीं ठिणग्या किटाळें त्याप्रमाणें वागादि सर्व इंद्रियें त्याच प्राणापासून निघून आपापल्या गोलकांत येऊन राहतात. त्याचप्रमाणें मरण-समयींही प्राण्याचें शरीर निश्चेष्ट होऊन पडलें म्हणजे त्याच्या जवळचे लोक ' याचें चित्त शरीरांतून गेलें. हा ऐकत, पहात, बोलत वगैरे नाहीं ' असें म्हणतात. त्या-वेळींही वागादि इंद्रियें आपापल्या कार्यांसह प्राणांतच लीन होतात, आणि तो पुनः जेव्हां उत्पन्न होतो तेव्हां अग्निविस्फुलिंगन्यायानें तीं प्राणापासूनच उत्पन्न होतात. म्हणून जो प्राण तोच प्रज्ञा व जी प्रज्ञा तोच प्राण. "

याप्रमाणें प्राणाचें सर्वात्मकत्व सांगून साक्षी चैतन्यामध्यें सर्व भूतें एकरूप कशीं होतात तें सविस्तर सांगितलें आहे. नंतर " यांतील वागादि इंद्रियें किंवा विषय हे उपासना करण्यास योग्य नसून त्या सर्वांचा आधार आत्मा-प्रज्ञात्माच उपास्य आहे; प्रज्ञामात्रा म्ह० इंद्रियें व भूतमात्रा म्ह० विषय जरी अनेक आहेत, असें वाटलें तरी तीं सर्व एका प्रज्ञेमध्यें प्रतिष्ठित आहेत. तोच हा प्रज्ञात्मा आनंद, अजर, अमर आहे. तो पुण्यानें वाढत नाहीं व पापानें लहान होत नाहीं. तोच प्राण्यांच्या पूर्व कर्मानुसार त्यांच्याकडून पुण्य-पाप करवितो. तोच लोकपाल, लोकाधिपति, सर्वेश्वर

आहे. तोच माझा आत्मा आहे व त्यालाच जाणावें. मनुष्याला हेंच ज्ञान हिततम आहे. " असें सांगून इंद्रानें प्रतर्दनाला कृतार्थ करून भूलोकीं पाठविलें.

या उपनिषदाचा संक्षिप्त अर्थ असा असून आत्मपुराणकारांनीं आपल्या सुंदर व्याख्यानानें त्यालाच अतिशय चित्ताकर्षक केलें आहे. त्यांतील 'दृष्टिसृष्टिवाद' (श्लो. २१५-४२० पृ. ९०-१२५) हा अद्वैतवेदान्तशास्त्राचा एक महत्त्वाचा सिद्धान्त असून प्रत्येक वेदान्ततत्त्वजिज्ञासूनें विचारपूर्वक वाचण्यासारखा आहे. तरी वाचकांनीं कंटाळा न करितां तो २-३ वेळां अवश्य वाचावा, अशी आमची सूचना आहे. एकादेवेळीं आचार्यांतील प्रस्थानत्रयपरिचयांतही या वादाचें अधिक सुबोध स्पष्टीकरण आम्ही करूं.

असो; सर्वान्तर्यामी परमात्मा मनुष्याला हिततम असलेल्या आत्मज्ञानाची आवड महाराष्ट्रांतील सर्व प्रजेच्या चित्तांत उत्पन्न करो व त्या योगानें सर्वांचें ऐहिक व आमुष्मिक अत्यंत कल्याण होवो, अशी शुभेच्छा व्यक्त करून आचार्यांच्या कृपेनें यथामति लिहिलेला हा अल्पसा ग्रंथ त्यांच्याच चरणीं अर्पण करतों.

पुणे, २४१ सदाशिव पेठ, श्रावण शु. १५ शके १८४१

आचार्यभक्त,
चि. वा. बापटशास्त्री.

---

१. या पुस्तकाला महागाईमुळें कागद हलका वापरावा लागला व छपाईचेही कांहीं सामान्य दोष कामकऱ्यांच्या प्रमादामुळें यांत राहिले असतील, त्याबद्दल सुज्ञ वाचक आम्हांस क्षमा करतील. यापुढील भागांस ईशकृपेनें पूर्वीसारखा चांगलाच कागद वापरणार आहों.

# ब्रह्मविद्याग्रंथरत्नमालेंतलि पुस्तकें.

| पुस्तकाचें नांव. | पृष्ठें. | | | किंमत. | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ ईशोपनिषद्भाष्यार्थ | ६० | .... | .... | ० | ४ | ० |
| २ केनोपनिषद्भाष्यार्थ | १२८ | .... | .... | ० | ८ | ० |
| ३ काठकोपनिषद्भाष्यार्थ | १७६ | .... | .... | ० | १२ | ० |
| ४ प्रश्नोपनिषद्भाष्यार्थ | १५२ | .... | .... | ० | १० | ० |
| ५ मुंडकोपनिषद्भाष्यार्थ | १२८ | .... | .... | ० | ८ | ० |
| ६ मांडूक्योपनिषद्भाष्यार्थ ( कारिकांसह ) | ३५० | .... | .... | २ | ८ | ० |
| ७ ऐतरेयोपनिषद्भाष्यार्थ | २४० | .... | .... | १ | ० | ० |
| ८ तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ | २१० | .... | .... | १ | ० | ० |
| ९ सार्थ ऐतरेयोपनिषद् | ४० | .... | .... | ० | ४ | ० |
| १० सार्थ तैत्तिरीयोपनिषद् | ११८ | .... | .... | ० | ८ | ० |
| ११ सार्थ नारायणोपनिषद् | १२८ | .... | .... | ० | ८ | ० |
| १२ बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ | १६५० | .... | .... | ७ | ८ | ० |
| १३ छान्दोग्योपनिषद्भाष्यार्थ | ६९० | .... | .... | ४ | ८ | ० |
| | | | | २० | ६ | ० |

या तेरा उपनिषदांचा सेट मजबूत कापडी बांधणीचा १७ रुपयांस व साध्या बाइंडिंगचा १५ रु. ट. ख. १॥ रु. वेगळा.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ अनुभूतिप्रकाश अ. १ | ३४० | .... | .... | १ | ८ | ० |
| २ अनुभूतिप्रकाश अ. २ | १२८ | .... | .... | ० | ८ | ० |
| १ आत्मपुराण अ. १ | ४९० | .... | .... | २ | ० | ० |
| २ आत्मपुराण अ. १० | २९२ | .... | .... | १ | ० | ० |
| ३ आत्मपुराण अ. २ | २०० | .... | .... | १ | ४ | ० |

१. हे सर्व भाष्यार्थ मूळ श्रुति, तिचा अर्थ, शांकर भाष्य व त्याचा सरळ अर्थ यांसह आहेत. सार्थ ऐतरेय–तैत्तिरीय–नारायण हीं मूळ श्रुति व सायणभाष्यानुसार विस्तृत अर्थ यांसह आहेत.

२. अनुभूतिप्रकाश व आत्मपुराण हे ग्रंथ मूळ श्लोक अन्वय व सविस्तर अर्थ यांसह आहेत.

# विषयानुक्रमणिका.

# आत्मपुराण.

( श्रीशंकरानन्दकृत कौषीतकीसारार्थप्रकाशरूप )

## अध्याय दुसरा.

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीशंकराचार्यादि सर्व वेदान्त-संप्रदायप्रवर्तक आचार्यांना वंदन करून आम्ही हें कौषितकीसारार्थ-प्रकाशरूप आत्मपुराणाच्या दुसऱ्या अध्यायाचें व्याख्यान स्वबोधशुद्ध्यर्थ व लोकोपकारार्थ करितों—

इदं सुदुर्लभं ज्ञानं जन्मकोटिशतायुतैः ।
प्राप्यते पुरुषव्याघ्रैर्गुरुशुश्रूषणादिना ॥ १ ॥

**अन्वयः**—जन्मकोटिशतायुतैः इदं सुदुर्लभं ज्ञानं पुरुषव्याघ्रैः गुरुशुश्रूषणादिना प्राप्यते ॥

अर्थ—हें अनेक जन्मांनीं अत्यंत दुर्लभ असलेलेंही ज्ञान पुरुषश्रेष्ठां-कडून गुरुशुश्रूषणादि उपायांनीं संपादन केलें जातें. ( इंद्र व प्रतर्दन यांच्या आख्यायिकेंत प्रकाशित केलेलें आत्मज्ञान असंख्य जन्म घेतले तरी होत नाहीं कारण नुसतें जन्म घेऊन मरणें किंवा पश्वादिकांनीं जिवंतपणीं स्वाभाविक कर्मं करणें व मनुष्यांनीं स्वाभाविक व शास्त्रीय कर्मं करणें हा ज्ञानाचा उपाय नव्हे. त्यामुळें ज्ञान अत्यंत दुर्लभ आहे. तथापि श्रेष्ठ पुरुष तें गुरुशुश्रूषा, श्रद्धा, समाधान, श्रवण, मनन, निदिध्यासन इत्यादि उपायांनीं संपादन करितात. ) १

---

१ स्वाभाविक म्ह० आहार, निद्रा, भय, मैथुन व त्यासाठीं शरीराची हालचाल, आणि शास्त्रीय म्ह० संध्यावंदन-पंचमहायज्ञ इत्यादिक शास्त्रविहित कर्मे.

नातो हिततमं किंचिन्मनुष्यायास्ति साधनम् ।
सुखावाप्त्यै समूलस्य दुःखस्य च विनाशने ॥ २ ॥

**अन्वयः**—अतः मनुष्याय हिततमं किंचित् नास्ति । यतः इदं सुखावाप्त्यै समूलस्य दुःखस्य च विनाशने साधनम् ॥

**अर्थ**—या ज्ञानाहून मनुष्याला अत्यंत हितकर असें दुसरें कांहीं नाहीं. कारण हें ज्ञान सुखप्राप्ति व दुःखाचा समूल—सकारण विनाश यांचें साधन आहे ( अज्ञान या कारणासह त्रिविध दुःखांची निवृत्ति वं त्यामुळेंच निरतिशय स्वाभाविक आनंदाची अभिव्यक्ति हाच मोक्ष आहे व त्याचें अन्तरंग साधन ज्ञानच आहे. बाकीचीं सर्व बहिरंग साधनें आहेत. ) २

अत्र चोदाहरन्तीममितिहासं पुरातनम् ।
प्रतर्दनस्य संवादं देवराजेन वै पुरा ॥ ३ ॥

**अन्वयः**—अत्र च इमं पुरातनं इतिहासं उदाहरन्ति । पुरा प्रतर्दनस्य देवराजेन वै संवादं उदाहरन्ति ॥

**अर्थ**—याविषयीं हा पुरातन इतिहास सांगतात—पूर्वी प्रतर्दनाचा इंद्राशीं संवाद झालेला सांगतात. ३.

[ श्रुतिः—' प्रतर्दनो ह दैवोदासिरिन्द्रस्य प्रियं धामोपजगाम । युद्धेन च पौरुषेण च ॥ ' अर्थ—' प्र ' म्ह० अतिशय ' तर्दन-' भर्त्सन—पराभव करणारा, प्रतर्दन या नांवाचा ( आपल्या शत्रूंना तो तुच्छ करीत असल्यामुळें प्रतर्दन अशा यथार्थ नांवाचा ) दिवोदास या नांवाच्या काशिराजाचा पुत्र ' इंद्रस्य-' परमैश्वर्यसंपन्न देवराजाच्या ' प्रियं धाम-' प्रिय स्थानास—स्वर्गास 'उपजगाम-' प्राप्त झाला. ( स्वर्गास जाण्याचें कारण—) 'युद्धेन च पौरुषेण च-' समरांत अनेक वीरांचा पराभव करून व उत्साहानें—स्वर्गाच्या मर्मज्ञानानें तो स्वर्गास प्राप्त झाला. ]

आसीत्प्रतर्दनो नाम दिवोदाससुतो महान् ।
काशीश्वरो जितामित्रः क्षत्रधर्मरतः सदा ॥ ४ ॥

**अन्वयः**--प्रतर्दनो नाम दिवोदाससुतः महान् काशीश्वरः जितामित्रः सदा क्षत्रधर्मरतः आसीत् ॥

अर्थ---प्रतर्दन या नांवाचा दिवोदासराजाचा पुत्र महान् काशिराजा, ज्यानें बाह्य व आंतर शत्रूंना जिंकलें आहे, व जो सदा क्षत्रधर्मामध्यें रत आहे, असा होता. ४

जिगाय शत्रूनखिलान्धर्मतः स नराधिपः ।
देवान् जेतुं जगामाथ स्वर्गं देवेन्द्रपालितम् ॥ ५ ॥

**अन्वयः**—सः नराधिपः धर्मतः अखिलान शत्रून् जिगाय । अथ देवान् जेतुं देवेन्द्रपालितं स्वर्गं जगाम ॥

अर्थ---तो मनुष्याधिप-राजा धर्मयुद्धानें सर्व शत्रूंस जिंकता झाला. मनुष्यलोकाला जिंकल्यावर देवांना जिंकण्यासाठीं तो देवेंद्रानें ज्याचें पालन केलें आहे अशा स्वर्गास गेला. ५.

एकाकी धनुरादाय स्वर्गद्वारि स्थितो हि सः ।
इन्द्राय प्रेषयामास दूतं वाक्यार्थकोविदम् ॥ ६ ॥

**अन्वयः**—सः एकाकी धनुः आदाय स्वर्गद्वारि स्थितः हि । इन्द्राय वाक्यार्थकोविदं दूतं प्रेषयामास ॥

अर्थ---तो एकाकी—असहाय- हातांत सज्य धनुष्य घेऊन स्वर्गाच्या द्वारांत जाऊन उभा राहिला; व इंद्राला आपलें आगमन कळविण्यासाठीं वाक्यार्थ जाणाऱ्या दूताला त्याच्याकडे पाठविता झाला ६.

भवान्देवेन्द्र इत्युक्तो मनुजेन्द्रस्त्वहं तथा ।
इन्द्रता नोभयोर्युक्ता ह्यर्थशून्यत्वहेतुतः ॥ ७ ॥

**अन्वयः**—( यद्यपि ) भवान् देवेन्द्रः इति लोकैः उक्तः तथा अहं तु मनुजेन्द्रः इति । ( तथापि ) अर्थशून्यत्वहेतुतः उभयोः इन्द्रता न युक्ता ॥

अर्थ---हे देवश्रेष्ठा, जरी तूं देवेंद्र म्हणून लोकांकडून बोलला गेला आहेस तसाच मीही मनुष्येंद्र म्हणून म्हटला गेलों आहें तरी अर्थशून्यत्व या कारणानें दोघांना इंद्रत्व असणें युक्त नाहीं. ( कारण 'इंद्र' या शब्दांत 'इन्द् परमैश्वर्ये-' हा धातु आहे. त्यामुळें इंद्र म्ह० परम ऐश्व-

काणि विचारद्वारा यस्य तत् तुरीयं ' असा करावा. स्थूल-सूक्ष्म-कारण हीं तीन समष्टि-व्यष्टिरूपें विचारद्वारा ज्याचीं प्रापक—प्राप्त करून देणारीं—ज्ञान करून देणारीं आहेत तें तुरीय, हाच ' त्रि-नेत्रत्व ' याचा अर्थ आहे. वाराणसींत मेलेल्या जंतूला मोक्ष मिळतो याविषयीं प्राणाग्निहोत्रोपनिषद् , जाबाल, तापनीय, मोक्षधर्म, अश्वमेधपर्व, मत्स्यादि पुराणें, पाराशरादि उपपुराणें, सनत्कुमारसंहिता इत्यादिकांमध्यें प्रमाणें आहेत. ) १५

यस्यां वसति सर्वात्मा भगवान्भूतभावनः । भवानीहृदयाब्जेन्दुमध्यमो धवलप्रभः ॥ १६ ॥ भवद्भिरखिलैर्देवैर्मौलिरत्नपदांशुभिः । नमद्भिः सर्वदा हर्षान्नीराजितपदाम्बुजः ॥ १७ ॥

**अन्वयः**—यस्यां भगवान् वसति । ( कीदृशः ) सर्वात्मा, भूतभावनः, भवानीहृदयाब्जेन्दुमध्यमः, धवलप्रभः । नमद्भिःभवद्भिः अखिलैः देवैः सर्वदा हर्षात् मौलिरत्नपदांशुभिः नीराजितपदाम्बुजः ॥

अर्थ—ज्या नगरींत भगवान्—सर्वज्ञ परमेश्वर—लीलाविग्रहानें तारकमंत्राचा उपदेश करणारा—राहतो. ( त्याचींच विशेषणें- ) सर्वांचा अन्तर्यामी, प्रत्येक कार्याचें कारण, पार्वतीच्या हृदयकमलाला प्रफुल्लित करणारा जो चंद्र त्याच्या मध्यें ज्याची कांति—प्रतिबिंबता आहे असा सूर्य ('इंदुमध्यमः ' इंदुमध्ये मा यस्य स इन्दु-मध्य-मः' असा विग्रह.) कर्पूरगौर, १६ नमस्कार करणाऱ्या तुम्हां सर्व देवांकडून सर्वदा हर्षानें आपल्या मस्तकांतील रत्नस्थानभूत—रत्नांच्या स्थानीं असलेल्या भूषणांच्या किरणांनीं ज्याच्या पायांना आरती केली जाते असा. ( तो ज्या नगरींत राहतो, ) १७.

मुनयो ये च वेदाश्च बहुधा वर्णयन्ति यम् । कृतोपकारा राजानं बन्दिनश्चारणा इव ॥१८॥ यस्य भ्रूभंगमात्रेण ब्रह्माद्याः सकलाःसुराः । शतवारं जगत्यस्मिन्भवन्ति न भवन्ति च ॥१९॥ तप उग्रं चचारादौ यमुद्दिश्य महेश्वरम् । हिमवत्तनया देवी नारीणां प्रथमा वधूः ॥२०॥ सेनानीश्च गणेशश्च यस्य पुत्रौ महाबलौ । प्रमथा यस्य सैन्यानि

जयकाशीनि सर्वतः ॥ २१ ॥ यन्नामग्रहणाज्जन्तुः प्राप्नुयान्न भवापदम् । यस्य पादार्चनात्सिद्धिः स्वेप्सिता जायते नृणाम् ॥ २२ ॥ निःस्पृहो यः सदा देवो ब्रह्माण्डविषयभ्रमे । आत्मबोधोदधिः स्वच्छो योगिनां प्रथमो गुरुः ॥ २३ ॥ यस्मादेतज्जगत्सर्वं जायते यत्र लीयते । तिष्ठत्यपि च को नाम वर्णयेत्तद्गुणान्पुमान् ॥ २४ ॥

**अन्वयः**—ये च मुनयः ये च वेदाः ते राजानं कृतोपकाराः बन्दिनः च चारणाः इव यं बहुधा वर्णयन्ति । यस्य भ्रूभंगमात्रेण ब्रह्माद्याः सकलाः सुराः शतवारं अस्मिन् जगति भवन्ति च न भवन्ति । नारीणां प्रथमा, प्रथमा वधूः हिमवत्तनया देवी यं महेश्वरं उद्दिश्य आदौ उग्रं तपः चचार । सेनानीः च गणेशः यस्य महाबलौ पुत्रौ, प्रमथा यस्य सर्वतः जयकाशीनि सैन्यानि । यन्नामग्रहणाज्जन्तुः भवापदं न प्राप्नुयात्, यस्य पादार्चनात् नृणां स्वेप्सिता सिद्धिः जायते, यः देवः ब्रह्माण्डविषयभ्रमे सदा निःस्पृहः, यः स्वच्छः आत्मबोधोदधिः, योगिनां प्रथमः गुरुः । यस्मात् एतत् सर्वं जगत् जायते, यत्र लीयते, अपि च यत्र तिष्ठति तस्य गुणान् कः नाम पुमान् वर्णयेत् ॥

**अर्थ**—जे स्मृति-पुराणादिकर्ते मुनि व चार वेद ते–राजाला, त्यानें ज्यांच्यावर उपकार केले आहेत असे भाट व चारण जसे अनेक प्रकारें वर्णितात त्याप्रमाणें–ज्या भगवानाची स्तुति करितात १८, ज्याच्या केवळ भ्रूभंगानें ब्रह्मदेवादिक सर्व देव अनंत वेळां या संसारांत प्रादुर्भूत होऊन नष्ट होतात १९, स्त्रियांतील श्रेष्ठ व पूर्व जन्मीं दक्षकन्या सती या रूपानें भार्या असलेली हिमालयाची कन्या देवी पार्वती ज्या महेश्वराला उद्देशून आरंभीं उग्र तप करती झाली २०, स्कंद व गणेश हे ज्याचे महा बलाढ्य पुत्र आहेत, गण हीं ज्याचीं विजयानें शोभणारीं सैन्यें आहेत २१, ज्याचें 'महादेव महादेव' असें नामग्रहण केल्यानें प्राणी संसाररूप आपत्तीस प्राप्त होत नाहीं, ज्याच्या चरणांचें पूजन केल्यानें मनुष्यांची इष्टसिद्धि होते २२, जो देव ब्रह्मांडांतील विषयभ्रमाविषयीं–मिथ्या ज्ञानरूप भोगाविषयीं निःस्पृह आहे, जो

१ बंदी म्ह॰ नियतवेळीं स्तुति करणारे व चारण म्ह॰ प्रसंगविशेषीं कीर्ति गाणारे यांवर राजा धनदानादिकांच्या योगानें उपकार करतो व भगवान् मुनींना तपाचें फळ व ज्ञान देतो आणि वेदांना प्रामाण्य देतो. कारण कर्मफलदाता भगवान जर नसेल तर वैदिक विधींना प्रामाण्य कोठचें ?

निर्मळ आत्मज्ञानसिंधु आहे, चित्तनिरोधरूप योगाचा अभ्यास करणारांचा जो प्रथम[1] गुरु आहे २३, ज्याच्यापासून हें सर्व जगत् उत्पन्न होतें, ज्याच्यामध्यें लीन होतें व ज्याच्या आधारानें त्याची स्थिति होते त्याच्या गुणांचें वर्णन करण्यास कोणता पुरुष समर्थ आहे ? ( कोणी नाहीं. ) २४.

यस्याः सौभाग्यमधिकं पुरीणामिह दृश्यते । सप्तानां मुक्तिदात्रीणां सर्वैरपि च जन्तुभिः ॥ २५ ॥ नतया हि समा देवा भवतामरावती । भोगवत्यपि नागानां का नामान्या भवेत्समा ॥ २६ ॥ गङ्गायाः सेवनान्नित्यं महादेवस्य वासतः । सौभाग्यस्य च काशेन काशीत्येषाभवत्पुरी ॥२७॥

**अन्वयः**—सप्तानां मुक्तिदात्रीणां पुरीणां मध्ये यस्याः अधिकं सौभाग्यं सर्वैः अपि जन्तुभिः दृश्यते । हे देवाः एतया समा भवतां अमरावती न हि, नागानां भोगवती नाम अपि न, का अन्या समा भवेत् । गंगायाः नित्यं सेवनात्, महादेवस्य वासतः, सौभाग्यस्य च काशेन एषा पुरी काशी इति अभवत् ॥

**अर्थ**—अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवन्तिका, व द्वारवती या सात मोक्ष देणाऱ्या पुरींमध्यें जिचें अधिक सौभाग्य सर्व प्राण्यांकडून ( भोग व मोक्ष यांच्या सुलभत्वामुळें ) पाहिलें जातें (इतर पुरींचें सौभाग्य कांहीं प्राणीच पाहतात, असा भावार्थ) २५; हे देवहो, या नगरी सारखी तुमची अमरावती नांवाची नगरी नाहीं ( कारण येथील जीवांना अधःपाताचें भय असतें ) तशीच भोगांमुळेंच प्रसिद्ध असलेली नागांची भोगवती नांवाची नगरीही हिच्या सारखी नाहीं. मग दुसरी आणखी कोणती नगरी हिच्या सारखी असणार ? २६ गंगा हिचें नित्य सेवन करीत असल्यामुळें, महादेव येथें नित्य वास करीत असल्यामुळें व सौभाग्याच्या प्रकटतेमुळें ही पुरी काशी या नांवानें प्रसिद्ध झाली आहे २७.

---

१ तो पूर्व योग्यांचाही गुरु आहे, कारण त्याचा कालानें अवच्छेद होत नाहीं, अशा अर्थाचें 'पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्' पा. १ सू. २६ असें योगसूत्र आहे.

तस्याः प्रभुर्जितामित्रो दिवोदास इति स्मृतः ॥ ब्रह्मण्यः सत्यसंधश्च क्षत्रधर्मरतः सदा ॥ २८ ॥ चतुरंगबलोपेतः स्वयं चातिबलो नृपः ॥ भवतां विदितः सोयं यज्वा ह्यत्रैव तिष्ठति २९

**अन्वयः**—तस्याः प्रभुः जितामित्रः दिवोदास इति स्मृतः ब्रह्मण्यः सत्यसंधः च सदा क्षत्रधर्मरतः । चतुरंगबलोपेतः स्वयं च अतिबलः नृपः, सः अयं भवतां विदितः, यतः यज्वा हि, अत्र एव तिष्ठति ॥

अर्थ—त्या काशी नगरीचा प्रभु ज्यानें अमित्रांना—शत्रूंना जिंकलें आहे असा दिवोदास म्हणून आहे. तो ब्राह्मणांचा मोठा भक्त, सत्यप्रतिज्ञ व सदा क्षत्रधर्मामध्यें रत आहे २८. तो हत्ती, घोडे, रथ व पदाति अशा चतुरंग सैन्यानें युक्त व स्वतः अति बलाढ्य राजा आहे. तो दिवोदास राजा तुम्हां देवांना माहीत आहेच, कारण तो प्रख्यात यज्ञकर्ता—यथाविधि यज्ञपरायण आहे. तो येथेंच म्ह० काशींतच राहतो. २९.

तस्य पुत्रोऽपि मतिमान् प्रतर्दन इति श्रुतः ॥ पूर्वजैः सदृशः सर्वैर्गुणैर्भूतदयापरः ॥३०॥ अस्य सन्ति महानागाः पर्वता इव कोटिशः ॥ अनेकलक्षणोपेता वाजिनोऽपि रवेरिव ॥३१॥ रथा अपि महाघोषाः पुरारेरिव युद्ध्यतः ॥ पादाताः स्वसमाः सन्ति परार्द्धाधिकसंख्यया ॥ ३२ ॥ अप्रमादी सदा शस्त्रे मायया च विवर्जितः ॥ अस्त्राण्यसौ विजानाति प्रयुंक्ते नैव कुत्रचित् ॥ ३३ ॥ संधानं च विसर्गं च स्थितिं तद्वच्च संहृतिम् ॥ अस्त्राणां वेत्ति सर्वेषां महादेवप्रसादतः ॥३४॥ अस्त्रेण निहतो जन्तुर्न मया निहतो भवेत् ॥ अभिचारवधात्कस्माद्विशेषोऽस्त्रेण घातने ॥ ३५ ॥ इति संचिन्त्य सततं रिपुमस्त्रैर्न हन्त्यसौ ॥ रिपूणामिच्छया युद्धं ददात्येव हि सर्वदा ॥३६॥ नायं प्रथमतो हन्ति रिपुं तेन ह्यताडितः ॥ ताडितोऽपि न पंचाशद्वर्षादत्यधिकं क्वचित् ॥ ३७ ॥ ऊनषोडशवर्षं च वीरव्रतमुपाश्रितः ॥ कुतो भीतातुरादीनि निहन्याद्धर्मविद्धि सः ३८

**अन्वयः**---तस्य प्रतर्दनः इति श्रुतः पुत्रः अपि मतिमान्, सर्वैः गुणैः पूर्वजैः सदृशः, भूतदयापरः अस्ति । अस्य पर्वताः इव कोटिशः महानागाः सन्ति, अनेकलक्षणोपेताः वाजिनः अपि रवेः इव । युद्ध्यतः पुरारेः इव तस्य महाघोषाः रथाः अपि सन्ति । स्वसमाः पादाताः परार्द्धाधिकसंख्यया सन्ति । शस्त्रे सदा अप्रमादी मायया च विवर्जितः, असौ अस्त्राणि विजानाति तथापि कुत्रचित् न प्रयुङ्क्ते । सः महादेवप्रसादतः सर्वेषां अस्त्राणां संधानं विसर्गं स्थितिं तद्वच्च संहृतिं वेत्ति । 'अस्त्रेण निहतः जन्तुः मया निहतः न भवेत्, अभिचारवधात् अस्त्रघातने कस्मात् विशेषः स्यात् ।' इति संचिन्त्य असौ सततं रिपुं अस्त्रैः न हन्ति । रिपूणां इच्छया सर्वदा युद्धं ददाति एव हि । अयं रिपुं तेन हि अताडितः प्रथमतः न हन्ति । ताडितः अपि वीरव्रतं उपाश्रितः सन् पंचाशद्वर्षात् अधिकं ऊनषोडशवर्षं च क्वचित् न हन्ति तदा भीतातुरादीनि कुतः निहन्यात् । हि सः धर्मवित् अस्ति ॥

**अर्थ**—त्याचा 'प्रतर्दन' या नांवाचा पुत्रही मतिमान्, सर्व गुणांनीं आपल्या पूर्वजांसारखा, व भूतदयेंत तत्पर आहे ३०. त्याचे पर्वतासारखे कोट्यवधि महा गज आहेत, अनेक लक्षणांनीं युक्त असे घोडेही सूर्याच्या घोड्यांसारखे आहेत. ३१ युद्ध करणाऱ्या शंकराच्या रथांसारखे मोठा घोष करणारे त्याचे रथही आहेत. स्वतः प्रतर्दनासारखे परार्धाहून अधिक म्ह० असंख्यात पदातिही आहेत. ३२ शस्त्रविद्येत केव्हांही प्रमाद न करणारा व छळानें कधींही न लढणारा तो प्रतर्दन सर्व अस्त्रांना जाणतो. पण त्यांचा केव्हांही व कोणावरही प्रयोग करीत नाहीं. ३३ तो महादेवाच्या प्रसादानें सर्व अस्त्रांचें संधान—प्रयोग, त्याग—सोडणें, स्थिति—मर्यादा व उपसंहार जाणतो ३४, पण 'अस्त्रानें मारलेला जो प्राणी त्याला मीं मारलें असें होत नाहीं. कारण अभिचारानें[1] मारणें व अस्त्रानें मारणें यांत अंतर कां असावें ? ३५' असा चांगला विचार करून तो नेहमीं शत्रूला अस्त्रांनीं मारीत नाहीं. शत्रूंच्या इच्छेनेंच त्यांना तो सर्वदा युद्ध देतो ( त्यांच्या इच्छेप्रमाणें युद्ध करतो ) ३६, हा शत्रूला त्यानें ताडन केल्यावाचून प्रथम ताडन करीत नाहीं, आणि शत्रूनें जरी ताडन केलें तरी वीरव्रताचा[2] आश्रय केलेला असा

१ अभिचारानें म्ह० शत्रूनें मरावें या इच्छेनें केलेल्या श्येनादि यागानें. २ मूर्च्छित, विकल—व्याकुळ झालेला, अशस्त्र, दुसऱ्याशीं युद्ध करीत असलेला, पलायन करणारा व शरण आलेला यांस मारूं नये, हें वीरव्रत.

होत्साता तो प्रतर्दन पन्नास वर्षांहून अधिक व सोळा वर्षांहून कमी वयाच्या शत्रूला मारीत नाहीं, मग भयभीत झालेला, आतुर झालेला इत्यादिकांस तो कोठून मारील ? कारण तो धर्मज्ञ आहे. ३७,३८.

विजित्य वसुधां कृत्स्नामेकदा स पुरे निजे ॥ भवन्तं क्षत्रधर्मेण वर्तमानमिहाशृणोत् ॥ ३९ ॥ ब्राह्मणा अपि देवाश्च गावः सवृषभा अपि ॥ नावमान्याः सदा तेन व्रतमेतन्महात्मनः ॥ ४० ॥ अन्यच्चास्य व्रतं राज्ञः क्षत्रधर्मरतान्सदा ॥ देवान्विप्रान्पितॄन्वापि जेष्याम्यात्मबलोद्धतान् ॥ ४१ ॥ एवं हि व्रतिनस्तस्य मुनयो नारदादयः ॥ समागताः प्रसंगेन कदाचिदिदमूचिरे ॥ ४२ ॥

**अन्वयः**—कृत्स्नां वसुधां विजित्य एकदा सः निजे पुरे इह क्षत्रधर्मेण वर्तमानं भवन्तं अशृणोत् । तेन सदा ब्राह्मणाः अपि देवाः सवृषभाः अपि गावः न अवमान्याः । तस्य महात्मनः एतत् व्रतम् । क्षत्रधर्मरतान् बलोद्धतान् देवान्, विप्रान्, पितॄन् वा अपि जेष्यामि इति एतत् अपि अस्य राज्ञः अन्यत् च व्रतं अस्ति । एवं हि व्रतिनः तस्य नारदादयः मुनयः कदाचित् समागताः । प्रसंगेन इदं ऊचिरे ॥

अर्थ—संपूर्ण पृथ्वीला जिंकून एकदा तो आपल्या काशी नगरांत स्वर्गामध्यें क्षत्रधर्मानें राहणाऱ्या तुला—इंद्राला ऐकता झाला. ( स्वर्गलोकीं इंद्र क्षत्रधर्मानें राहतो, असें त्यानें ऐकलें. ) ३९. तो केव्हांही ब्राह्मण, देव व बैलांसह गायीही यांचा अवमान करीत नाहीं ४०. क्षत्रधर्मामध्यें रत असलेल्या व आत्मबलानें उद्धत—सगर्व झालेल्या देवांस, ब्राह्मणांस व पितरांसही मी जिंकीन हेंही त्या राजाचें दुसरें व्रत आहे ४१. असें व्रत असलेल्या त्याच्याकडे नारदादिक मुनी एकदा आले; व प्रसंगानें असें म्हणाले ४२.

राजभ्यः क्षत्रधर्मेण बलिनः सकलाः सुराः ॥ न हि तैः समरे योद्धुमसुरा अपि दानवाः ॥ दैत्या अपि तु शक्ताः स्युः किं पु-

नर्मनुजा इमे ॥ ४३ ॥ एकमप्यत्र को नाम जयेदिन्द्रं शचीपतिम् ॥ किंपुनः सबलं लोकपालैरपि समावृतम् ॥ ४४ ॥

अन्वयः--राजभ्यः सकलाः सुराः बलिनः । तैः सह क्षत्रधर्मेण योद्धुं असुराः अपि दानवाः अपि तु दैत्याः न हि शक्ताः किं पुनः इमे मनुजाः । अत्र कः नाम एकं अपि शचीपतिं इन्द्रं जयेत् । किं पुनः सबलं लोकपालैः अपि समावृतम् ॥

अर्थ---राजांहून सर्व देव बलाढ्य आहेत. त्यांच्याशीं क्षत्रधर्मानें युद्ध करण्यास असुरही समर्थ नाहींत, दानवही नाहींत व दैत्यही पण समर्थ नाहींत.मग मनुष्यांविषयीं बोलावयास कशाला पाहिजे ? ४३ या जगांत कोण बरें एकट्या शचीपतीला जिंकील ! आणि एकट्या देवेंद्रालाही जर कोणी जिंकण्यास समर्थ नाहीं तर ससैन्य व लोकपालांनीं परिवेष्टित अशा त्याला कोण जिंकणार ? ४४.

श्रुत्वेत्यादिवचांस्येष स्मृत्वा च व्रतमात्मनः ॥ पौरुषेणैव वा योद्धुमेकाकी स समागतः ॥ ४५ ॥ आगत्यास्याः पुरो द्वारि समभूमौ स वर्तते ॥ प्राहिणोच्चात्र मां दूतं देवराजं प्रतीश्वरः ॥ ४६ ॥ इदं चोवाच वचनमित्युक्त्वा तदुदीरितम् ॥ देवराजाय सकलं दूतस्तत्र न्यवेदयत् ॥ ४७ ॥

अन्वयः---एषः इत्यादिवचांसि श्रुत्वा च आत्मनः व्रतं स्मृत्वा सः पौरुषेण एव योद्धुं एकाकी समागतः । अत्र आगत्य सः अस्याः पुरः द्वारि समभूमौ वर्तते । सः ईश्वरः मां दूतं देवराजं प्रति प्राहिणोत् । इदं च वचनं उवाच इति उक्त्वा दूतः तत्र तदुदीरितं सकलं देवराजाय न्यवेदयत् ॥

अर्थ---तो नारदादिकांचीं इत्यादि वचनें ऐकून व आपलें व्रत आठवून प्रतर्दन उत्साहानेंच युद्ध करण्यासाठीं एकटा आला आहे ४५. येथें येऊन तो या नगरीच्या द्वारांत सम प्रदेशीं उभा आहे. त्या ईश्वरानें मला दूत या रूपानें देवराजाकडे पाठविलें आहे ४६ व हें वचन तो बोलला, असें म्हणून दूत तेथें प्रतर्दनानें सांगितलेलें ( श्लोक ६--१० पहा ) सर्व देवराजास निवेदन करता झाला ४७.

श्रुत्वा दूतस्य वचनं देवराजोऽतिविस्मितः ॥ साहंतापरनाम्ना-

स्य पौरुषेणाभयात्मना ॥ ४८ ॥ देवैश्च सहितः सोऽपि क्षत्रधर्मरतः प्रभुः ॥ संक्रुद्धः सहसा पुर्या निर्जगाम बलान्वितः ४९

**अन्वयः**--दूतस्य वचनं श्रुत्वा देवराजः साहसापरनाम्ना अभयात्मना अस्य पौरुषेण च अतिविस्मितः । सः अपि क्षत्रधर्मरतः प्रभुः संक्रुद्धः सन् देवैः सहितः बलान्वितः सहसा पुर्याः निर्जगाम ॥

अर्थ—दूताचें वचन ऐकून देवराज साहस हें ज्याला दुसरें नांव आहे अशा अभयस्वरूपानें व याच्या उत्साहानें अतिशय विस्मित झाला ४८ तोही क्षत्रधर्मामध्यें रत असलेला प्रभु अतिशय क्रुद्ध होऊन देवां-सहवर्तमान ससैन्य अकस्मात्-कांहीं विचार न करतां आपल्या नगरीं-तून बाहेर पडला ४९.

तं देवैः सहितं दृष्ट्वा स्वयुद्धार्थमुपागतम् ॥ न चचाल ततः स्थानात्स्मयमानः प्रतर्दनः ॥ ५० ॥ दृष्ट्वा तं वचनं चेदमुवाच च शचीपतिम् ॥ मां शस्त्रैर्विविधैस्तीक्ष्णैर्निघ्नन्तु सकलाः सुराः॥ शक्र त्वं च ततोऽहं वो हनिष्यामि शितैः शरैः ॥ ५१ ॥

**अन्वयः**--स्वयुद्धार्थं देवैः सहितं उपागतं तं दृष्ट्वा स्मयमानः प्रतर्दनः ततः स्थानात् न चचाल । तं शचीपतिं दृष्ट्वा इदं वचनं उवाच । सकलाः सुराः मां विविधैः तीक्ष्णैः शस्त्रैः निघ्नन्तु । हे शक्र त्वं च प्रहर । ततः अहं शितैः शरैः वः हनिष्यामि ॥

अर्थ—आपल्याशीं युद्ध करण्यासाठीं देवांसहवर्तमान आलेल्या इंद्राला पाहून हंसणारा प्रतर्दन त्या स्थानापासून यत्किंचित्‌ही ढळला नाहीं ५० व त्या शचीपतीकडे पाहून असें वचन बोलला. सर्व देव मला विविध तीक्ष्ण शस्त्रांनीं ताडन करोत. हे इंद्रा, तूंही मजवर प्रहार कर. तुम्ही मला प्रथम प्रहार केल्यावर मग मी तुम्हांला तीक्ष्ण शरांनीं ताडन करीन ५१.

इत्युक्ते सकला देवाः सशक्राः क्रोधमूर्छिताः ॥ कुण्डलव्यूह-तस्तं हि परिवव्रुः समंततः ॥ घ्नत बध्नीत चैवैनमित्यूचुश्च परस्परम् ॥५२॥वादित्राणां हि चित्राणां सिंहनादविमिश्रिताः॥

शब्दाः शंखरवान्तास्ते प्रादुरासन्सहस्रशः ॥ ५३ ॥ शस्त्र-
वर्षं च ते सर्वे सशङ्का मुमुचुस्तदा ॥ तोयदा इव संक्रुद्धाः
पर्वताभे प्रतर्दने ॥ ५४ ॥

अन्वयः--इति उक्ते सशङ्काः सकलाः देवाः क्रोधमूर्च्छिताः सन्तः तं कुण्ड-लव्यूहतः समन्ततः परिवव्रुः । एनं घ्नत बध्नीत एव च इति च ते परस्परं ऊचुः। चित्राणां वादित्राणां सिंहनादविमिश्रिता शंखरवान्ताः ते शब्दाः सहस्रशः प्रादु-रासन् । तदा ते सर्वे सशङ्काः संक्रुद्धाः सन्तः तोयदाः इव पर्वताभे प्रतर्दने शस्त्र-वर्षं मुमुचुः ॥

अर्थ--प्रतर्दन असें बोलला असतां इंद्रासह सर्व देव अतिशय क्रुद्ध होऊन त्याला कुंडलाकार व्यूहानें समंततः परिवेष्टित करते झाले. याला मारा, बांधूनच टाका, असें ते परस्पर बोलले. ५२ विचित्र वाद्यांचे-वीरांच्या सिंहनादांनीं अत्यंत मिश्रित व शंखनादयुक्त असे-शब्द सहस्रशः प्रादुर्भूत झाले. ५३ तेव्हां ते सर्व देव इंद्रासह अत्यंत क्रुद्ध होऊन मेघांप्रमाणें पर्वततुल्य प्रतर्दनावर शरवृष्टि करते झाले. ५४

प्रतर्दनोऽपि सर्वेषां शस्त्रैर्भिन्नात्मगात्रकः । सर्वान् जघान
सहसा पंचन्यूनैः शरोत्करैः ॥ ५५ ॥ भुजयोः स्तनयोश्चैव
ललाटफलके तथा । सुरः कश्चिदविद्धोऽत्र देवसैन्ये न दृश्यते
॥ ५६ ॥ आयुधानि च सर्वेषां न्यपतन् भूमिमण्डले । भुज-
बाणव्यथार्तानां सेन्द्राणामसुरद्रुहाम् ॥५७॥ बाणानां हि शतै-
र्विद्धः कश्चित्पंचाशतावरः । सहस्राक्षः सहस्रेण विद्धोऽतिबलिना
तदा ॥ ५८ ॥ सर्वांस्तानमरान् दृष्ट्वा भूमौ निपतितायुधान् ।
प्रतर्दनो धनुः स्वीयं विज्यमत्र चकार ह ॥ ५९ ॥

अन्वयः--सर्वेषां शस्त्रैः भिन्नात्मगात्रकः प्रतर्दनः अपि पंचन्यूनैः शरोत्करैः सर्वान् सहसा भुजयोः स्तनयोः तथा चैव ललाटफलके जघान । अत्र देवसैन्ये कश्चित् सुरः अविद्धः न दृश्यते । भुजबाणव्यथार्तानां सर्वेषां असुरद्रुहां सेंद्राणां आयुधानि च भूमिमण्डले न्यपतन् । तेन अतिबलिना तदा कश्चित् बाणानां शतैः विद्धः, अपरः पञ्चशता, सहस्राक्षः सहस्रेण विद्धः । अत्र तान् सर्वान् भूमौ निपति-तायुधान् दृष्ट्वा प्रतर्दनः स्वीयं धनुः विज्यं चकार ह ॥

अर्थ—सर्वांच्या शस्त्रांनीं ज्याचें अंग छिन्नभिन्न झालें आहे असा प्रतर्दनही कर्मीत कर्मी पांच बाणांच्या समूहांनीं सर्वांना एकाएकीं दोन्ही भुजा, दोन्ही स्तन, त्याचप्रमाणें ललाटफलक या ठिकाणीं प्रहार करता झाला. त्या देवसैन्यांत एकही देव अविद्ध—वेध न झालेला असा दिसेनासा झाला. ५५, ५६. भुजांवर बाणांचा वेध झाल्यामुळें व्यथेनें आर्त झालेल्या सर्व असुरद्रोही इंद्रादि देवांचीं आयुधें भूमंडळीं पडलीं. ५७ त्या अति बलाढ्यानें तेव्हां कोणाला शंभर बाणांनीं वेध केला, कित्येकांना पंन्नास बाणांनीं वेध केला आणि सहस्राक्ष इंद्राला तर सहस्र बाणांनीं वेध केला. ५८. तेव्हां त्या सर्व देवांस ज्यांचीं आयुधें भूमीवर पडलीं आहेत असे पाहून प्रतर्दन आपलें धनुष्य विज्य[1] करता झाला. ५९.

[ श्रुतिः—‘ तं हेन्द्र उवाच । ’ ‘ तं-’ समरांत कुशल व उत्साहसंपन्न अशा त्या स्वर्गाला आलेल्या प्रतर्दनाला ‘ ह-’ खरोखर ‘ इन्द्रः-’ युद्ध व पौरुष—उत्साह यांनीं संतुष्ट झालेला देवराज ‘उवाच-’म्हणाला.]

युद्धमेतन्महद्दृष्ट्वा साहसाख्यं च पौरुषम् ।
विस्मयाविष्टहृदय इन्द्र ऊचे प्रतर्दनम् ॥ ६० ॥

अन्वयः—एतत् महत् युद्धं साहसाख्यं च पौरुषं दृष्ट्वा विस्मयाविष्टहृदयः इन्द्रः प्रतर्दनं ऊचे ॥

अर्थ—हें मोठें युद्ध व साहसनांवाचें पौरुष—उत्साह पाहून ज्याचें चित्त विस्मयाविष्ट झालें आहे, असा इंद्र प्रतर्दनास म्हणाला ६०.

[श्रुतिः—‘प्रतर्दन वरं ते ददानीति-’ हे प्रतर्दना, ‘ वरं-’ तुला अभिलषित—इष्ट असलेला अर्थ—पदार्थ ‘ते-’ तुला—मला संतुष्ट करणाराला ‘ ददानि-’ देतों ‘ इति-’ असें म्हणालां, असा अन्वय. ]

प्रतर्दन वराभिष्टं वरमद्य ददाम्यहम् । तुष्टोऽस्मि भवतो युद्धपौरुषाभ्यां महीपते ॥ ६१ ॥ एकाकी क इह स्वर्गे मां जेतुं सामरं प्रभुः।को वा देवान्मया सार्धं सशल्यान्कुरुते क्षणात् ६२

१ ज्याच्यावर चढविलेली ज्या—दोरी उतरली आहे असें, गुणरहित.

अन्वयः—हे प्रतर्दन, अभीष्टं वरं वर, अहं अद्य ददामि । हे महीपते, भवतः युद्धपौरुषाभ्यां तुष्टोऽस्मि । इह स्वर्गे सामरं मां जेतुं एकाकी कः प्रभुः । कः वा मया सार्धं देवान् सशल्यान् क्षणात् कुरुते ॥

अर्थ—हे प्रतर्दना, तूं अभीष्ट असलेला वर माग. मी तो आज देतों. हे राजा, तुझ्या युद्धानें व पौरुषानें—उत्साहानें मी संतुष्ट झालों आहें. ६१. या स्वर्गांत देवांसह मला जिंकण्यास एकाकी कोण समर्थ आहे ? अथवा मजसहवर्तमान सर्व देवांस एका क्षणांत सशल्य कोण करणार ? ६२

[ श्रुतिः—' स होवाच प्रतर्दनः ।' ' सः-' इंद्राकडून असें बोलला गेलेला तो ' प्रतर्दन' 'ह-' खरोखर ' उवाच-' बोलला. ]

इत्युक्ते देवराजेन तदा तत्र प्रतर्दनः ।
निपत्य दण्डवद्भूमाविदं वचनमूचिवान् ॥ ६३ ॥

अन्वयः—तदा तत्र देवराजेन इत्युक्ते प्रतर्दनः दण्डवत् भूमौ निपत्य इदं वचनं ऊचिवान् ॥

अर्थ—तेव्हां तेथें देवराज इंद्रानें असें म्हटलें असतां प्रतर्दन दंडाप्रमाणें भूमीवर पडून-साष्टांग प्रणाम करून—हें वचन बोलला. ६३

[ श्रुतिः—' त्वमेव मे वृणीष्व यं त्वं मनुष्याय हिततमं मन्यस इति ।' ' त्वं एव-' तूंच—मजपुढें स्थित असलेला व हिताहित जाणणारा देवराजच ' मे-' मज हितार्थी प्रतर्दनाला—मजसाठीं ' वृणीष्व-' इष्ट वर देण्याची इच्छा कर; इष्ट वर माग, कीं 'यं-'ज्या अर्थाला 'त्वं-' तूं सर्वज्ञ 'मनुष्याय-' अज्ञानी मनुष्याला ' हिततमं-' अतिशय हितकर ' मन्यसे-' समजत असशील ' इति-' असें तो बोलला. ]

उक्तं यद्भवता वाक्यं सामरोऽहं जितस्त्वया । व्रतं मे पूरितं तेन भवता शक्र सर्वथा ॥ ६४ ॥ अपराधं क्षमस्व त्वं मम बालस्य दुर्धियः । पुष्पैरपि न ताड्या ये ते शरैस्ताडिता यतः ॥ ६५ ॥ भवन्तः पूज्यपूज्या मे सर्वे साधुविचेष्टिताः । भवन्तः सात्त्विका देवा मानुषो राजसोऽस्म्यहम् ॥ ६६ ॥ ततो रजः-

समुद्रेकात्पापमेतन्मया कृतम् ॥ सात्त्विकत्वेन भवता वरं दातुमिहोद्यतम् ॥ ६७ ॥ साधूनां समचित्तानां विषमा नास्ति धीः क्वचित् । वरं ददासि यस्त्वं हि मय्येवमपकारिणि ॥ ६८ ॥ प्रायो भवादृशाः सर्वे लोकेऽस्मिन्पुरुषोत्तमाः । उपकारं हि कुर्वन्ति मादृशे येऽपकारिणि ॥६९॥ अपकारिषु भूतेषु ये भवन्त्युपकारिणः । तैः स्तंभैर्विधृता सर्वा त्रिलोकी यज्ञमण्डली ॥ ७० ॥ उपकारेषूपकारान् प्रायः सर्वेऽपि कुर्वते । अपकारेषूपकारं त्वादृशाः केऽपि कुर्वते ॥ ७१ ॥ अहं हि रजसाविष्टो वेद्मि स्वस्मै हिताहितम् । नैव यस्माद्भवन्तं हि योद्धुमत्रागतोऽधुना ॥७२॥ महता गजयूथेन मशको यद्वदाव्रजेत् । योद्धुं तद्वदहं शक्र भवद्भिर्योद्धुमागतः ॥ ७३ ॥ अत एतादृशोऽहं हि किं वृणे हितमात्मने । त्वमेव त्रिजगन्नाथ यत्स्याद्धिततमं सदा । मह्यं मानुषरूपाय तत्प्रयच्छार्तिनाशनम् ॥ ७४ ॥

**अन्वयः**—' अहं सामरः त्वया जितः ' इति यत् वाक्यं भवता उक्तं तेन हे शक्र भवता मे व्रतं सर्वथा पूरितम् । त्वं मम बालस्य दुर्धियः अपराधं क्षमस्व । यतः ये पुष्पैः अपि न ताड्याः ते शरैः ताडिताः । साधुविचेष्टिताः भवन्तः सर्वे मे पूज्यपूज्याः । भवन्तः सात्त्विकाः देवाः, अहं राजसः मानुषः अस्मि । ततः रजःसमुद्रेकात् मया एतत् पापं कृतम् । भवता सात्त्विकत्वेन इह वरं दातुं उद्यतम् । समचित्तानां साधूनां धीः क्वचित् विषमा नास्ति । यत् त्वं हि मयि एवं अपकारिणि वरं ददासि । अस्मिन् लोके सर्वे भवादृशाः प्रायः पुरुषोत्तमाः । ये मादृशे अपकारिणि उपकारं हि कुर्वन्ति । ये अपकारिषु भूतेषु उपकारिणः भवन्ति तैः स्तम्भैः सर्वा यज्ञमण्डली त्रिलोकी विधृता । उपकारेषु प्रायः सर्वे अपि उपकारान् कुर्वते । अपकारेषु त्वादृशाः केऽपि उपकारं कुर्वते । अहं हि यस्मात् राजसाविष्टः ततः स्वस्मै हिताहितं न एव वेद्मि । तस्मात् हि भवन्तं योद्धुं अधुना अत्र आगतः । हे शक्र, यद्वत् मशकः महता गजयूथेन सह योद्धुं आव्रजेत् तद्वत् अहं भवद्भिः योद्धुं आगतः । अतः एतादृशः अहं आत्मने किं हितं वृणे । तस्मात् हे त्रिजगन्नाथ मह्यं मानुषरूपाय यत् सदा हिततमं आर्तिनाशनं तत् प्रयच्छ ॥

**अर्थ**—' मी देवांसह तुजकडून जिंकला गेलों आहें ' असें जें वाक्य तूं बोललास त्यानें हे इंद्रा, तूं माझें व्रत सर्वथा पूर्ण केलें आहेस. ६४ तूं

मज अज्ञ दुर्बुद्धीचा अपराध सहन कर ( मला क्षमा कर ) कारण जे पुष्पांनींही ताडन करण्यास योग्य नाहींत ( तर ज्यांना पुष्पेंही मोठ्या आदरानें वाहवीं लागतात ) त्यांना मीं बाणांनीं ताडन केलें. ६५ ज्यांचें विचेष्टित—आचरण उत्तम आहे असे आपण सर्व माझ्या पितृ-पितामहादि पूज्यांना पूज्य आहां. आपण सात्त्विक देव आहां व मी राजस मानुष आहें. ६६ म्हणून रजोगुणाच्या अत्यंत उद्रेकामुळें मीं हें पाप केलें आणि आपण सात्विकत्वामुळें मला वर देण्यास उद्युक्त झालां ६७ सम ब्रह्मामध्यें ज्यांचें अनुसंधानरूप चित्त असतें त्या साधूंची बुद्धि विषम [ म्ह० हा आपला व हा पर अशी ] नसते. कारण तूं मज अशा अपकार करणाऱ्यालाही वर देत आहेस. ६८ या लोकीं तुमच्या सारखे सर्व प्रायः पुरुषोत्तम असतात. कारण ते माझ्या सारख्या अपकार करणाऱ्यावरही उपकारच करितात. ६९ जे अपकार करणाऱ्या भूतांवर उपकार करणारे होतात—उपकार करितात त्या स्तंभांसारख्या पुरुषांनीं ही सर्व यज्ञसमूहरूप त्रिलोकी विशेषतः धारण केली आहे. ७० उपकार करणारांवर प्रायः सर्वही उपकार करितात. पण अपकार करणारांवर तुझ्यासारखे कांहीं विरळ पुरुषच उपकार करितात ७१. मी ज्या अर्थीं रजोगुणानें आविष्ट आहें त्या अर्थीं आपलें हित व अहित जाणत नाहीं. म्हणूनच तुमच्याशीं युद्ध करावयास मी आज येथें आलों ७२ हे इंद्रा, ज्याप्रमाणें मशक मोठ्या गजसमूहाशीं युद्ध करावयास येतो त्याप्रमाणें मी तुमच्याशीं लढण्यास आलों आहें ७३ म्हणून असा हितज्ञानशून्य असलेला मी आपल्यापाशीं कोणतें हित प्रार्थूं ? यास्तव हे त्रिलोकनाथ, मज मानुषरूपास जें सदा हिततम—आर्तिनाशकरूप असेल तें तूंच स्वतः विचार करून दे ७४.

[ श्रुतिः—' तं हेन्द्र उवाच । न वै वरोऽवरस्मै वृणीते त्वमेव वृणीष्वेति-' ' तं-' त्या प्रतर्दनास ' ह-' खरोखर ' इन्द्रः-' इंद्र ' उवाच-' म्हणाला—' वै-' ही गोष्ट प्रसिद्ध आहे कीं ' अवरस्मै-' दुसऱ्यासाठीं ' वरः-' दुसरा ' न वृणीते-' वर मागत नाहीं. यास्तव ' त्वं एव-' तूंच ' वृणीष्व-' आपल्यासाठीं वर माग ' इति-' असें इंद्र म्हणाला. ]

एवमुक्तो ह्ययं शक्रः प्रतर्दनमथाब्रवीत्। अयाचितं वरं कश्चित् स्वधिया नैव यच्छति ॥ परस्मै तत एव त्वं वृणीष्वैव प्रतर्दन ७५

**अन्वयः**—अथ एवं उक्तः शक्रः हि प्रतर्दनं अब्रवीत्। कश्चित् परः परस्मै अयाचितं वरं स्वधिया एव न प्रयच्छति। ततः हे प्रतर्दन त्वं एव वृणीष्व ॥

अर्थ—-तेव्हां याप्रमाणें बोलला गेलेला इंद्र प्रतर्दनाला म्हणाला "कोणी दुसरा दुसऱ्याला न मागितलेला वर आपल्या बुद्धीनेंच—स्वेच्छेनेंच देत नाहीं. यास्तव हे प्रतर्दना, तूंच वर माग. ७५.

[श्रुतिः——' एवमवरो वै किल म इति होवाच प्रतर्दनः-' ' एवं-' असें इंद्राकडून बोलला गेलेला ' प्रतर्दन ' ' अवरः वै-' तर मग तो प्रसिद्ध अवर होईल म्ह० वर देतों अशी प्रतिज्ञा करून तो दिलेला नाहीं, असें होईल, ' मे ' मज हिताहितज्ञानशून्य मनुष्याला प्रतिज्ञात अर्थ दिला नाहीं, असें होईल, ' इति होवाच ' असें म्हणाला. ]

एवमुक्तः पुनः शक्रं बुद्धिमान्स प्रतर्दनः। उवाच न्यायसहितं वचनं सत्यवादिनम् ॥७६॥ सत्यमेतत्त्वया शक्र यदुक्तमधुना वचः। किं तु तद्विषमेष्वेव वर्तते न भवादृशे ॥ ७७ ॥ त्वां विनात्र हि को नाम रिपवे दुष्टचेतसे। वरं दद्यादतो नूनं भवान्न विषमः क्वचित् ॥ ७८ ॥ ततस्त्वया वरो देयः प्रतिज्ञातोऽस्ति मे यदि। देहि मह्यं हिततमं बुद्ध्वा धिषणया स्वया ॥ ७९ ॥ वरः श्रेष्ठ इति प्रोक्तः श्रेष्ठो हिततमो भवेत्। तं न वेद्मि ततोऽज्ञानाद्याचितो न वरो भवेत् ॥ ८० ॥

**अन्वयः**—एवं उक्तः सः बुद्धिमान् प्रतर्दनः सत्यवादिनं शक्रं पुनः न्यायसहितं वचनं उवाच। हे शक्र अधुना त्वया यत् वचः उक्तं एतत् सत्यं। किंतु तत् विषमेषु एव वर्तते भवादृशे न। अत्र हि त्वां विना कः नाम दुष्टचेतसे रिपवे वरं दद्यात्। अतः नूनं भवान् क्वचित् विषमः न। ततः यदि त्वया मे देयः वरः प्रतिज्ञातः तर्हि स्वया धिषणया हिततमं वरं बुद्ध्वा मह्यं देहि। श्रेष्ठः वरः

१ श्रुतींतील ' वरः ' या शब्दाचा हा अर्थ आहे. २ कारण स्वेच्छेनें देऊं लागल्यास त्याचें वरत्वच नष्ट होईल.कारण ज्याची याचना केली जाते तोच वर होय.

इति प्रोक्तः । श्रेष्ठः हिततमः भवेत् । अहं तं न वेद्मि । अतः अज्ञानात् याचितः वरः न भवेत् ॥

अर्थ—इंद्राकडून याप्रमाणें बोलला गेलेला तो बुद्धिमान् प्रतर्दन सत्यवादी इंद्रास पुनः युक्तियुक्त वाक्य बोलला ७६ हे इंद्रा, आतां तूं जें वचन बोललास तें खरें आहे. पण तें विषम पुरुषांमध्येंच—भेददर्शी लोकांमध्येंच असतें. तुझ्या सारख्या समचित्त पुरुषामध्यें तें संभवत नाहीं ७७. ( तुझें समदर्शित्व मला वर देण्यास तयार होणें, यावरूनच सिद्ध होतें, असें प्रतर्दन सांगतो--) या जगांत तुजवाचून दुसरा कोण बरें दुष्टचित्त शत्रूला वर देईल ? तस्मात् खरोखर तूं कोठेंही विषम नाहींस.७८ त्यामुळें जर तूं मला देय वराची ( देण्यास योग्य असलेल्या वराची ) प्रतिज्ञा केली आहेस तर आपल्या बुद्धीनेंच अत्यंत हित वर कोणता आहे तें निश्चित करून मला दे. ७९. श्रेष्ठ पदार्थालाच रूढीनें वर असें म्हटलें आहे आणि श्रेष्ठ हिततमच असतो. पण मी तर त्याला जाणत नाहीं. त्यामुळें मीं अज्ञानानें जर एकादा वर मागितला तर तो कदाचित् अवर—अश्रेष्ठही असेल. ( त्यामुळें तुझी वरदानाविषयींची प्रतिज्ञा पुरी होणार नाहीं. यास्तव तूंच आपल्या प्रतिज्ञेचें पालन करण्यासाठीं वर द्यावास, असा भावार्थ. ) ८०.

[ श्रुतिः—'अथो खल्विन्द्रः सत्यादेव नेयाय । सत्यं हीन्द्रः ।' 'अथो-' प्रतर्दनाच्या अशा भाषणानंतर 'खलु-' खरोखर 'इन्द्रः-' सत्य वाद्यांतील अग्रगण्य देवराज 'सत्यात् ' मी तुला वर देतों अशी जी प्रतिज्ञा केली होती तिच्यापासून 'न इयाय-'ढळला नाहीं. 'हि' कारण 'सत्यं-' यथार्थ स्वरूप हाच ' इन्द्र ' आहे. तो स्वतः वरदाता असूनही स्वतःच स्वतःला वराची याचना करता झाला, असा भावार्थ. ]

इत्युक्ते भगवानिन्द्रः पुनस्तोषमुपागतः ॥
प्रतर्दनस्य संवीक्ष्य चातुरीं बुद्धिजामिमाम् ॥ ८१ ॥

अन्वयः--इति उक्ते भगवान् इन्द्रः प्रतर्दनस्य इमां बुद्धिजां चातुरीं संवीक्ष्य पुनः तोषं उपागतः ॥

अर्थ—त्यानें असें म्हटलें असतां भगवान् इंद्र प्रतर्दनाची ही बुद्धिजन्य चातुरी[चातुर्य] पाहून पुनः संतुष्ट झाला. ८१.

('इंद्र जर संतुष्ट झाला होता तर त्यानें तत्काल विद्या देणेंच उचित असल्यामुळें श्रुतींतील 'इंद्र सत्यापासून ढळला नाहीं' हें म्हणणें उपपन्न होत नाहीं. कारण प्रतर्दनाला विद्या देण्यास जर कांहीं प्रतिबंध असेल तरच त्यानें आपलें सत्य पाळण्यासाठीं त्या प्रतिबंधालाही न जुमानतां विद्या दिली तो सत्यापासून ढळला नाहीं, असें म्हणण्यांत स्वारस्य आहे,' अशी कोणी येथें शंका घेईल म्हणून इंद्राला त्यावेळीं विधीच्या वाक्याचें स्मरण झालें व तें विद्यादानाला प्रतिबंधक होतें, तथापि त्यानें प्रतर्दनाला विद्या देऊन आपली प्रतिज्ञा पूर्ण केली, असें या पुढील सोळा श्लोकांत सांगतात. त्यांतील पहिल्या सात श्लोकांनीं 'विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम गोपाय मा शेवधिष्टेऽहमस्मि । असूकायानृजवे शठाय न मा दद्या वीर्यवती यथा स्याम् ।' या श्रुतीच्या अर्थाचा अनुवाद करितात—)

ब्रह्मविद्यातिसंखिन्ना ब्रह्मिष्ठं ब्राह्मणं ययौ ॥ वारांगनासमानां हि मा कृथाः सर्वसेविताम् ॥ ८२ ॥ गोपाय मां सदैव त्वं कुलजामिव योषितम् । शेवधिस्त्वक्षयस्तेऽहमिह लोके परत्र च ॥ ८३ ॥ अथैवं चेदशक्तोऽसि कर्तुं मद्वचनं द्विज ॥ जनोपकारनिरतो वदान्योऽतिकृपावृतः ॥ ८४ ॥ तथापि गुणहीनाय न मां दद्याः कथंचन ॥ स्वसुतामिव रूपाढ्यां पुरुषे विगतस्पृहे ॥ ८५ ॥ एतेऽगुणा मम सदा ब्रह्मन्नत्यन्तदुःखदाः ॥ निन्दा गुणवतां तद्वत्सर्वदाऽऽर्जवशून्यता ॥ ८६ ॥ इंद्रियाधीनता नित्यं स्त्रीसंगोऽप्यविनीतता ॥ कर्मणा मनसा

१ विद्या ब्राह्मणाकडे आली व म्हणाली माझें रक्षण कर. मी तुझा निधि आहें. असूया करणारा, सरळ स्वभावाचा नसलेला व शठ यांना माझें दान करूं नको. म्हणजे मी वीर्यवती—स्वफलदानास समर्थ होईन' असा भावार्थ. मनुस्मृति व छान्दोग्य ब्राह्मण यांतही अशाच अर्थाचीं वाक्यें आहेत.

**वाचा गुरौ भक्तिविवर्जनम् ॥ ८७ ॥ एवमाद्या हि येषां स्युस्तेभ्यो वर्जय मां सदा ॥ एवं हि कुर्वतो नित्यं कामधेनुरिवास्मि ते ॥ वन्ध्यान्यथा भविष्यामि लतेव फलवर्जिता ॥८८॥**

**अन्वयः**--ब्रह्मविद्या अतिसंखिन्ना सती ब्रह्मिष्ठं ब्राह्मणं ययौ । ( गत्वा च इद आह-) हे ब्राह्मण, त्वं मां सर्वजनसेवितां वाराङ्गनासमानां मा कुथाः । त्वं मां कुलजां योषित इव सदैव गोपाय । यतः अहं ते इहलोके परत्र च अक्षयः शेवधिः अस्मि । अथ हे द्विज जनोपकारनिरतः वदान्यः अतिकृपावृतः त्वं चेत् एवं मद्वचनं कर्तुं अशक्तः असि तथापि रूपाढ्यां स्वसुतां विगतस्पृहे पुरुषे इव गुणहीनाय मां कथंचन न दद्याः। हे ब्रह्मन् एते अगुणाः मम सदा अत्यन्तदुःखदाः -गुणवतां निन्दा, तद्वत् सर्वदा आर्जवशून्यता, नित्यं स्त्रीसंगः, अपि अविनीतता, कर्मणा-मनसा-वाचा गुरौ भक्तिविवर्जनं एवमाद्याः हि दोषाः येषां स्युः तेभ्यः मां सदा वर्जय । एवं हि कुर्वतः ते अहं नित्यं कामधेनुः इव अस्मि । अन्यथा फलवर्जिता लता इव वन्ध्या भविष्यामि ॥

**अर्थ**—ब्रह्मविद्येची अभिमानिनी देवता अनधिकाऱ्याला माझी प्राप्ति होईल कीं काय म्हणून अतिशय खिन्न होत्साती ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणाजवळ गेली ( व त्याच्यापाशीं जाऊन म्हणाली ) हे ब्राह्मणा, तूं मला सर्व लोकांकडून सेवित अशा वारांगनेसारखी करूं नकोस. ८२ तर तूं मला कुलीन स्त्रीप्रमाणें सर्वदाच सुरक्षित ठेव ( रहस्यभूत कर ) कारण मी तुझा इहलोकीं व परलोकीं-(उपयोगी पडणारा ) अक्षय निधि आहें. ( दोन्ही लोकीं तुजवर उपकार करणारी आहें.) ८३ पण हे ब्राह्मणा, तूं लोकोपकारामध्यें तत्पर, दाता व अतिकृपायुक्त असल्यामुळें जर हें माझें वचन पूर्ण करण्यास असमर्थ असशील तर ८४ निदान आपली रूपसंपन्न कन्या जसा कोणी निःस्पृह-क्लीब पुरुषाला देत नाहीं त्याप्रमाणें तूं मला गुणहीन पुरुषाला तरी केव्हांही देऊं नको ८५ हे ब्राह्मणा, हे पुढें सांगितलेले अगुण-दोष मला नेहमीं अत्यंत दुःख देणारे आहेत. ( ते दोषच सांगतात- ) गुणवान् पुरुषांवर दोषांचा आरोप करणें, ही गुणवानांची निंदा [ म्ह० असूया हा एक दोष ] त्याचप्रमाणें सर्वदा आर्जवशून्यता—कौटिल्य ८६ (हा दुसरा दोष, आतां

चार प्रकारचें शठत्व सांगतात–) इंद्रियांच्या अधीन होणें, नित्य स्त्री-संग, अनम्रता, व शरीर, मन व वाणी यांनीं गुरूविषयीं भक्ति न करणें, ८७ इत्यादि दोष ज्यांच्या ठिकाणीं असतील त्यांना माझें दान करणें, यापासून तूं सदा निवृत्त हो. याप्रमाणें करणाऱ्या तुला मी सतत कामधेनूसारखी सर्व इष्ट देणारी आहें. पण याच्या उलट आचरण केल्यास मी फलविरहित लतेप्रमाणें वंध्या–वांझ–निष्फळ होईन. ८८.

(आतां या पुढील पांच श्लोकांनीं- 'यः संतृणत्त्यावितथेन कर्णौ तमो हरन्नमृतं संप्रयच्छन् । तं विद्यात्पितरं मातरं च तस्मै न द्रुह्येत्कृतमस्य जानन् । ' हें श्रुतिवाक्य विद्यामुखानें अर्थतः बोलवितात–)

अपि न्याय्यं वदाम्यत्र नोपकाराय ते द्विज ॥ यो नाशयेद्दुर्भेद्यमादित्याद्यैरपीश्वरैः ॥ ८९ ॥ तमःस्तोमं हृदि स्वस्य सत्यादेवात्मबोधनात् ॥ ब्रह्म त्वं भवसीत्यादि पाययेच्च वचोऽमृतम् ॥ ९० ॥ कर्णावदुःखभाजौ च कुर्वन्नाबोधनं सदा ॥ स एवास्य पिता तद्वन्माता चात्र न चापरौ ॥ यतोऽस्य संततौ पातात्सर्वं दुःखं विनश्यति ॥ ९१ ॥ अन्ययोः संततौ पित्रोर्दुःखं पुत्रस्य जायते ॥ यस्य नैव प्रतीकार उक्तायाः संततेः परः ॥ ९२ ॥ ततो ब्रह्मात्मबोधस्य दात्रे पित्रे सदैव हि ॥ न द्रुह्येद्गुरवे तस्मै कर्मणा मनसा गिरा ॥९३॥

अन्वयः—हे द्विज, अत्र न्याय्यं वदामि । न केवलं तव उपकाराय एव वदामि । यः ईश्वरैः अपि आदित्यादिभिः दुर्भेद्यं स्वस्य हृदि वर्तमानं तमःस्तोमं सत्यात् एव आत्मबोधनात् नाशयेत् च ब्रह्म त्वं भवसि इत्यादि वचोऽमृतं कर्णौ अदुःखभाजौ कुर्वन् पाययेत् तथा आसमंतात् युक्तिभिः अपि बोधनं कुर्वन् वचोऽमृतं सदा पाययेत् स एव अस्य पिता तद्वच्च माता । अत्र न अपरौ मातापितरौ । यतः अस्य संततौ पातात् सर्वं दुःखं विनश्यति । अन्ययोः पित्रोः

१ विद्येला रहस्यभूत करणाऱ्या व तिचें सत्पात्रीं दान करणाऱ्या तुला असा भावार्थ. २ जो अज्ञानाचें हरण करणारा व अमृतत्वाचें–मोक्षाचें संप्रदान करणारा गुरु शिष्याचे दोन्ही कान सत्य वेदविद्येनें आच्छादित करतो त्याला पिता व माता समजावें. त्यानें केलेल्या उपकारांस जाणणाऱ्या कृतज्ञ शिष्यानें त्याचा द्रोह–अनिष्टचिंतन करूं नये. असा या वाक्याचा अर्थ आहे.

संततौ पातात् पुत्रस्य दुःखं जायते यस्य प्रतीकारः उक्तायाः संततेः परः न एव विद्यते । अतः ब्रह्मात्मबोधस्य दात्रे पित्रे तस्मै गुरवे कर्मणा मनसा गिरा सदैव हि न द्रुह्येत् ॥

अर्थ—हे ब्राह्मणा, याविषयीं म्ह० दोषवानाला विद्या देऊं नये याविषयीं न्याय—ज्याच्यावर उपजीविका करावयाची त्याचा विघात करूं नये अशी युक्ति—सांगतों. मी केवळ तुझ्या उपकारासाठींच हें सांगत नाहीं.(तर असा न्यायच आहे, असा भाव.) जो गुरु तमाचा नाश करण्यास अतिशय समर्थ अशा आदित्यादिकांनाही दुर्भेद्य असलेल्या शिष्याच्या हृदयांत राहणाऱ्या अज्ञानाख्य तमःसमूहाचा सत्य आत्मबोधानेंच अत्यंत नाश करतो, त्याचप्रमाणें ' तूं ब्रह्म आहेस ' इत्यादि महावाक्यरूप वचनामृत दोन्ही कानांना अदुःखभाक् करीत पाजवितो, त्याचप्रमाणें सर्वव्यापी युक्तींनीही बोध करणारा जो वरील वचनामृत सदा पाजवितो तोच याचा पिता व तशीच माता आहे. ( कारण हा गुरु शिष्याचें ब्रह्मात्मरूप नित्य शरीर अभिव्यक्त करतो. ) येथें—या अध्यात्म शास्त्रांत लौकिक शरीर करणारे मातापिता[1] नव्हेत. कारण या गुरूच्या संततींत—विद्यासंप्रदायांत प्रवेश केल्यानें सर्व दुःख नाश पावतें ८९-९१ लौकिक मातापित्यांच्या संततींत प्रवेश केल्यामुळें पुत्राला तसलें संसारदुःख होतें कीं ज्या दुःखाचा प्रतीकार वरील विद्यासंप्रदायरूप गुरुसंततींत प्रवेश करणें, याहून अन्य नाहीं. ( तर तोच एक त्या दुःखाच्या निवृत्तीचा उपाय आहे. ) ९२ तस्मात् ब्रह्मात्मबोधाचा दाता, त्यामुळेंच पिता व माता, असा जो गुरु त्याचा शरीर, वाणी व मन यांनीं केव्हांही द्रोह करूं नये. ( असूयकादिक त्याचा द्रोह—अनिष्टचिंतन करितात. म्हणून त्यांना विद्या देऊं नये, असा अभिप्राय ) ९३.

एतन्मयात्र कथितं ब्रह्मविद्याप्रदे गुरौ ॥ वेदः सर्वार्थशिक्षासु

---

१ प्रश्नोपनिषद्भाष्यार्थ पृ.१२७।२८पहा. 'पा-' रक्षणे व 'मान्' पूजायां या धातूंस तृच्प्रत्यय लागून पिता व माता हे शब्द झाले आहेत. ब्रह्मविद्या देणारा गुरु शिष्याचें संसारभयापासून रक्षण करतो,व स्वाराज्यपदप्रदानानें पूजकही आहे.त्यामुळें त्याला रक्षक या अर्थी पिता व पूजक या अर्थी माता असें म्हणतां येतें.

गुरवे तद्धि मन्यते ॥९४॥ अध्यापिता हि ये शिष्या मन्यन्ते ते गुरुं स्वकम् ॥ गुरौ यथैते वर्तन्ते तथा विद्यापि तेष्विह ॥ ९५ ॥ गुरुभक्तस्ततो यः स्याद्विद्यायाः श्रवणे तथा ॥ आदृतस्त्वप्रमादी च मेधावी स्त्रीविवर्जितः ॥ ९६ ॥ ब्रयास्त्वं यदि ते वक्तुमिच्छा स्याद्द्विजसत्तम ॥ ब्रह्मविद्यामिमां तस्मै रक्षको यदि मे भवेत् ॥ ९७ ॥

**अन्वयः**––मया अत्र एतत् ब्रह्मविद्याप्रदे गुरौ कथितं । परंतु वेदः–आचार्यदेवो भव इत्यादिरूपः–सर्वार्थशिक्षासु गुरवे तत् मन्यते । लोके अपि ये शिष्याः येन अध्यापिताः ते तं स्वकं गुरुं मन्यन्ते । यथा एते गुरौ वर्तन्ते तथा विद्या अपि तेषु इह वर्तते । ततः यः गुरुभक्तः, तथा विद्यायाः श्रवणे आदृतः, अप्रमादी, मेधावी, च स्त्रीविवर्जितः स्यात् यदि च मे रक्षकः भवेत् तर्हि हे द्विजसत्तम तस्मै इमां ब्रह्मविद्यां यदि ते वक्तुं इच्छा स्यात् तदा त्वं ब्रूयाः ॥

**अर्थ**—मी येथें हें ब्रह्मविद्या देणाऱ्या गुरूविषयीं ( मुख्य वृत्तीनें ) सांगितलें आहे. पण ' आचार्यदेवो भव ' इत्यादि रूप वेद सर्व लौकिक अर्थांच्या शिक्षणांतही जा गुरु त्याला उद्देशूनही हें वाक्य आहे, असें मानतो. ९४ व्यवहारांतही ज्या शिष्यांस ज्यानें एकादी विद्या किंवा कला शिकविली असते ते त्याला आपला गुरु मानतात, त्याचप्रमाणें ते शिष्य गुरूच्या ठिकाणीं जितका आदर ठेवून त्याच्याशीं येथें वर्तन करितात तशी विद्याही त्यांच्या ठिकाणीं फलद्रूप होते, हें प्रसिद्ध आहे ९५. त्यामुळें जो विद्यागुरूचा परम भक्त असेल, त्याचप्रमाणें विद्येच्या श्रवणाविषयीं अत्यंत श्रद्धावान् असेल, तसाच अप्रमादी म्ह० सावधान असेल, ज्याची मति धारणाशाली असेल, व जो स्त्रीविवर्जित म्ह० ब्रह्मचर्यवान् असेल, तसाच तो जर मज विद्येचा रक्षक–रक्षण करणारा असेल तर हे श्रेष्ठ ब्राह्मणा, त्याला ही ब्रह्मविद्या, तुला ती सांगण्याची जर इच्छा असेल तर, तूं सांग ९६, ९७.

इति विद्यावचः स्मृत्वा संशयं परमं गतः ॥
सत्यपाशाभिबद्धः सन्निन्द्रः सत्यात्मरूपधृक् ॥ ९८ ॥

**अन्वयः**––इति विद्यावचः स्मृत्वा सत्यात्मरूपधृक् इन्द्रः सत्यपाशाभिबद्धः सन् परमं संशयं गतः ॥

अर्थ—असें हें विद्येचें वचन स्मरून सत्यात्मरूप जें धर्मस्वरूप त्यानें धीट–प्रगल्भ झालेला इंद्र सत्यरूपी पाशानें सर्वतः बद्ध झालेला असूनही मोठ्या संशयांत पडला. ( ह्याला विद्या द्यावी कीं देऊं नये, असा त्याला संशय आला. वस्तुतः त्यानें वर देण्याचें वचन दिलेलें असल्यामुळें तो देणेंच युक्त होतें. तथापि इतक्यांत त्याला वरील सोळा श्लोकांत वर्णिलेलें विद्येचें वचन आठवलें. त्यामुळें तो सत्यरूपी पाशानें बद्ध असूनही गोंधळला. तथापि तो सत्यस्वरूप धर्मानें अत्यंत प्रगल्भ झालेला असल्यामुळें व धर्ममर्यादेचा स्थापक असल्यामुळें परम धर्म जें सत्य त्यापासून ढळला नाहीं ) ९८.

(आतां त्यानें संशयप्रयुक्त विचार कसा केला तें सांगण्यासाठीं प्रथम ' विद्या देऊं नये ' ही पूर्वपक्षाची कोटी दाखवितात–)

**नायं सर्वैर्गुणैर्युक्तो विद्योक्तैर्हि प्रतर्दनः ॥ यद्यप्यस्मिन् गुणाः सन्ति तथाप्येष रिपुर्हि नः ॥ ९९ ॥ अथवा रिपुतानेन परित्यक्तात्र मद्वरात् ॥ ततः सर्वगुणोपेतो विद्याया भाजनं भवेत् ॥ १०० ॥ बहुना किं विचारेण गुणी वाप्यगुणस्त्वयम् ॥ विद्यां हिततमामस्मै कथयिष्यामि सर्वथा ॥ १०१ ॥ वरं ददामि ते यस्मादिति पूर्वं मयेरितम् ॥ सत्यं तत्सर्वथा कुर्वे आत्मविद्याप्रदानतः ॥ १०२ ॥**

**अन्वयः**—अयं हि प्रतर्दनः विद्योक्तैः सर्वैः गुणैः न युक्तः । ( तस्मात् अस्मै विद्या न देया । ननु प्राणाग्निहोत्रनिष्ठतया शुद्धान्तःकरणत्वात् अयं गुणवान् एव इति आशंक्य आह–) यद्यपि अस्मिन् गुणाः सन्ति तथापि एषः नः रिपुः हि । ( विद्या देया इति सिद्धान्तकोटिमादत्ते–) अथवा अत्र मद्वरात् अनेन रिपुता परित्यक्ता । ततः सर्वगुणोपेतो विद्यायाः भाजनं भवेत् । बहुना विचारेण किं गुणी वा अगुणः तु भवतु सर्वथा अहं अस्मै हिततमां विद्यां कथयिष्यामि । ते वरं ददामि इति यस्मात् मया पूर्वं ईरितं तस्मात् सर्वथा तत् आत्मविद्याप्रदानतः सत्यं कुर्वे ॥

अर्थ—हा प्रतर्दन विद्येनें वर सांगितलेल्या सर्व गुणांनीं युक्त नाहीं. (यास्तव याला विद्या देणें उचित नव्हे. 'अहो पण हा प्राणाग्निहोत्रनिष्ठ

असल्यामुळें शुद्धचित्त झाला आहे. त्यामुळें हा गुणवान्‌च आहे,' अशी आशंका घेऊन सांगतात–) जरी याच्या मध्यें गुण असले तरी हा आमचा रिपु आहे. ९९ ( आतां 'विद्या द्यावी' या सिद्धान्तकोटीचा आश्रय करितात–) अथवा येथें माझ्या वराचें आलोचन करून–मी वर देण्यास तयार झालों आहें असें पाहून यानें शत्रुत्व सोडलें आहे. त्यामुळें हा सर्वगुणसंपन्न व विद्येचें पात्र आहे. १०० पुष्कळ विचार करून काय करावयाचें आहे ? हा गुणी असो कीं गुणरहित असो; तो कसाही जरी असला तरी मी याला हिततमा विद्या सांगेन. १०१ 'तुला वर देतों' असें ज्याअर्थी मीं पूर्वी म्हटलें आहे त्याअर्थी कांहीं झालें तरी मी तें आपलें वचन आत्मविद्याप्रदान करून सत्य करतों १०२.

[ श्रुतिः—' स होवाच । मामेव विजानीहि । एतदेवाहं मनुष्याय हिततमं मन्ये यन्मां विजानीयात् ॥ ' ' सः-' तो सत्यपाशबद्ध इंद्र ' ह उवाच-' खरोखर बोलला–प्रतर्दनासाठीं आपल्याला वराची याचना करता झाला. ' माम् एव-' मज आनन्दात्म्यासच ' विजानीहि-' तूं साक्षात् जाण. ( दुसऱ्या कोणालाही जाणूं नको. ) ' एतत् एव-' हें माझें ज्ञानच ' अहं-' तुला वर देणारा व तुजसाठीं वर मागणारा मी ' मनुष्याय हिततमं-' मनुष्याला अत्यंत हितकर आहे असें ' मन्ये-' समजतों. ( ' एतत्-' शब्दाचाच अर्थ स्पष्ट कारितात–) ' यत्-' जें ' मां ' मला–मज आनंदात्म्याला 'विजानीयात्-' साक्षात् जाणावें, [हेंच ज्ञान मनुष्याला हिततम आहे, असा माझा निश्चय आहे. ]

इति संचिन्त्य भगवानूचे शक्रः प्रतर्दनम् ॥

अन्वयः—इति संचिन्त्य भगवान् शक्रः प्रतर्दनं ऊचे ॥

अर्थ–असा चांगला विचार करून भगवान् इंद्र प्रतर्दनास म्हणाला:—

मामेव सर्वजगतामात्मानं बुद्धिसाक्षिणम् ॥ नभोवद्वहिरन्तश्च व्याप्य सर्वमवस्थितम् १०३ स्वप्नदृष्टसमैः सर्वप्रपंच रहितं शिवम् ॥ देशकालस्वरूपाख्यभेदत्रयविवर्जितम् १०४ स्वसजातिविजात्याख्यभेदबीजविभावसुम् ॥ अधिष्ठानं समस्तस्य सदा

सदसदात्मनः १०५ प्रपञ्चस्य यथारज्जुः सर्पादेरेकमीश्वरम् ॥
प्रतर्दन विजानीहि तुभ्यं हिततमं त्विदम् ॥ १०६ ॥

**अन्वयः**—हे प्रतर्दन, सर्वजगतां आत्मानं बुद्धिसाक्षिणं, नभोवद्बहिरन्तश्च सर्वं व्याप्य अवस्थितं, स्वप्नदृष्टसमैः सर्वप्रपञ्चैः रहितं, शिवं, देश-काल-स्वरूपाख्यभेदत्रयविवर्जितं, स्व-सजाति विजात्याख्यभेदबीजविभावसुं, यथा सर्पादेः रज्जुः तथा सदसदात्मनः समस्तस्य प्रपंचस्य सदा अधिष्ठानं, एकं, ईश्वरं मां एव विजानीहि, तुभ्यं तु इदं एव हिततमं ॥

**अर्थ** – हे प्रतर्दना, सर्व जगाचा आत्मा, बुद्धिसाक्षी, आकाशाप्रमाणें आंत व बाहेर सर्वांस व्यापून राहिलेला १०३ स्वप्नांत पाहिलेल्या पदार्थांसारख्या स्थूल-सूक्ष्म-कारणरूप सर्व प्रपंचांनीं रहित, म्हणूनच शिव—तुरीय, देश-काल-वस्तूंनीं ज्यांचें निरूपण होतें अशा भेदत्रयानें वर्जित म्ह. देश-काल-वस्तुपरिच्छेदशून्य, १०४ स्वगत, सजातीय व विजातीय भेदरूप बीजाला दग्ध करणारा अग्नि, जशी सर्पादिकांची रज्जु त्याप्रमाणें समस्त प्रपंचाचें सदा अधिष्ठान, म्हणूनच एक व अज्ञानावस्थेंत ईश्वर अशा मलाच तू जाण. तुज मनुष्याला हेंच ज्ञान अतिशय हित आहे, १०५, १०६.

न सुखं स्वर्गगं तद्वद्ब्रह्मलोकस्थितं परम् ॥ ससाधनं मनुष्येभ्यः
कदाचिद्विद्यते हितम् १०७ कुतो मनुष्यलोकादौ स्थितं नश्वर-
मल्पकम् ॥ हितं भवेन्मनुष्येभ्यो वनितादिसमुद्भवम् ॥ १०८ ॥

**अन्वयः**—स्वर्गगं सुखं तद्वत् ब्रह्मलोकस्थितं परं सुखं ससाधनं मनुष्येभ्यः कदाचित् हितं न विद्यते । कुतः मनुष्यलोकादौ स्थितं नश्वरं अल्पकं वनितादिसमुद्भवं सुखं मनुष्येभ्यो हितं भवेत् ॥

**अर्थ**—स्वर्गगत कर्मफलरूप सुख त्याचप्रमाणें ब्रह्मलोकांतील उपासनेचें फलरूप परम सुख ससाधन—साधनाधीन आहे. त्यामुळें तें मनुष्यांना कधींही हितकर नाहीं. १०७ आणि स्वर्ग व ब्रह्मलोक यांतील कर्मजन्य व उपासनाजन्य फलरूप सुखही जर मनुष्यांना हितावह नाहीं तर मनुष्यलोकादिकांत असलेलें नश्वर, क्षुद्र, स्त्रीप्रभृति विषयांपासून होणारें सुख त्यांना हितावह कोठून असणार ? १०८

कदलीस्तंभवत्सर्वो देहः सारविवर्जितः ॥ जलबुद्बुदवच्चापि विनश्यत्येष तत्क्षणात् १०९ अस्मिन्यत्साधनैः साध्यं सुखं तद्दुःखमेव हि । आनंदात्मानमेवैकमिन्द्रं मां परिहाय च॥११०॥

अन्वयः—सर्वः देहः कदलीस्तम्भवत् सारविवर्जितः । एषः जलबुद्बुदवत् च अपि तत्क्षणात् विनश्यति । च एकं मां आनन्दात्मानं इन्द्रं एव परिहाय अस्मिन् यत् साधनैः साध्यं सुखं तत् दुःखं एव हि ॥

अर्थ—( कारण ) सर्व देह केळीच्या खांबाप्रमाणें सारविरहित आहे. ( लाकडी खांबासारखा तो लठ्ठ व उंच जरी दिसला तरी त्यांत एखाद्या मंदिराचा किंवा गृहाचा आधारस्तंभ होण्याचें सामर्थ्य नसतें, हें प्रसिद्ध आहे. तसाच हा देहही निःसार–स्थिरांशशून्य आहे. ) हा पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें तत्क्षणीं(पाहतां पाहतां)नष्टही होतो. १०९ शिवाय एकट्या मज आनन्दात्म्या इंद्राला सोडून या शरीरांत साधनांनीं साध्य होणारें जें सुख तें दुःखच होय. ११०

ततो हितं जगत्यस्मिन्नास्ति किंचित्कदाचन ॥
कुतो हिततरं वा स्यादाशा हिततमं प्रति ॥ १११ ॥

अन्वयः—ततः अस्मिन् जगति किंचित् हितं कदाचन नास्ति । यदा एवं तदा हिततरं हिततमं वा प्रति कुतः आशा स्यात् ॥

अर्थ—( सारांश ) त्यामुळें या जगांत कांहीं एक हित केव्हांही नाहीं आणि असें जेव्हां आहे तेव्हां हिततर व हिततम यांच्या अस्तित्वाविषयीं आशा कोठची ? १११

(' अहोपण या जगांत जर मुळींच सुख नाहीं तर आत्मज्ञानाला 'हिततम' असें कसें म्हणतां?' अशी आशंका घेऊन 'ज्याप्रमाणें कल्पित शरीरत्रयाच्या अपेक्षेनें शुद्ध तुरीय–चतुर्थ सांगितलें जातें त्याप्रमाणें भ्रामक ऐहिक हिताच्या अपेक्षेनें ज्ञानाला हिततम म्हटलें आहे ' असें उत्तर सांगतात–)

तथापि नरदेवादेः सुखं हितमितीरितम् ॥
विरागस्तस्य लोकेऽस्मिन् ज्ञेयो हिततरस्ततः ॥ ११२ ॥

अन्वयः--तथापि नरदेवादेः सुखं हितं इति ईरितम् । ततः तस्य विरागः अस्मिन् लोके हिततरः ज्ञेयः ॥

अर्थ--तथापि--जगांत हितादिक जरी नाहीं तरी-- लौकिक राजादिकांचें जें सुख तें हित म्हणून म्हटलें आहे. पण त्याहून त्या सुखाविषयीं जो विराग--वैराग्य--तो या लोकीं अधिक हित जाणावा. ११२

ब्रह्मलोके तथा स्वर्गे मानुषे वा न विद्यते। विशेषः को हि राजेन्द्रसुखेविषयजे सदा ॥ ११३ ॥ आहारोऽस्ति हि सर्वत्र विविधः सर्वदेहिनाम्। देहाश्च सेन्द्रियास्तद्वल्ललनाश्च मनोरमाः । पारतन्त्र्यं च सर्वत्र विद्यते सर्वदेहिनाम् ॥ ११४ ॥

अन्वयः—हे राजेंद्र ब्रह्मलोके तथा स्वर्गे वा मानुषे विषयजे सुखे विशेषः न विद्यते। हि सदा कः विशेषः। सर्वदेहिनां विविधः आहारः सर्वत्र अस्ति हि। तद्वत् सेंद्रियाः देहाः। च मनोरमाः ललनाः। च सर्वदेहिनां पारतन्त्र्यं सर्वत्र विद्यते ॥

अर्थ--( ' अहो पण ऐहिक सुख हित असूं दे,व पारलौकिक सुख त्याहून उत्कृष्ट असल्यामुळें हिततर असूं दे, ' म्हणून म्हणाल तर त्या दोन प्रकारच्या म्ह० ऐहिक व पारलौकिक सुखांत विशेष काय आहे? स्वरूपतः विशेष आहे कीं साधनतः? असा विकल्प करून त्या दोन्ही प्रकारच्या सुखांत दोन्ही प्रकारचा विशेष नाहीं, असें या दोन श्लोकांनीं सांगतात--) हे राजेंद्रा, ब्रह्मलोकांतील, स्वर्गांतील किंवा मानुषलोकांतील विषयजन्य सुखांत कांहीं विशेष नाहीं.कारण त्यांच्या अनुकूलत्वादि स्वरूपांत सदा कोणता विशेष असणार? ११३. सर्व प्राण्यांचा विविध आहार ब्रह्मलोकादि सर्व लोकांत एकसारखाच आहे. इंद्रियांसह देह एकसारखेच आहेत. मनोरम स्त्रियाही एकसारख्याच आहेत. तसेंच सर्व प्राण्यांचें पारतंत्र्य सर्व लोकीं समान आहे. ( राजा, श्रीमान् इत्यादिकांची सेवा केल्यास तिचें फळ जसें त्यांच्या अधीन असतें तसेंच देवादिकांच्या आराधनेचें फळही त्यांच्या अधीन असणेंच योग्य आहे. त्यामुळें पारतंत्र्य सर्वत्र आहे. ) ११४. ( तें पारतंत्र्यच उदाहरणांनीं स्पष्ट कारितात--)

ब्रह्मा महेश्वराधीनस्तथाहं ब्रह्मणोऽपि च । सुखस्यातिशयो दृष्टः सर्वलोकस्थितस्य हि ॥ ११५ ॥ परब्रह्मण आनंदान्न्यूनोऽसौ शतभागतः । चतुर्मुखस्य यो नाम स्वानन्दोस्त्यधिकोऽधुना ॥ ११६ ॥ चतुर्मुखस्य चानन्दान्मम न्यूनतमस्तथा । अयुतांशेन चानन्दः कोऽन्यो न्यूनो भवेन्न च ॥ ११७ ॥ भवतां जायते यद्वल्ललनालिङ्गनात्सुखम् । सुखं तद्वन्ममाप्येतद्ब्रह्मणोऽपीश्वरस्य हि ॥ ११८ ॥

अर्थ---ब्रह्मदेव महेश्वराच्या अधीन असतो. तसाच मी ब्रह्मदेवाच्या अधीन असतों. तशींच सर्वलोकस्थ सुखाचीही सातिशयता[1] प्रतीत होते. ११५ ( त्या सातिशयतेचेंच उदाहरण--) परब्रह्माच्या आनंदाहून चतुर्मुख हिरण्यगर्भाचा आनंद शतांशानें न्यून आहे. आतां जो स्वानंद अधिक मानलेला आहे तोच माझा आनंद चतुर्मुखाच्या आनंदाहून दशसहस्रांशानें न्यूनतम आहे. (कारण हिरण्यगर्भाच्या आनंदाहून प्रजापतीचा आनंद शतांशानें न्यून व त्याहून माझा आनंद शतांश न्यून, म्हणून हिरण्यगर्भाच्या आनंदाहून माझा आनंद अयुतांशानें न्यून आहे. ) माझ्या अधिक म्हणून मानलेल्या आनंदाची जर ही दशा आहे तर दुसरा कोणता आनंद अन्यून असेल ? ( इतर सर्व आनंद न्यूनच असणार हें उघड आहे. (सार्थ तैत्तिरीयोपनिषद् पृ.८४ पहा.)११६,११७ ' भवतां यद्वत् ललनालिंगनात्सुखं जायते तद्वत् ममापि०-' तुम्हां मनुष्यांना जसें स्त्रीला आलिंगन दिल्यानें सुख होतें तसेंच मलाही होतें, हिरण्यगर्भालाही तसेंच होतें व ईश्वरालाही तसेंच होतें. ( हाच न्याय इतर सर्व विषयांना लागू आहे. त्यामुळें कोणत्याच विषयजन्य सुखामध्यें तारतम्य नाहीं. म्हणून स्वर्गांतील विषयजन्य सुखालाही हिततर म्हणतां येत नाहीं, असा भावार्थ. ) ११८.

( आतां वैराग्याचें स्वरूप दाखवून तेंच हिततर आहे, अशी प्रतिज्ञा करितात--)

[1] एका सुखानें दुसऱ्या सुखाहून अधिक असणें ही सुखाची सातिशयता.

मा भूदिदं कदाचिद्धि सुखं दुःखकरं मम ॥ एवंभूतो विरागोऽयं तस्माद्धिततरो मतः॥११९॥विनश्यति यतः सर्वं सुखजातं यथा घटः ॥ नाशं नैति विरागोऽयं जातः सत्पुरुषस्य हि ॥ १२०॥ छर्दिते वाथ विष्ठायां दोषधीरेव कारणम् ॥ विरागे तद्वदत्रापि दोषधीरेव कारणम् ॥१२१॥ साधनान्तरमत्रातो यद्वद्वैषयिके सुखे॥न विद्यते ततोऽप्येष नृभ्यो हिततरो मतः॥१२२॥

अन्वयः—' इदं हि दुःखकरं सुखं मम कदाचित् मा भूत् ।' इत्येवंभूतः अयं विरागः तस्मात् हिततरः मतः । यतः तथा घटः तथा सर्वं सुखजातं विनश्यति। अयं विरागः सत्पुरुषस्य जातः सन् नाशं न एति हि। छर्दिते अथवा विष्ठायां विरागे दोषधीः एव कारणं तद्वत् अत्रापि दोषधीः एव कारणं। यद्वत् वैषयिके सुखे तद्वत् अत्र अतः साधनान्तरं न विद्यते । ततः अपि एष नृभ्यः हिततरः मतः ॥

अर्थ—हें विषयजन्य व त्यामुळेंच क्षणभंगुर असल्यामुळें लागलेंच दुःख देणारें सुख मला न होवो, अशा प्रकारचा जो हा विराग तो त्या विषयजन्य सुखाहून हिततर मानलेला आहे. ११९ कारण जसा घट त्याप्रमाणें सर्व विषयजन्य सुख विनाश पावतें. पण सत्पुरुषाच्या म्ह० मंद अधिकाऱ्याहून इतर मध्यम अथवा मुख्य अधिकाऱ्याच्या मनांत उत्पन्न झालेला हा विराग नाश पावत नाहीं ( तर उत्तरोत्तर वृद्धिच पावतो ) १२०( आतां वैराग्याचें कारण सांगतात—) ओकून पडलेलें अन्न किंवा विष्ठा यांविषयीं वैराग्य उत्पन्न होण्यास त्याविषयींची दोषबुद्धि हेंच कारण आहे. त्याचप्रमाणें विषयांविषयीं वैराग्य येण्यास विषयांविषयींची दोषबुद्धि हेंच कारण आहे.१२१(अर्थात् वैराग्याला दोषदृष्टि या आंतर साधनाचीच अपेक्षा असल्यामुळें तें हिततर व विषयसुखाला बाह्य बहुवित्ताचा व्यय व आयास यांची अपेक्षा

---

१ औत्सुक्याची निवृत्ति हेंच विषयजन्य सुख आहे (आत्मपुराण अ. १ श्लोक ३१०पृ.२३२पहा. तृष्णारूप दुःखाचा अभाव हें वैषयिक सुखाचें व वैराग्याचें स्वरूप आहे. तथापि वैषयिकसुख दुसऱ्या तृष्णेनें पराभूत होऊन लागलेंच क्षीण होतें, पण वैराग्यानंतर दुसऱ्या तृष्णेचा संभवच नसल्यामुळें तें उत्तरोत्तर वाढत जातें, हा त्यांत विशेष आहे. त्यामुळेंच विषयसुखाहून वैराग्य हिततर आहे.

असल्यामुळें तें नुस्तें हितही नव्हे, असा भावार्थ. ) ज्याप्रमाणें विषयजन्य सुखामध्यें साधनांची अपेक्षा असते त्याप्रमाणें या वैराग्यांत दोषदृष्टीहून निराळ्या साधनाची अपेक्षा नसते. त्यामुळेंही हा विराग मनुष्यांना हिततर–स्वर्गसुखाहून अधिक हितकर मानलेला आहे १२२( शिवाय वैराग्य शेंकडों विषयजन्य सुखांनींही नाश न पावणाऱ्या दैन्याचा नाश करीत असल्यामुळें हिततर आहे, असें सांगतात–)

अयं मत्तः सुखी नाहमेतद्वः सुखसाधनम् ।
इति वैषम्यविज्ञानवह्निर्दहति सर्वदा ॥ १२३ ॥
जतून् जातस्पृहान्सर्वान् ज्ञात्वा वैषयिके सुखे ।
विरागो नास्त्यसौ यस्मात्तस्माद्धिततरो हि सः ॥ १२४ ॥

अन्वयः—'अयं मत्तः सुखी अहं न । एतत् सुखसाधनं वः मम न ।' इति वैषम्यविज्ञानवह्निः वैषयिके सुखे जातस्पृहान् सर्वान् जन्तून् सर्वदा दहति ( अयं दैन्यवह्नेः उपद्रवः कुतः हेतोः–) यस्मात् विषयदोषान् ज्ञात्वा तेभ्यो विरागो नास्ति । तस्मात् सः हिततरः हि ॥

अर्थ––हा माझ्याच जातीचा–मजसारखाच प्राणी मजहून सुखी आहे, पण मी नाहीं. हें सुखसाधन तुम्हांलाच आहे मला नाहीं. अशा प्रकारचा हा वैषम्यविज्ञानरूप अग्नि सुखाविषयीं ज्यांना स्पृहा आहे अशा सर्व प्राण्यांना सर्वदा जाळतो. १२३ (पण हा दैन्यरूप अग्नीचा उपद्रव कोणत्या कारणानें होतो ? ) विषयदोषांना जाणून त्यांपासून पुरुष विरक्त झालेला नसल्यामुळें त्याला असा संताप होतो. तस्मात् विराग हिततर आहे, यांत शंका नाहीं. १२४.

अस्माद्धिततमं ज्ञेयं ज्ञानं मे सविशेषणम् । उत्पन्नं न विनश्येद्यद्वासनाशतकोटिभिः ॥ १२५ ॥ आनन्दात्माहमस्मीति स्वात्मन्यज्ञाननाशनम् । विरागो दुःखसंत्यागे हेतुर्भवति नैव हि ॥ १२६ ॥ सुखबोध इदं त्वत्र तस्माद्धिततमं स्मृतम् । मज्ज्ञानादपरं तस्मान्मन्ये हिततमं न हि ॥ १२७ ॥

अन्वयः––अस्मात् मे सविशेषणं ज्ञानं हिततमं ज्ञेयं । यत् उत्पन्नं सत् वास-

नाशतकोटिभिः न विनश्येत् । अहं आनन्दात्मा अस्मि इति स्वात्मनि अज्ञान-नाशनं । विरागः दुःखसंत्यागे हेतुः भवति । सुखबोधे न एव हि । इदं ज्ञानं तु अत्र हेतुः भवति । तस्मात् हिततमं स्मृतम् । तस्मात् मज्ज्ञानात् अपरं हिततमं न हि मन्ये ॥

अर्थ--( आत्मज्ञान वैराग्याहूनही उत्कृष्ट असल्यामुळें हिततम आहे, असें सांगतात--) या वैराग्याहून माझें अद्वितीयादिविशेषणांसह असलेलें ज्ञान हिततम--अत्यंत हित आहे, असें जाणावें. ( कारण वैराग्य मूल अज्ञानाचा उच्छेद करूं शकत नाहीं. त्यामुळें भ्रमसंस्कारांचें भय निवृत्त होत नाहीं. पण तत्त्वज्ञान झाल्यावर संस्कारजन्य भ्रम कांहीं करूं शकत नाहीं, असें सांगतात--) जें माझें ज्ञान उत्पन्न झालें असतां शेकडों वासनांनींही बाधित होऊं शकत नाहीं. १२५. मी आनन्दात्मा आहें, हें ज्ञान स्वात्मविषयक अज्ञानाचें नाशक आहे. ( ज्ञान अन्तरंग असल्यामुळेंही वैराग्याहून श्रेष्ठ आहे, असें सांगतात--) वैराग्य स्वरूपानन्दाच्या भानाला प्रतिबंध करणारें जें दुःख त्याचें निवर्तन करण्यास कारण होतें. म्हणजे वैराग्य स्वरूपानन्दाच्या अभिव्यक्तीला प्रतिबंध करणाऱ्या दुःखाचा नाश करतें. पण आनंदाचा अनुभव देऊं शकत नाहीं. पण हें ज्ञान तर सुखसाक्षात्काराचेंही कारण आहे. म्हणून ज्ञानाला हिततम म्हटलेलें आहे. तस्मात् मनुष्यांना माझ्या ज्ञानाहून दुसरें कांहीं हिततम आहे, असें मी समजत नाहीं. १२६,१२७

[ श्रुतिः--'त्रिशीर्षाणं त्वाष्ट्रमहनमरुन्मुखान्यतीन्सालावृकेभ्यः प्रायच्छं बह्वीः संधा अतिक्रम्य दिवि प्रह्लादीयानतृणमहमन्तरिक्षे पौलोमान् पृथिव्यां कालखाञ्जान् । तस्य मे तत्र नलोम मा मीयते । स यो मां विजानीयान्नास्य केन च कर्मणा लोको मीयते ॥' मी त्रिशीर्ष त्वाष्ट्राला--त्वष्ट्याच्या पुत्राला--विश्वरूपाला मारलें. ' अरुन्मुखान् यतीन्-' ' रुत् ' म्ह० वेदाध्ययन त्यावरून यतींना अवश्य असलेला ब्रह्ममीमांसानांवाचा उपनिषदर्थविचार लक्षित होतो. तो ब्रह्मविचार ज्यांच्या तोंडांत नाहीं त्या अरुन्मुख यतींस--प्रयत्नशील चतुर्थाश्रमी पुरुषांस ' सालावृ-

केभ्यः' लांडग्यांना ' प्रायच्छं-' वज्रानें शतशः तोडून खावयास दिलें. 'बह्वीः संधाः-'पुष्कळ संधींचें'अतिक्रम्य-'अतिक्रमण करून 'प्रह्लादीयान्-' प्रह्लादाच्या संबंधी राक्षसांस ' अतृणम्' मारलें. ' अहं-' मी आत्मज्ञानी तुला वर देणारा इंद्र ' अंतरिक्षे-' भुवर्लोकीं ' पौलोमान्-' पुलोमसंबंधी असुरांस मारलें. ( पुष्कळ संधांचें—प्रतिज्ञांचें—वचनांचें अतिक्रमण करून, अनेक प्रतिज्ञांचा भंग करून ह्याची अनुवृत्ति प्रत्येक ठिकाणीं करावी. ) ' पृथिव्यां ' भूलोकीं ' कालखाञ्जान्-' कालखंजसंबंधी असुरांस ' अतृणं-' मारलें. ' तस्य मे-' गुरु—ब्राह्मणाचा वध करणाऱ्या, संन्याशांचे तुकडे करून लांडग्यांना घालणाऱ्या, यज्ञादिकांनीं संपन्न असलेल्या महामायावी असुरांची हिंसा करणाऱ्या मज इंद्राचा ' नलोम च-' अल्पही केंस ' मा मीयते-' तोडला जात नाहीं. ( कांहीं कारणानें मी अधिकारी शरीरवान् झालों व त्यामुळें त्रैलोक्याच्या स्थापनेसाठीं वरील घोर कर्में केलीं, असा याचा आशय. मजप्रमाणेंच)' स यः-' जो कोणी दुसराही देव किंवा मनुष्य ' मां विजानीयात्-' मला--आनन्दात्म्याला—इंद्राला ' विजानीयात्-' जाणील—मी इंद्र आहें असा अनुभव घेईल ' नास्य केन च कर्मणा-' याचा कोणत्याही पापकर्मानें ' लोको मीयते-' कृत किंवा केल्या जाणाऱ्या कर्माचें फळ नष्ट होत नाहीं.

मज्ज्ञानतो न पापानि स्पृशन्तीह कदाचन ।
भृशं यानि प्रसिद्धानि ब्रह्महत्यादिकानि च ॥
अनेकदुःखकर्तॄणि देहिनां कल्पकोटिषु ॥ १२८ ॥

**अन्वयः**---देहिनां कल्पकोटिषु यानि ब्रह्महत्यादिकानि अनेकदुःखकर्तॄणि भृशं प्रसिद्धानि पापानि तानि इह मज्ज्ञानतः कदाचन न स्पृशन्ति ॥

**अर्थ**——प्राण्यांचीं अनेक जन्मांतील जीं ब्रह्महत्यादिक अनेक प्रकारचें दुःख देणारीं अत्यंत प्रसिद्ध पापें असतात तीं येथें माझ्या ज्ञानामुळें केव्हांही स्पर्श करीत नाहींत १२८.

स्तुतिमात्रं न चैतत्त्वं मन्येथा बोधनस्य हि ।
बोधप्रसादात्पापानि मम कान्यपि नाभवन् ॥ १२९ ॥

**अन्वयः**—त्वं एतत् बोधनस्य स्तुतिमात्रं इति न मन्येथाः । बोधप्रसादात् मम कानि अपि पापानि नाभवन् ॥

**अर्थ**—तूं ही नुस्ती बोधाची स्तुति आहे, असें समजूं नको. ( कारण आत्मज्ञानी पुरुषाला पापकर्मेंही दुःख देऊं शकत नाहींत, ही वस्तुस्थिति आहे, हें तथ्य आहे. कारण मला तसा साक्षात् अनुभव आला आहे. ) बोधाच्या प्रसादानें—अनुग्रहानें—प्रभावानें मला कांहीं पापें लागलीं नाहींत. १२९.

शृणु लोकत्रयीराज्ये स्थितोऽहं रक्षणाय हि । स्वस्य तद्वत्त्रिलोक्याश्च पापान्यकरवं तथा ॥१३०॥ अभूत्पुरोहितोऽस्माकं कदाचिद्वेदवित्तमः । विश्वरूप इति ख्यातस्त्वष्टुः स तनयो महान् ॥१३१॥ दैत्यानां भगिनीगर्भादुत्पन्नो भुवि कुत्रचित् । त्रीणि शीर्षाणि तस्यासन् गुणत्रयविभाञ्जि च ॥ १३२ ॥ सात्त्विकेन पिबत्येष सोमं देवाननुव्रतः । तामसेन तथैवायं सुरां दैत्यानुगोऽपिबत् । राजसेन तथैवात्ति त्वन्नं यद्वद्धि भूगतः ॥ १३३ ॥

**अन्वयः**—शृणु । लोकत्रयीराज्ये स्थितः अहं स्वस्य तद्वत् त्रिलोक्याःच रक्षणाय तथा पापानि अकरवं । कदाचित् अस्माकं वेदवित्तमः पुरोहितः अभूत् । विश्वरूपः इति ख्यातः । सः त्वष्टुः महान् तनयः । भुवि कुत्रचित् दैत्यानां भगिनीगर्भात् उत्पन्नः । तस्य गुणत्रयविभाञ्जि त्रीणि शीर्षाणि आसन् । देवान् अनुव्रतः एषः सात्त्विकेन सोमं पिबति । तथैव दैत्यानुगः अयं तामसेन सुरां अपिबत् । यद्वत् हि भूगतः तथैव राजसेन तु अन्नं अत्ति ॥

**अर्थ**—( मला पापें कशीं लागलीं नाहींत तें सविस्तर सांगतों— ) ऐक. लोकत्रयीच्या राज्यावर स्थित असलेला मी स्वतःच्या व त्याचप्रमाणें त्रैलोक्याच्या रक्षणासाठीं तशीं घोर पापें केलीं. १३० कोणे एके वेळीं आमचा अतिशय वेदवेत्ता पुरोहित होता. विश्वरूप या नांवानें तो प्रसिद्ध आहे. तो त्वष्टा या नांवाच्या देवाचा मोठा मुलगा. १३१ भूलोकीं कोठें तो दैत्यांच्या बहिणीच्या गर्भापासून उत्पन्न झाला. तीन गुणांचा विभाग करणारीं त्याचीं तीन मस्तकें होतीं. १३२. देवांचा अनुयायी होत्साता

तो त्यांतील सात्त्विक मुखानें सोम पीत असे तसाच दैत्यांचा अनुयायी होऊन तो विश्वरूप सुरा–मद्य पीत असे; जसा भूगत–मनुष्य तसाच हा राजस मुखानें अन्न खात असे १३३.

ऋत्विग्भूत्वा कदाचित्स कस्मिंश्चिद्विततें सति ।
यज्ञे भागान् हि देवेभ्यः स्पष्टमेव प्रयच्छति ॥
असुरेभ्यः शनैः स्वस्य मातृपक्षेभ्य एव च ॥ १३४ ॥

**अन्वयः**—सः कदाचित् ऋत्विग् भूत्वा कस्मिंश्चित् यज्ञे वितते सति देवेभ्यः भागान् स्पष्टं एव प्रयच्छति । स्वस्य च मातृपक्षेभ्यः असुरेभ्यः शनैः एव ॥

अर्थ—तो विश्वरूप कदाचित् ऋत्विक्–याजक होऊन एकादा यज्ञ चालला असतां देवांना भाग स्पष्ट म्ह० उंच स्वरानें देत असे व आपल्या मातृपक्षीय असुरांस मंदस्वरानें देत असे. १३४. ( ‘ असुरांनाही तो प्रत्यक्ष भाग कां देत नसे ?’ उत्तर–)

प्रत्यक्ष एव सर्वेषां भागिनां भाग आपतेत् । ग्रामादौ बाधकस्यात्र परोक्षं यात्यभागिनः ॥ १३५ ॥ परोक्षं दीयमाने हि शनैर्बलमुपागतः ॥ ग्रामाद्यपहरेच्चैतान् पतीन्हन्यादभागभाक् १३६

**अन्वयः**—ग्रामादौ सर्वेषां भागिनां भागः स्पष्टं एव आपतेत् । अत्र अभागिनः बाधकस्य परोक्षं याति । परोक्षं दीयमाने हि अभागभाक् शनैः बलं उपागतः सन् ग्रामादि अपहरेत् च एतान् पतीन् हन्यात् ॥

अर्थ—ग्राम, देश इत्यादिकांमध्यें ज्यांना भाग मिळणें न्याय्य आहे त्या सर्वांचा भाग प्रत्यक्षच त्यांच्याकडे येतो. पण जे भागीदार नाहींत त्यांच्याकडे जर भाग गेलाच तर त्याला बाधक असलेला–दंड वगैरे करणारा जो राजा किंवा स्वामी त्याच्या परोक्ष जातो ( असा हा लौकिक न्यायच आहे ) १३५. ( पण असलें गुप्त दान स्वामीला हितावह नाहीं. कारण ) अशारीतीनें स्वामीच्या परोक्ष भाग दिला गेल्यास तो अभागभाक्–भागाला योग्य नसलेला–भागीदार नसलेलाही हळू हळू समर्थ होतो; आणि खऱ्या भागीदाराच्या परोक्ष मिळालेल्या भागानें स-

मर्थ होऊन तो त्या ग्रामादिकांचा अपहार करतो व त्यांच्या स्वामींना मारतो १३६.

इति संचिन्त्य दृष्ट्वाहं तस्य दानक्रियामिमाम् । प्रत्यक्षं च परोक्षं च देवानां तद्द्रुहामपि ॥ इमां धियमनुप्राप्तो विश्वरूपे पुरोहिते ॥१३७॥ राज्ञामेतादृशो नूनं घातं कुर्यात्पुरोहितः । राष्ट्रस्य च दुरात्मायं वधमेव समर्हति ॥ १३८ ॥ अहं विश्वासमापन्नो निहतोऽस्म्यधुनामुना। रिपुभ्यो मे ददात्येष यज्ञभागान्यतः शनैः ॥ १३९ ॥ यो यस्यान्नं समश्नाति स तस्यात्मा प्रकीर्तितः । आत्मने द्रुह्यति ह्येष पापोऽस्मात्कतमः स्मृतः ॥ १४० ॥ तस्मादेनं दुराचारं मद्घाताय समुद्यतम् । अपि वेदविदं विप्रं निहन्मि स्वपुरोहितम् ॥ १४१ ॥ इति बुद्धिमिमां प्राप्तो वज्रेण शतपर्वणा । शिरांस्यच्छिनदं तस्य सर्वाणि सुरसंसदि ॥ १४२ ॥

**अन्वयः**—अहं तस्य इमां देवानां प्रत्यक्षं तद्द्रुहां अपि परोक्षं दानक्रियां दृष्ट्वा इति संचिन्त्य विश्वरूपे पुरोहिते इमां धियं अनुप्राप्तः। एतादृशः पुरोहितः राज्ञां राष्ट्रस्य च घातं कुर्यात्। तस्मात् अयं दुरात्मा वधं एव समर्हति। अमुना विश्वासमापन्नः अहं निहतः अस्मि । यतः एषः मे रिपुभ्यः शनैः यज्ञभागान् ददाति । यः यस्य अन्नं समश्नाति सः तस्य आत्मा प्रकीर्तितः । एषः हि आत्मने द्रुह्यति । अस्मात् कतमः पापः स्मृतः । तस्मात् एनं मद्घाताय समुद्यतं दुराचारं वेदविदं अपि विप्रं स्वपुरोहितं निहन्मि । इति इमां बुद्धिं प्राप्तः अहं शतपर्वणा वज्रेण तस्य सर्वाणि शिरांसि सुरसंसदि अच्छिनदम् ॥

**अर्थ**——मी त्या विश्वरूपाची ही—देवांना प्रत्यक्ष व देवद्रोही असुरांना परोक्ष—दानक्रिया पाहून व वर दोन ( १३५-१३६ ) श्लोकांत सांगितल्याप्रमाणें विचार करून विश्वरूप पुरोहिताविषयीं या मतीस प्राप्त झालों. ( त्याच्याविषयीं माझी पुढें सांगितल्याप्रमाणें मति झाली. ) १३७. अशा प्रकारचा—शत्रूचें हित इच्छिणारा—पुरोहित राजांचा व राष्ट्राचा घात करील. यास्तव हा दुरात्मा वधालाच सर्वथा योग्य आहे

१३८. ( त्याचें दुरात्मत्वच प्रकट करितात- ) यानें विश्वास ठेवून बसलेल्या माझा जणुकाय घात करावयास आरंभ केला आहे. कारण हा माझ्या रिपूंना हळूच यज्ञभाग देत आहे १३९. जो ज्याचें अन्न खातो त्याचा तो आत्मा म्हटलेला आहे. ( माझें अन्न खात असल्यामुळें मी याचा आत्मा आहें. ) पण हा दुरात्मा आपल्या आत्म्याशीं—मज अन्नदात्याशीं द्रोह करीत आहे. तेव्हां या आत्मद्रोही विश्वरूपाहून दुसरा कोण पापी समजला जाणार ! १४० तस्मात् माझा घात करावयास सर्वथा उद्युक्त झालेल्या या दुराचाऱ्यास—हा जरी वेदवेत्ता आहे, ब्राह्मण आहे व जरी माझा पुरोहित आहे तरी मी याला मारतों, १४१ अशा या बुद्धीस प्राप्त झालेल्या मीं ज्याला धारारूप शंभर पर्वें—पेरें—भाग आहेत अशा वज्रानें त्याचीं सर्व शिरें देवसभेंत तोडलीं १४२.

(आतां ज्यांच्या मुखांत 'रुत्' म्ह० वेदान्त वाक्य नाहीं अशा यतींना तोडून अरण्यांतील कुत्र्यांना—लांडग्यांना घातलें, अशा अर्थाच्या 'अरुन्मुखान् यतीन् सालावृकेभ्यः प्रायच्छम्' या वाक्याचें उपबृंहण एकाहात्तर श्लोकांनीं करितात—)

वर्णाश्रमाचाररतानुत्तमाश्रमिणस्तथा ॥ आत्मास्माकमयं शक्र इति ज्ञानविवर्जितान् ॥ १४३ ॥ कदाचिदहमापृच्छं मिलितान्कोटिशःक्वचित् ॥ के भवन्त इमे सर्व इत्युक्ते मामथावदन् ॥ १४४ ॥ वर्णाश्रमाचाररताः सर्वे हि यतयो वयम् ॥ इत्युक्त्वा मुनयोऽप्येते मामूचुर्दैवमोहिताः ॥ १४५ ॥ कस्त्वमत्र यतीनस्मान्प्रष्टुं सर्वान्समागतः ॥ इत्यधिक्षेपसदृशं वाक्यं तेषामहं तदा ॥ श्रुत्वापि कृपयाविष्ट इदं तानब्रुवं यतीन् ॥ १४६ ॥ अहं हि भवतामात्मा त्विन्द्र इत्येव विश्रुतः ॥ इत्युक्ते जहसुः सर्वे मूर्खाः पण्डितमानिनः ॥ १४७ ॥

अन्वयः—वर्णाश्रमाचाररतान्, उत्तमाश्रमिणः, अयं शक्रः अस्माकं आत्मा इति ज्ञानविवर्जितान् क्वचित् कोटिशः मिलितान् अहं कदाचित् अपृच्छं ' इमे सर्वे भवन्तः के ' इति उक्ते अथ मां अवदन्—" सर्वे हि वयं वर्णाश्रमाचाररताः

यतयः। '' इति उक्त्वा एते मुनयः अपि दैवमोहिताः मां ऊचुः। 'अत्र अस्मान् सर्वान् यतीन् प्रष्टुं समागतः त्वं कः असि।' इति तेषां अधिक्षेपसदृशं वाक्यं श्रुत्वा अपि तदा कृपया आविष्टः तान् यतीन् इदं अब्रुवं। 'अहं हि भवतां आत्मा इन्द्रः इति एव विश्रुतः।' इत्युक्ते सर्वे पंडितमानिनः मूर्खाः जहसुः॥

अर्थ—वर्ण व आश्रम यांच्या आचारांत तत्पर असलेल्या, चतुर्थाश्रमी, हा इंद्र आमचा आत्मा आहे, अशा ज्ञानानें विरहित असलेल्या १४३ व कोणे एके ठिकाणीं कोटिशः मिळालेल्या यतींस मी एकदां विचारलें 'हे सर्व तुम्ही कोण ?' असें मीं म्हटलें असतां ते मला म्हणाले १४४ "आम्ही सर्वही वर्णाश्रमाचाररत यती आहों." असें सांगून ते मुनीही दैवानें मोहित होत्साते मला असें विचारूं लागले. १४५ 'येथें आम्हां सर्व यतींना विचारावयास आलेला तूं कोण आहेस ?' असें त्यांचें अनादरयुक्त वचन ऐकूनही तेव्हां 'यांना ज्ञान कसें बरें होईल ?' अशा कृपेनें आविष्ट–कृपायुक्त होऊन मी त्यांस असें वचन बोललों १४६ 'मी तुमचा प्रसिद्ध आत्मा आहें, 'इंद्र' या नांवानेंच मी श्रुतींत विख्यात आहें' मीं असें सांगितलें असतां ते सर्व आपल्याला पंडित मानणारे मूर्ख[1] हंसले १४७.

साधिक्षेपं च मां सर्वे ऊचुस्ते दैवमोहिताः॥ त्वं हि विग्रहवानत्र कथमिन्द्रो भविष्यसि॥ १४८॥ इन्द्रो नामेन्द्रशब्दार्थौ हित्वा नान्योऽस्ति कश्चन॥ इन्द्रोऽतिथिसमो नैव यागे नो दृष्टिमागतः॥ १४९॥ देवतायै हविस्त्यक्तं नास्ति सातिथिवत्क्वचित्॥ नैषा मधुकरी वास्ति सारमन्नस्य कर्हि-

---

१ बृहदारण्यकभाष्यार्थ अ. ४ पृ २४ पहा. मूर्ख म्ह कर्ममीमांसेचेंही तात्पर्य न जाणणारे. कर्ममीमांसेंत–कर्मानुष्ठानसमयीं कर्मच सद्गुणयुक्त होऊन पुढें फल देईल त्यासाठीं देवतेची संभावना मानून कर्माचें वैगुण्य करूं नये, तर तें सर्वांगसंपूर्ण होईल, असेंच करावें, अशा अभिप्रायानें देवतेच्या विग्रहादिकांचें निराकरण केलें आहे. पण वार्तिककारादिकांना देवताविग्रहादिक व वेदान्ताचें प्रामाण्य मान्य आहे. कारण त्यांनीं 'विशुद्धज्ञानदेहा ये-' ज्यांचे अतिशुद्ध ज्ञानदेह आहेत, असें मंगलाचरणांत म्हटलें आहे व 'या आत्म्याविषयींचा दृढ प्रबोध वेदान्तविचारानें होतो' असेंही स्पष्ट सांगितलें आहे.

चित ।। मोदका हि गणेशस्य जहुर्दत्ता न सारताम् ।।१५०।। ऐश्वर्यं यदि तस्याः स्याद्रागिणी सा भवेत्ततः ।। वारांगनेव को नाम पूजयेत्तामनिन्दितः ।। १५१ ।। एषा प्रसादमभ्येति किं कर्मण्यकृतेऽपि हि ।। कृते चेद्देवतायाः स्याद्विशेषः कश्च नोऽधुना ।। १५२ ।। अपि चात्मात्र कर्ता स्याद्भोक्ता तद्वद-मूर्तकः । सर्वेषां प्राणिनामेषां भिन्नो दुःखादिभाजनम् ।। प्रत्यक्षस्त्वं कथं स्वस्मादेकोऽनेकस्वरूपधृक् ।। १५३ ।। इत्यादि कुत्सिता वाक्यं कुतर्कबहुलं तथा ।। साधिक्षेपं च सं-प्रोच्य चक्रुः कोपं च ते मयि ।।१५४।।

**अन्वयः**---दैवमोहिताः ते सर्वे मां साधिक्षेपं ऊचुः । त्वं हि अत्र विग्रह-वान् । इन्द्रः कथं भविष्यसि । इन्द्रशब्दार्थौ हित्वा इन्द्रः नाम कश्चन अन्यः नास्ति । यागे इन्द्रः अतिथिसमः नः दृष्टिं नैव आगतः । देवतायै त्यक्तं हविः सा अतिथिवत् क्वचित् न अत्ति । एषा मधुकरी इव अन्नस्य सारं कर्हिचित् न अत्ति । हि गणेशस्य दत्ता मोदकाः सारतां न जहुः । यदि तस्याः ऐश्वर्यं स्यात् ततः सा रागिणी भवेत् । ततः सा वारांगना इव । कः नाम अनिन्दितः तां पूजयेत् । एषा कर्मणि अकृते अपि हि प्रसादं अभ्येति किं ? कृते चेत् देवतायाः नः अधुना कः विशेषः स्यात् । अपि च अत्र आत्मा कर्ता स्यात्, तद्वत् भोक्ता, अमूकः, एषां सर्वेषां प्राणिनां भिन्नः, दुःखादिभाजनं, च प्रत्यक्षः । त्वं तु स्वस्मात् एकः सन् अनेकरूपधृक् कथं । इत्यादि कुतर्कबहुलं तथा साधिक्षेपं च वाक्यं संप्रोच्य ते कुत्सिताः मयि कोपं चक्रुः ॥

अर्थ—दैवानें [ म्ह० फलाभिमुख झालेल्या कर्मानें ] मोहित झालेले ते सर्व मोठ्या अनादरानें मला म्हणाले. तूं तर येथें शरीरवान् आहेस. तेव्हां सशरीर असलेला तूं इंद्र कसा असशील ? १४८ कारण 'इंद्र' अशा प्रकारचा शब्द व त्याचा अर्थ यांना सोडून इंद्र म्हणून दुसरा कोणी नाहीं. यज्ञांत इंद्र एकाद्या अतिथीसारखा आमच्या दृष्टींस कधींच पडलेला नाहीं. (त्यामुळें तो शरीरयुक्त आहे, असें म्हणतां येत नाहीं. ) १४९ देवतेला उद्देशून त्याग केलेला—दिलेला हवि ती देवता

---

१ ' विग्रह—शरीर, हवींचा भोग, ऐश्वर्य, प्रसन्नता व फलप्रदान ' या पांचांना विग्रहादिक म्हणतात. देवतेच्या ठिकाणीं त्यांचा अभाव दाखवितात.

अतिथीप्रमाणें केव्हांही खात नाहीं. (ती त्यांतील सार काढून घेते, म्हणून म्हणावें तर) भ्रमरीप्रमाणें ती देवता अन्नाचें सार केव्हांच आकर्षण करून घेत नाहीं. कारण गणेशाला अर्पण केलेले मोदक आपल्यांतील सारता केव्हांच सोडीत नाहींत. १५० (त्यांची चव पूर्वीप्रमाणेंच कायम असते. त्यामुळें देवता नुस्ती विग्रहवती—शरीरयुक्त नसते इतकेंच नव्हे तर ती हविही खात नाहीं. आतां तिच्या ऐश्वर्याचें निराकरण करितात—) जर त्या देवतेला ऐश्वर्य[1] असेल तर ती रागिणी होईल. तेव्हां नानारूपें धारण करणाऱ्या व रागिणी—विषयासक्त अशा वारांगनेसारख्या देवतेची कोणता अनिंदित मनुष्य पूजा करणार आहे ? १५१ ती देवता कर्म न करतांही प्रसन्नतेस प्राप्त होते का ? ( नाहीं. ) मग आम्हीं कर्म केल्यावरच जर ती प्रसन्न होत असेल तर ती देवता व आम्ही यांच्यामध्यें आतां विशेष--फरक तो कोणता ? १५२ शिवाय या शरीरांत आत्मा कर्ता आहे. तसाच तो भोक्ता आहे. अमूर्त—विभु आहे. या सर्व प्राण्यांमध्यें भिन्न भिन्न--प्रति शरीरीं भिन्न आहे. सुख दुःखादिकांचें भाजन आहे व 'मी' अशा प्रकारें प्रत्यक्ष आहे. तूं तर आमच्या आत्म्याहून एक--भिन्न असतांना अनेकरूपांचें धारण करणारा--सर्वात्मरूप--कसा आहेस ? किंवा तूं एक म्ह० अद्वितीय असून आपल्या प्रभावानें अनेक रूपें धारण करणारा कसा आहेस ? १५३ इत्यादि ज्यांत कुतर्कांचें बाहुल्य आहे व जें तिरस्कारयुक्त आहे असें वाक्य बोलून ते कुत्सित--निंद्य यती मजवर कोप करते झाले १५४.

तेषां बहिर्मुखत्वं च नैष्ठुर्यं वचसोऽपि च ।
कारणेन विना कोपं मयि तद्वत्सुदारुणम् ॥
विलोक्य पुनरेवाहं कृपाविष्टोऽवदं यतीन् ॥ १५५ ॥

अन्वयः—तेषां बहिर्मुखत्वं, वचसः नैष्ठुर्यं अपि, तद्वत् कारणेन विना मयि सुदारुणं कोपं विलोक्य अहं कृपाविष्टः यतीन् पुनः एव अवदम् ॥

---

१ ऐश्वर्य म्ह० ममत्वरूप स्वामित्व किंवा यज्ञांत जाण्यासाठीं नानारूपें धारण करण्याचें सामर्थ्य.

अर्थ—त्यांचें तें बहिर्मुखत्व, व वचनाची निष्ठुरताही, त्याचप्रमाणें कारणावाचून माझ्यावर अतिशय कोप यांस अवलोकन करून मी कृपाविष्ट होऊन त्या यतींस पुनः बोललों १५५.

देवताविग्रहादीनामभावे चात्मनस्तथा ।
वस्तुभेदे ममाप्येवमनात्मत्वे यतीश्वराः ॥
वेदवाक्यानि मानं चेत्सन्ति तानि वदन्त्विह ॥ १५६ ॥

अन्वयः--हे यतीश्वराः, देवताविग्रहादीनां अभावे, तथा आत्मनः वस्तुभेदे, एवं मम अपि अनात्मत्वे वेदवाक्यानि मानं चेत् सन्ति तर्हि इह भवन्तः वदन्तु ॥

अर्थ—हे यतीश्वरांनो, देवतांच्या विग्रहादिकांचा [ म्ह० पूर्वोक्त शरीर, हविर्भोग, ऐश्वर्य, प्रसाद, व फलप्रदान यांचा] अभाव आहे, अशाविषयीं, त्याचप्रमाणें आत्मा प्रतिशरीरीं भिन्न आहे या अर्थी, तसेंच—मी इंद्र अनात्मा आहें याविषयीं वेदवाक्यें जर प्रमाण असतील तर तीं येथें तुम्ही मला सांगा. १५६

एवमुक्ते पुनर्मूढाः कोपाकुलितमानसाः । एकामप्यृचमत्रैते ह्यन्यार्थामपि नोचिरे ॥ १५७ ॥ पृष्टा निन्दित्वा मह्यं ते भ्रुकुटीकुटिलाननाः । अवदन् गच्छ गच्छेति सर्वे ते हस्तसंज्ञया ॥ १५८ ॥

अन्वयः--मया एवं उक्ते पुनः मूढाः कोपकुलितमानसाः एते अत्र एकां अपि ऋचं अन्यार्थां अपि न ऊचिरे । मया पृष्टाः ते सर्व भ्रुकुटीकुटिलाननाः मह्यं निन्दित्वा हस्तसंज्ञया गच्छ गच्छ इति अवदन् ॥

अर्थ—मीं असें म्हटलें असतां पुनः मूढ व कोपानें ज्यांचें चित्त आकुलित—व्याकुळ झालें आहे, असे ते देवताविग्रहादिकांचा अभाव आहे, आत्मा प्रतिशरीरीं पृथक् आहे व इंद्र अनात्मा आहे, याविषयीं एकही ऋचा सांग शकले नाहींत. इतकेंच नव्हे तर अर्थवादप्रसंगानें प्रवृत्त झालेलें 'को हि तद्वेद यद्यमुष्मिन् लोके स्याद्वा न वा-' इत्यादि परलोकाविषयीं संशय व्यक्त करीत आहे, असें भासणारें श्रुतिवचनही ते

सांगूं शकले नाहींत. १५७. पण मी पुनः कृपायुक्त होऊन त्यांना जेव्हां विचारलें तेव्हां--ज्यांचीं तोंडें कपाळाला आंद्या पडल्यामुळें वांकडीं झालीं आहेत असे ते सर्व माझी निंदा करून हातानें खुण करूनच 'जा जा' असें म्हणाले ( त्यांनीं हातांनीं मला जाण्याची खूण केली. 'जा' असें तोंडानें बोललेही नाहींत ) १५८.

ततस्त्रिलोकीरक्षार्थमुद्यतोऽहं सुरेश्वरः । व्यचिन्तयं स्वमनसा किमेषूचितमत्र हि ॥ १५९ ॥ आत्मावलोकनार्थाय शान्तिदान्त्यादिसंयुतः । संन्यसेत्सर्वकर्माणि श्रुतिस्त्वेवमुवाच ह ॥ १६० ॥ संन्यस्य सर्वकर्माणि वेदान्तार्थविचारणा । गुरूपदेशतः कार्या तर्केण ध्यानतोऽपि च ॥ १६१ ॥ एवं ममाद्वितीयस्य चिदानन्दात्मरूपिणः । साक्षात्कृतिर्भवेद्यस्य दुःखं नैतत्समाप्नुयात् ॥ १६२ ॥

अन्वयः---ततः त्रिलोकीरक्षार्थं उद्यतः अहं सुरेश्वरः 'अत्र एषु किं उचितं' इति हि स्वमनसा व्यचिन्तयम् । श्रुतिः तु 'शान्तिदान्त्यादिसंयुतः आत्मावलोकनार्थाय सर्वकर्माणि संन्यसेत्' एवं उवाच ह । सर्वकर्माणि संन्यस्य गुरूपदेशतः, तर्केण, अपि च ध्यानतः वेदान्तार्थविचारणा एव कार्या । एवं यस्य अद्वितीयस्य चिदानन्दात्मरूपिणः मम साक्षात्कृतिः भवेत् सः एतत् दुःखं न समाप्नुयात् ॥

अर्थ---तेव्हां त्रैलोक्याचें अधर्मापासून व उपस्थित भयापासून रक्षण करावयास उद्यत झालेल्या मीं-बाह्य व आन्तर असुरांच्या विरोधी सुरेश्वरानें आपल्या मनानें असा विचार केला. या अशा उद्धट झालेल्या यतींविषयीं काय करावें ? असा संशय आला असतां मला काय करणें उचित आहे बरें ? १५९ ( यांची उपेक्षा करावी तर तें मज त्रैलोक्यरक्षकाच्या अधिकाराच्या विरुद्ध आहे. बरें यांना दंड करावा तर यांचा अपराध सिद्ध होतो आहे का ? असें म्हणून अगोदर यांचा हा संन्यासच योग्य आहे का नाहीं, हें ठरविण्यासाठीं संन्यासप्रतिपादक श्रुतींचा विचार इंद्र करतो-) 'आत्मानमेव लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति' ( बृहदा. अ. ४ पृ. ३३८) व 'तस्माच्छान्तो दान्तः०' ( बृहदा. अ. ४ पृ.

२६२ ) इत्यादि श्रुति तर ' शांति, इंद्रियनिग्रह, तितिक्षा इत्यादिकांनीं युक्त असलेल्या मुमुक्षूनें आत्मसाक्षात्कारासाठीं सर्व कर्मांचा संन्यास करावा, ' असें म्हणाली आहे. १६०. ' आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यः०' इत्यादि श्रुति ' सर्व कर्मांचा संन्यास करून गुरूपदेश (श्रवण), तर्क (मनन) व तसेंच ध्यान (निदिध्यासन) यांच्या योगानें वेदान्ताच्या अर्थाचाच विचार करावा,' असें सांगते १६१. 'ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेति' (छान्दो. अ २ खं २३ कं. १ ) ही फल सांगणारी श्रुति म्हणते ' याप्रमाणें संन्यासपूर्वक वेदान्तविचार केला असतां ज्याला अद्वितीय चिदानन्दात्मरूप आत्म्याचा—माझा साक्षात्कार होतो तो या दुःखाला प्राप्त होत नाहीं.' १६२ ( पण यांचा हा संन्यास अशा प्रकारचा दिसत नाहीं. ' व्रती भूत्वा गृही भवेत्, गृही भूत्वा वनी भवेत्, वनी भूत्वा प्रव्रजेत्.' या श्रुतीच्या अनुसार हा यांचा संन्यास असेल असें म्हणावें तर तसेंही दिसत नाहीं, कारण—)

क्रमप्राप्तश्च संन्यासः सप्तत्याः स्यादनन्तरम् । युवानः सर्व एवैते आत्मज्ञानविवर्जिताः ॥ १६३ ॥ अविनिताः क्रोधशत्रोर्वशं प्राप्ता हि दुर्धियः । शृण्वन्ति न हितं मूढा अपि मह्यं द्विषन्ति च ॥ १६४ ॥ प्रज्ञावतेऽपि भिषजे यथा लोके मुमूर्षवः । मदुक्तं ते न कुर्वन्ति कस्य कुर्युरिमेऽधमाः ॥१६५॥ सुदुःसहानधिक्षेपान्सोढ्वा तेषां दुरात्मनाम् । बोधाय यन्मया पृष्टं प्रमाणं तच्च नेरितम् ॥ १६६ ॥

**अन्वयः**——यः च क्रमप्राप्तः संन्यासः सः सप्तत्याः अनन्तरं स्यात् । एते सर्वे एव युवानः आत्मज्ञानविवर्जिताः । अविनीताः, क्रोधशत्रोः वशं प्राप्ताः, दुर्धियः, मूढाः हितं न शृण्वन्ति अपि च मह्यं द्विषन्ति । ( कथं ) यथा लोके मुमूर्षवः प्रज्ञावते अपि भिषजे द्विषन्ति तथा । ते मदुक्तं न कुर्वन्ति तदा इमे अधमाः कस्य कुर्युः । सुदुःसहान् अधिक्षेपान् सोढ्वा तेषां दुरात्मनां बोधाय यत् प्रमाणं मया पृष्टं तत् च तैः न ईरितम् ॥

१ येथें सर्व कर्में म्ह० नित्य, नैमित्तिक, काम्य कर्म असें समजावें.

अर्थ—जो क्रमप्राप्त—आश्रमांच्या क्रमाचें विधान करणाऱ्या श्रुतीच्या अनुसार प्राप्त झालेला संन्यास तो आयुष्याला सत्तर वर्षें झाल्यानंतर योग्य होतो. पण हे तर सर्वच तरुण, आत्मज्ञानशून्य, विनयरहित व क्रोधरूपी शत्रूच्या अधीन झालेले असल्यामुळें दुर्बुद्धि आहेत. हे मूढ स्वतःचें हित ऐकत नाहींत. उलट मज हितोपदेश करणाराचा द्वेष करितात. १६३,१६४ (ते कसे ?) जसे व्यवहारांत मरावयास टेकलेले रोगी बुद्धिमान् वैद्याचा द्वेष करितात त्याप्रमाणें ते माझा द्वेष करितात. ते मीं सांगितल्याप्रमाणें जर करीत नाहींत तर मग हे अधम पुरुष दुसऱ्या कोणीं सांगितलेलें काय करणार आहेत ? १६५ कारण मी त्यांचे अतिशय दुःसह असे अधिक्षेप—अनादरोक्ती सहन करून त्या दुरात्म्यांस बोध करण्यासाठीं जें वेदप्रमाण विचारलें तें त्यांनीं सांगितलें नाहीं १६६ ( अर्थात् त्यांनीं श्रुतीचें अतिक्रमण करून संन्यास घेणें हा एकच अपराध केलेला नाहीं तर स्वतःच्या म्हणण्याचें समर्थन करण्यासाठीं वेदाचें प्रमाणही दिलें नाहीं. पण ' तूं तरी त्यांना विचारलेंस कशाला,' म्हणून कोणी म्हणेल तर सागतों—)

ममैवमाशयः पूर्वमिमे किंचिद्धि वैदिकम् ।
वाक्यं हि कथयिष्यन्ति तेनैवैतान्निबोधये ॥ १६७ ॥

अन्वयः—मम एवं हि आशयः आसीत् । इमे पूर्वं किंचित् हि वैदिकं वाक्यं कथयिष्यन्ति । तेन एव एतान् निबोधये ॥

अर्थ— माझा असा आशय होता. पूर्वीं हे कांहीं तरी वैदिक वाक्य मला सांगतील व मग मी त्याच वेदवाक्यानें या यतींना चांगला बोध करीन १६७.

एते च मयि संजातकोपाः कारणशून्यतः । न जानन्ति च मानानि कुतर्कांश्च वदन्ति हि ॥ १६८ ॥ वक्तव्यं साधुना युक्तमन्त्यजे वाथ वैरिणि । पतितेऽपि दुराचारे तात्पर्येणेह पृच्छति । मया पृष्टा इमे सर्वे एवं मौनं समाश्रिताः ॥ १६९ ॥

**अन्वयः**—एते च कारणशून्यतः मयि संजातकोपाः । मानानि न जानन्ति । कुतर्कान् च वदन्ति हि । साधुना तात्पर्येण इह पृच्छाति अन्त्यजे अथ वैरिणि पतिते अपि दुराचारे युक्तं वक्तव्यम् । किंतु मया पृष्टाः इमे सर्वे एवं मौनं समाश्रिताः॥

**अर्थ**—हे यती कारणशून्य अशा मजवर अतिशय रागावले. ( हा यांचा आणखी एक अपराध, ) हे वैदिक प्रमाणेंही जाणत नाहींत ( हा दुसरा ) व कुतर्क बोलतात ( हा तिसरा ) १६८ साधु पुरुषानें तत्परतेनें प्रश्न करणाराला, मग तो अंत्यज असो, वैरी असो, पतित असो कीं दुराचारण करणारा असो त्याला योग्य उत्तर द्यावें, हा न्याय होय पण मीं देवेंद्रानें विचारलें असतांही हे सर्व असे मौनाचा आश्रय करून बसले आहेत. ( हा चवथा अपराध ) १६९.

इमे न कर्मयोग्याः स्युः संन्यस्तत्वाद्धि दुर्धियः ॥ विरक्तिं नैव चापन्नाः कोपे सति कुतो हि सा ॥ १७० ॥ जन्म कष्टं नृणामेतत्कामः कष्टतरस्ततः ॥ क्रोधः कष्टतमस्तस्मात्स एतेषु समाश्रितः १७१ विपाके दुःखं कामस्य नाधुना सर्वदेहिनाम् । विपाकेऽप्यधुना क्रोधः सर्वदा दुःखदः स्मृतः ॥१७२॥ जायते यत्र स क्रोधस्तं दहेदेष सर्वतः । विषयं च क्वचित्क्रोधः सफलो निर्दहेदयम् ॥ १७३ ॥ चतुर्विधानां भूतानां क्रोधाद्भवति हिंसनम् । कर्मणा मनसा वाचा कस्तं क्रोधं समाश्रयेत् । नाशयत्येष वै कीर्तिं स्फीतां रोग इव त्वचम् ॥१७४ ॥

**अन्वयः**—इमे दुर्धियः हि संन्यस्तत्वात् कर्मयोग्याः न सन्ति । विरक्तिं च न आपन्नाः एव । कोपे सति सा कुतः हि । नृणां एतत् जन्म कष्टं । ततः कामः कष्टतरः । क्रोधः तस्मात् कष्टतमः । सः एतेषु समाश्रितः । सर्वदेहिनां कामस्य कार्ये दुःखं विपाके एव न अधुना । क्रोधः विपाके अधुना अपि सर्वदा दुःखदः स्मृतः । यत्र स क्रोधः जायते तं एषः सर्वतः दहेत् । अयं क्रोधः क्वचित् सफलः विषयं च निर्दहेत् । यतः क्रोधात् कर्मणा नसा वाचा चतुर्विधानां हिंसनं भवति तं क्रोधं कः समाश्रयेत् । रोगः त्वचं इव एषः स्फीतां व कीर्तिं नाशयति ॥

**अर्थ**—हे दुर्बुद्धि यती, त्यांनीं यथाविधि कर्मसंन्यास केलेला असल्यामुळें कर्मानुष्ठानास योग्य नाहींत. तसेच हे विरक्तीस प्राप्त झालेले

नसल्यामुळें—अविरक्त असल्यामुळें ज्ञानाचेही अधिकारी नाहींत. कारण कोप असतांना विरक्ति कोठची ? १७० अगोदर मनुष्यांचा जन्मच अतिशय कष्टकर आहे. त्या जन्माला कारण होणारा काम त्याहूनही कष्टकर आहे. क्रोध त्याहून—कामाहून कष्टतम आहे; व असा तो क्रोध यांच्या ठिकाणीं चांगला आश्रय करून राहिला आहे. १७१ (क्रोध कामाहून कष्टतम कसा तें सांगतात—) सर्व प्राण्यांना कामाचें कार्य दुःख परिणामींच होतें. वर्तमानकाळीं होत नाहीं. पण क्रोध परिणामीं व वर्तमानसमयींही असा सर्वदा दुःखद म्हटलेला आहे. १७२ (काम केवळ आपल्या आश्रयालाच म्ह० कामी प्राण्यालाच दुःख देतो, पण क्रोध आश्रयाला व विषयालाही दुःख देतो, असा त्या दोघांतील आणखीं विशेष सांगतात—) जेथें तो क्रोध उत्पन्न होतो त्याला तो सर्वतः संतप्त करतो. पण तो दुसऱ्याला ताडनादि करणें या फलासह जेव्हां कचित् असतो तेव्हां विषयालाही संतप्त करतो. १७३. ज्या क्रोधामुळें शरीर, मन व वाणी या साधनांनीं जरायुजादि चतुर्विध भूतांची हिंसा होते त्या क्रोधाचा आश्रय कोण करील ? कुष्ठासारखा रोग जसा अंगकांतीचा—त्वचेचा नाश करतो त्याप्रमाणें हा क्रोध दानादिकांमुळें झालेली विश्वव्यापी कीर्ति नाहींशी करतो. १७४

स्वर्गान्निःसारयत्येष संजातः सफलो नृणाम् । सफलो दुर्जनो यद्वत्फलदं राजमन्दिरात् ॥ १७५॥ अश्ववारं यथा दुष्टो वाजी गर्ते निपातयेत्।एवं क्रोधोऽपि नरके नरमाशु निपातयेत्१७६

अन्वयः—यद्वत् सफलः दुर्जनः फलदं राजमन्दिरात् निःसारयति तद्वत् एषः नृणां संजातः सफलः क्रोधः स्वर्गात् निःसारयति । यथा दुष्टः वाजी अश्ववारं गर्ते निपातयेत् एवं क्रोधतः अपि नरं नरके आशु निपातयेत् ॥

अर्थ—ज्याप्रमाणें सफल दुर्जनानें—ज्याला राजगृहांत प्रवेश होणें हें फल मिळालें आहे अशा दुर्जनानें—त्या प्रवेश करविणारालाच राजगृहांतून बाहेर घालवावें त्याप्रमाणें हा मनुष्यांच्या चित्तांत उत्पन्न झालेला व सफल —ज्यानें त्यांच्यावर परिणाम केला आहे असा क्रोध त्यांना स्वर्गा-

पासून—तप, दान इत्यादि स्वर्गसाधनांपासून दूर सारतो १७५ जसा दुष्ट घोडा स्वाराला गर्तेत—खड्ड्यांत पाडवितो त्याप्रमाणें क्रोधही मनुष्याला नरकांत सत्वर पाडवितो १७६

सुखार्थिनस्ततः पुंसो नास्ति कोपसमो रिपुः ।
ततः कोपो नियन्तव्यः कामादप्यतिकष्टदः ॥ १७७ ॥
यथा वह्निर्महान्दीप्तः शुष्कमार्द्रं च निर्दहेत् ।
एवं कोपोऽत्र संजातो विश्वमेतद्धि निर्दहेत् ॥ १७८ ॥

अन्वयः—ततः सुखार्थिनः कोपसमः रिपुः नास्ति । ततः कामात् अपि अतिकष्टदः कोपः नियन्तव्यः यथा महान् दीप्तः वह्निः शुष्कं आर्द्रं च निर्दहेत्, एवं अत्र संजातः कोपः एतत् हि विश्वं निर्दहेत् ॥

अर्थ—यास्तव सुखाची इच्छा करणाऱ्या पुरुषाला कोपासारखा रिपु नाहीं. म्हणून कामाहूनही अतिशय कष्ट देणाऱ्या कोपाचें अवश्य नियमन करावें १७७ ( आणखी दृष्टान्त—) ज्याप्रमाणें मोठा प्रदीप्त झालेला अग्नि वाळलेल्या व ओल्याही इंधनाला—जळणाला जाळतो त्याप्रमाणें मनुष्याच्या अन्तःकरणांत उत्पन्न झालेला कोप या सर्व अभ्युदय-निःश्रेयससाधनाला जाळून टाकतो. १७८ ( वैराग्याच्या विरुद्ध असलेला जो इच्छारूप काम तो कोपाबरोबर अवश्य असलाच पाहिजे, असा नियम असल्यामुळें कोपावरून विरक्तीच्या अभावाचें अनुमान होतें, असें दोन श्लोकांनीं सांगतात— )

यथा शाद्वलताभावो वृक्षे वह्नेर्विलोकनात्। दुरे स्थितस्य सहसा
पुंसो निश्चितमाव्रजेत् ॥ किंचिद्विरक्तिलेशोऽपि कोपालोकेन
निश्चितः ॥१७९॥ इच्छाविघातं न विना कोपो देहिषु जायते ।
अनुत्पादे न चेच्छाया विघातः कापि दृश्यते ॥ १८० ॥

अन्वयः—यथा वृक्षे शाद्वलताभावः दूरे स्थितस्य पुंसः वह्नेः विलोकनात् सहसा निश्चितं आव्रजेत् तथा कोपालोके विरक्तिलेशः अपि न निश्चितः । इच्छाविघातं विना देहिषु कोपः न जायते । इच्छायाः च अनुत्पादे विघातः क अपि न दृश्यते ॥

अर्थ—ज्याप्रमाणें वृक्षावर सरसता नाहीं, ही गोष्ट दूर प्रदेशीं

स्थित असलेल्या पुरुषाला त्यावर अग्नि आहे, असें पाहून अनायासानें निश्चित करतां येतें (एकादें झाड जळत आहे असें दुरून पाहूनही त्यावर पालवी नाहीं असें निश्चित अनुमान होऊं शकतें) त्याचप्रमाणें एकाद्या पुरुषामध्यें क्रोध आहे, असें पाहून त्याच्या ठिकाणीं विरक्तीचा लेशही नाहीं, असें निश्चयानें कळतें. १७९ कारण इच्छेचा विघात झाल्यावाचून प्राण्यांमध्यें कोप उत्पन्न होत नाहीं, आणि इच्छेची उत्पत्तिच न झाल्यास तिचा विघातही कोठेंच दिसत नाहीं. १८० (विघात म्ह० फलाला प्रतिबंध होणें. या ठिकाणीं कामशब्दाचा कोणता अर्थ विवक्षित आहे तें सांगतात–)

न स्त्रीव्यतिकरापेक्षामात्रं काम उदीरितः ॥
किं तु कामो भवेदिच्छामात्रमत्र शरीरिणाम् ॥ १८१ ॥

अन्वयः––स्त्रीव्यतिकरापेक्षामात्रं कामः न उदीरितः किंतु अत्र शरीरिणां इच्छामात्रं कामः भवेत् ।

अर्थ––केवळ स्त्रीसंबंधाची इच्छा हाच येथें काम म्हणून विवक्षित नाहीं. तर येथें प्राण्यांची कोणतीही इच्छा हाच काम होय. १८१

तावुभौ यदि विद्येते कामक्रोधौ दुरासदौ ॥
अचिकित्स्यो कथं ह्येषा विरक्तिः संभवेदिह ॥ १८२ ॥

अन्वयः––तौ उभौ दुरासदौ अचिकित्स्यौ कामक्रोधौ यदि विद्येते इह हि एषा विरक्तिः कथं संभवेत् ॥

अर्थ––ते दोघे, 'दुरासद-' ज्यांना आपल्या स्वाधीन ठेवणें फार कठीण आहे असे व 'अचिकित्स्य-' ज्यांना कांहीं उपाय नाहीं, असे काम व क्रोध जर विद्यमान आहेत तर या मनुष्यामध्यें ही प्रसिद्ध विरक्ति कशी संभवेल ? १८२ (मुळींच संभवणार नाहीं. 'अहोपण कामक्रोधांना तुम्ही अचिकित्स्य कसें म्हणतां ? मुमुक्षु त्यांची चिकित्सा –यांच्या निवृत्तीचा उपाय करितात, हें प्रसिद्ध आहे,' अशी आशंका घेऊन सांगतात– )

अप्युपायोऽनयोर्दृष्टो यत्संसर्गः सतामिह ॥
सतामग्रेसरेणैते मया नैव वदन्त्यपि ॥ १८३ ॥

**अन्वयः**—यत् अनयोः उपायः अपि दृष्टः सः इह सतां संसर्गः। एते सतां अग्रेसरेण मया न एव वदन्ति अपि ॥

**अर्थ**—कारण कामक्रोधांना निवृत्त करणारा उपायही दृष्ट आहे. तो येथें आत्मवेत्त्याचा संसर्ग—सेवा, परिप्रश्न इत्यादिरूप संबंध होय. पण हे यती तर आत्मवेत्त्यांमध्यें अग्रेसर असलेला जो मी त्या माझ्याशीं बोलतही नाहींत. १८३ ( वैराग्याच्या अभावीं यांचा संन्यास अयोग्य आहे, असें सांगतात— )

अविरक्तेषु किं नाम न्यासात्स्यात्फलमेषु हि ॥ प्रत्युतानेन पतनं भवेद्धि तनुमानिनाम् ॥ १८४ ॥ गुरूनेते न गच्छन्ति मूर्खाः पंडितमानिनः ॥ स्वयं च न विजानन्ति ममसंन्याससंभवम् ॥ १८५ ॥ कामक्रोधाद्यरिगणं सम्यक्संछिद्य सर्वदा ॥ सकारणमहं ब्रह्मेतीत्थं विज्ञानहेतिना ॥१८६ ॥ नितरामासनं स्वस्य पुनरावृत्तिवर्जितम् ॥ यदेतत्स हि संन्यासस्तर्हि नैतेषु विद्यते ॥ १८७ ॥

अन्वयः—एषु अविरक्तेषु न्यासात् किं नाम फलं स्यात् । प्रत्युत अनेन तनुमानिनां पतनं हि भवेत् । एते मूर्खाः पंडितमानिनः गुरून् न गच्छन्ति स्वयं च ममसंन्याससंभवं न विजानन्ति 'अहं ब्रह्म' इति इत्थं विज्ञानहेतिना कामक्रोधाद्यरिगणं सकारणं सम्यक् संछिद्य स्वस्य पुनरावृत्तिवर्जितं यत् एतत् नितरां आसनं स हि संन्यासः यदि तर्हि सः एतेषु न विद्यते ॥

**अर्थ**—या अविरक्त यतींच्या ठिकाणीं संन्यासामुळें कोणतें फळ—कोणता परिणाम होणार ? संन्यासाचा यांवर कांहीं परिणाम—उपयोग होणें शक्य नाहीं. उलट शरीराभिमानी—शरीरच मी असें समजणाऱ्या यांचें या संन्यासानें अधःपतनच होईल १८४. हे मूर्ख व आपल्याला पंडित मानणारे यती गुरुमुखानें तत्त्वनिश्चय करण्यासाठीं गुरूपाशीं जात नाहींत. ( कारण गुरुमुखानें तत्त्वनिश्चय करणें हेंच विविदिषा संन्यासाचें

फळ आहे. पण यांना विविदिषाच नाहीं. मग विद्येच्या अभावीं विद्वत्संन्यासफलाची आशा तर दूरच राहिली, असें सुचवितात--) आपला संन्यास संभवतो कीं नाहीं, हेंही ते स्वतः जाणत नाहींत. मग याहून अधिक ज्ञानाची आशाच कशाला हवी? १८५ 'मी ब्रह्म आहें' अशाप्रकारच्या ज्ञानरूप शस्त्रानें काम-क्रोधादि शत्रुगणांस कारणांसह उत्तमप्रकारें तोडून १८६ (हा संन्यासशब्दांतील 'सं'या उपसर्गाचा अर्थ आहे. न्यासशब्दांतील 'नि' व 'आस' या अवयवांचा अर्थ--) स्वतःची जी नितरां--अत्यंत 'आसनं-' स्थिति, नितरां म्ह० पुनर्जन्मरहित स्थिति, तीच जर संन्यास असेल--कर्मफलविलक्षणज्ञानफलरूप जें ब्रह्म त्या ब्रह्मभावानें अवस्थान हाच संन्यासशब्दाचा खरा अर्थ असेल तर तो संन्यास या अविद्वान् व अविरक्त पुरुषांमध्यें नाहीं १८७ (आतां संन्यासशब्दान विविदिषा संन्यासाचा संग्रह करण्यासाठीं दुसऱ्या प्रकारें अर्थ सांगतात--)

अथवा सं धिया गम्यं फलजातं ससाधनम् ।
इहामुत्र च संत्यज्य नितरामासनं गुरौ ॥
आत्मविज्ञानसंतत्यै तदप्येषु न विद्यते ॥ १८८ ॥

**अन्वयः**--अथवा 'सं' गम्यं ससाधनं इहामुत्र फलजातं धिया संत्यज्य आत्मविज्ञानसंतत्यै गुरौ नितरां आसनं तत् अपि एषु न विद्यते ॥

अर्थ--किंवा 'सं' म्ह० क्रियांनीं प्राप्त होणारें साधनांसह ऐहिक व पारलौकिक फलजात--सर्व फल बुद्धीनें सोडून म्ह० त्यापासून विरक्त होऊन आत्मविज्ञानाच्या संततीसाठीं गुरुसमीप अत्यंत वास करणें हा संन्यास आहे तोही यांच्या ठिकाणीं नाहीं १८८.

न हि संन्यासतो मुक्तिर्नटानां सा कुतो न हि । किन्तु सर्वाभिलाषस्य कोपस्य च विवर्जनात् ॥ सर्वात्मनाप्यशक्यत्वे साधुशास्त्रसमाश्रयात् ॥ १८९ ॥ कालुष्यं हि यथा हन्यान्नीराणां हि शरच्छनैः । कामक्रोधौ तथा दीप्तौ साधुशास्त्रे हतः शनैः ॥ १९० ॥ दुर्दान्तो हि यथा वाजी कालेन दम-

मात्रजेत् ॥ शिक्ष्यमाणो नरैस्तज्ज्ञैः शिक्षाभेदैरनेकशः॥१९१॥
दुर्दान्तं मन एवं हि कामक्रोधवशं गतम् ॥ गुरुशास्त्रैः शि-
क्ष्यमाणं दान्तं भवति कालतः ॥१९२॥

अन्वयः---हि संन्यासतः मुक्तिः न । सा नटानां कुतः न हि । किंतु सर्वाभिलाषस्य च कोपस्य विवर्जनात् मुक्तिः । सर्वात्मना अशक्यत्वे अपि साधुशास्त्रसमाश्रयात् मुक्तिः भवति । यथा हि शरत् शनैः नीराणां कालुष्यं हन्यात् तथा साधुशास्त्रे दीप्तौ कामक्रोधौ शनैः हतः । यथा हि दुर्दान्तः वाजी तज्ज्ञैः नरैः अनेकशः शिक्षाभेदैः शिक्ष्यमाणः कालेन दमं आव्रजेत् । एवं हि दुर्दान्तं कामक्रोधवशं गतं मनः गुरुशास्त्रैः शिक्ष्यमाणं कालतः दान्तं भवति ॥

अर्थ—केवल आश्रमरूप संन्यासानें—नुस्तें भगवें केल्यानें—मुक्ति मिळत नाहीं. कारण भगवें केल्यानेंच जर मुक्ति मिळाली असती तर संन्याशाचें सोंग घेणाऱ्या नटाला ती कां मिळत नाहीं ? अर्थात् नुसत्या संन्यासानें मुक्ति नाहीं तर सर्व काम व कोप यांना वर्ज्य केल्यानेंच मुक्ति मिळते. काम-क्रोधांना सर्वरूपानें—सर्वथा वर्ज्य करणें जर अशक्य असेल तर साधु व शास्त्र यांचा चांगला आश्रय केल्यानेंही मुक्ति मिळते १८९ ज्याप्रमाणें शरत् ऋतु जलाची मलिनता हळू हळू नाहींशी करतो त्याप्रमाणें साधु व शास्त्र दीप्त काम-क्रोधांना हळू हळू घालवितात. १९० ज्याप्रमाणें दुर्दांत-ज्याचें दमन करणें कठिण आहे, असा दुष्ट घोडा तज्ज्ञ लोकांकडून विशेष प्रकारच्या विविध शिक्षणांनीं शिकविला जाऊं लागला असतां कांहीं कालानें दमास—दोषराहित्यास प्राप्त होतो १९१ त्याप्रमाणेंच दुर्दान्त व काम-क्रोधांच्या अधीन झालेलें मन गुरु व शास्त्र यांच्या कडून शिक्षित होऊं लागलें असतां बऱ्याच कालानें दान्त म्ह० दोषरहित होतें. १९२.

आशा नैतेषु साप्यस्ति नित्यं पंडितमानिषु ॥
अनादृतवचःस्वात्मबोधशून्येषु कर्मिषु ॥ १९३ ॥
कर्मिणां न हि संन्यासो विहितः सततिं विना ॥
किं तु स्वात्मावबोधार्थं यदित्यादि वचो भवेत् ॥१९४॥

अन्वयः--एतेषु नित्यं पंडितमानिषु अनादृतवचःसु आत्मबोधशून्येषु कर्मिषु

सा अपि आशा नास्ति । कर्मिणां संन्यासः सप्तति विना न हि विहितः । किंतु स्वात्मावबोधार्थं 'यदित्यादि' वचः भवेत् ॥

अर्थ—सतत आपल्याला पंडित मानणारे, गुरु व वेदान्त यांच्या वचनाचा अनादर करणारे, आत्मबोधशून्य व त्यामुळेंच कर्मांचे अधिकारी अशा यांच्या ठिकाणीं साधु व शास्त्र यांच्या आश्रयानें मोक्ष संपादन करण्याची आशाही नाहीं १९३ कर्मठांना वयाला सत्तर वर्षें झाल्यावाचून संन्यास विहित नाहीं. पण त्या वयाच्या पूर्वींही स्वात्मसाक्षात्काराकरितां–स्वात्मबोधाकरितांच तो विहित आहे. कारण 'जेव्हां वैराग्य येईल तेव्हां संन्यास करावा,' किंवा याच्या उलट 'ब्रह्मचर्यापासूनच संन्यास करावा.' इत्यादि श्रुतिवचनें याविषयीं प्रमाण आहेत १९४.

आत्मानात्मविवेकार्थं संन्यासो विहितः श्रुतौ ॥
नैते कुर्वन्ति तं मन्दाः पतितास्तेन हेतुना ॥ १९५ ॥
क्रमप्राप्ते तु संन्यासे संन्यासाद्ब्रह्मलोकगाः ॥
अन्येषामुभयभ्रंशः स्वात्मबोधविवर्जनात् ॥ १९६ ॥

अन्वयः—श्रुतौ आत्मानात्मविवेकार्थं संन्यासः विहितः । एते मन्दाः तं न कुर्वन्ति । तेन हेतुना पतिताः । क्रमप्राप्ते संन्यासे तु संन्यासात् ब्रह्मलोकगाः भवन्ति । अन्येषां स्वात्मबोधविवर्जनात् उभयभ्रंशः भवति ॥

अर्थ—बृहदारण्यकादि श्रुतींत आत्मानात्मविवेकार्थ संन्यास विहित आहे. पण हे मंद यती आत्मानात्मविवेक करीत नाहींत. त्या कारणानें हे आपल्या आश्रमापासून पतित झाले आहेत. १९५ ब्रह्मचर्यानंतर गृहस्थाश्रम, त्यानंतर वानप्रस्थाश्रम व शेवटीं संन्यास या क्रमानें प्राप्त झालेल्या संन्यासांत सत्तर वर्षांनंतर अधिकार येतो व ब्रह्मलोकाच्या इच्छेनें जे हा क्रमसंन्यास करितात ते त्या संन्यासामुळें ब्रह्मलोकीं जातात. पण ब्रह्मलोकासाठीं क्रमसंन्यास व आत्मज्ञानासाठीं वैराग्य येतांच विहित असलेला संन्यास, यांनीं हीन असलेल्या इतरांचा स्वात्मबोधशून्यतेमुळें अभ्युदय व मोक्ष या दोन्हींपासून भ्रंश होतो. १९६ (अहो-पण हे अहिंसा, सत्य इत्यादि यतिधर्मांनीं युक्त आहेत, त्यामुळें यांना

शेवटीं योगभ्रष्टाची तरी गति मिळणें अशक्य नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात--)

यद्यप्येते सदाचाराश्चतुर्थाश्रमसंश्रयाः ॥ विप्रास्तथापि दुर्दांताः शासकाभावतोऽधुना ॥ १९७ ॥ नैतेषां गुरुरस्तीह नियच्छेद्य इमान्बलात् ॥ नैते हि स्वात्मनात्मानं प्रभाविष्यान्ति कर्हिचित् ॥१९८॥ नियन्तुं यन्मयाप्युक्ता वेदार्थे न धियं दधुः ॥ शास्या राज्ञा दुरात्मानो राजाहं जगतोऽपि च ॥१९९॥

अन्वयः--यद्यपि एते सदाचाराः चतुर्थाश्रमसंश्रयाः च विप्राः, तथापि अधुना शासकाभावतः दुर्दान्ताः सन्ति । यः इमान् बलात् नियच्छेत् एवंविधः इह एतेषां गुरुः नास्ति । एते हि कर्हिचित् स्वात्मना आत्मानं नियन्तुं न प्रभविष्यन्ति ॥ यत् मया उक्ताः अपि एते वेदार्थे धियं न दधुः । राज्ञा दुरात्मानः शास्याः । अहं जगतः अपि च राजा ॥

अर्थ--जरी हे सर्व सदाचार संपन्न आहेत, यांनीं चतुर्थाश्रमाचा आश्रय केला आहे, व हे ब्राह्मण आहेत तथापि हल्लीं माझ्याशीं व्यवहार करतांना यांचा कोणी शासक नसल्यामुळें हे दुर्दान्त म्ह० दुष्ट-दोषयुक्त आहेत. १९७. जो यांचें बलात्कारानें नियमन करूं शकेल-यांना योग्य मार्गामध्यें प्रस्थापित करूं शकेल असा यांचा गुरु नाहीं. हे आपणच आपलें नियमन करण्यास-आपणच आपल्याला सन्मार्गाला लावण्यास समर्थ नाहींत. कारण मीं--सुरेश्वरानें सांगितलें असतांही हे आपल्या मतीला वेदार्थामध्यें स्थिर करूं शकले नाहींत. राजानें दुरात्म्यांना शासन करणें अवश्य आहे. मी सर्व जगाचाही राजा आहें. १९८,१९९ (यास्तव मलाच यांना शासन केलें पाहिजे.) पण--

न चैषां वित्तमस्त्यत्र यदाऽऽदानाद्वधो भवेत् ॥ मुंडिता हि स्वयं तस्मादमीषां न वधोऽपि वत् ॥ २०० ॥ देशान्निःसारणं प्राप्तं देशोऽयं सकलो मम ॥ कथं निःसारयिष्यामि विना देहविमोचनम् ॥ २०१ ॥ अमीषां विद्यते नैव त्रिलोक्याश्च बहिर्गतिः ॥ त्रिलोकी च समग्रा मे वधान्नास्त्यपरस्ततः ॥२०२॥

अन्वयः--अत्र एषां वित्तं न च अस्ति । यदादानात् वधः भवेत् । स्वयं हि

मुंडिताः, तस्मात् अमीषां तत् अपि न वधः । अतः देशात् निःसारणं प्राप्तं, परंतु अयं सकलः एव देशः मम । अतः कथं निःसारयिष्यामि । देहविमोचनं विना अमीषां त्रैलोक्याः बहिर्गतिः न विद्यते एव । समग्रा त्रिलोकी च मे ततः वधात् अपरः दण्डः न अस्ति ॥

अर्थ—येथें यांचें वित्त—धन नाहीं, कीं जें यांच्यापाशीं असलेलें धन घेतल्यानें यांना दंड होईल ! ( मुंडन हा दंडाचा दुसरा प्रकार आहे. पण ) हे स्वतःच मुंडित आहेत— यांनीं अगोदरच आपलें मुंडन केलेलें आहे. त्यामुळें यांना मुंडन हाही दंड करतां येत नाहीं २०० त्यानंतर यांना हद्दपार करणें—आपल्या देशांतून घालवून देणें हा दंडाचा तिसरा प्रकार प्राप्त होतो. पण हा सकल देश—सर्वच प्रदेश माझा आहे. तेव्हां यांना देशाच्या बाहेर कसें घालवूं ? देहाचा त्याग करविल्यावाचून त्रैलोक्याच्या बाहेर यांची गति होऊंच शकत नाहीं, आणि समग्र त्रिलोकी तर माझी आहे. त्यामुळें यांना देहदंडावाचून दुसरा दंडच नाहीं २०१-२०२.

**इति संचिन्त्य तान्सर्वान्शब्दशून्याननान्यतीन् ॥ शालावृकेभ्यो विपिने हत्वाऽदां लोकरक्षकः ॥२०३॥ यतीनामद्यमानानां शालावृकशतैस्ततः ॥ मस्तकान्यपतन् भूमावनाद्यान्यस्थिरूपतः २०४**

अन्वयः—इति संचिन्त्य लोकरक्षकः अहं तान् सर्वान् शब्दशून्याननान् यतीन् हत्वा विपिने शालावृकेभ्यः अदाम् । ततः शालावृकशतैः अद्यमानानां यतीनां अस्थिरूपतः अनाद्यानि मस्तकानि भूमौ अपतन् ॥

अर्थ—येथवर सांगितल्याप्रमाणें विचार करून लोकरक्षक असलेल्या मीं ज्यांचीं तोंडें वेदान्तशब्दानें शून्य आहेत अशा त्या सर्व यतींस मारून अरण्यांत शालावृकांस—कोल्हे-कुत्रे-लांडगे यांस खाण्यासाठीं दिलें २०३. त्यानंतर शालावृकांकडून खाल्ल्या जाणाऱ्या त्या यतींचीं अस्थिरूप असल्यामुळें खाण्यास अयोग्य असलेलीं मस्तकें वनभूमींतच पडलीं २०४ ( या श्लोकापासून पुढील सात श्लोकांत तैत्तिरीय शाखेंतील ' यतीनामद्यमानानां शीर्षाणि परापतन् । तानि खर्जूरा अभवन् ' इत्यादि कारीरि इष्टीच्या विधीच्या अर्थवादांत सांगितलेल्या कथेचा उपन्यास करितात—)

शालावृकास्तु मांसानि तेषां दाक्षिणभागतः ॥ आदन्नुत्तरवेद्यास्ते कर्मिणां दर्शनाय हि ॥२०५॥ कर्म नैव परित्याज्यं विरागेण विना क्वचित् ॥ त्यागे चैषा भवेन्नूनमवस्था दुष्टचेतसाम्॥ २०६॥तेषां शीर्षाणि खर्जूरा यतीनामभवंस्ततः॥खर्जूराणां हि यः सारो रस ऊर्ध्वमुपागतः ॥ २०७ ॥ करीराण्यभवंस्तानि सौम्यान्याहुतिसाधनम् ॥ यतः संन्यासिनः सौम्याः स्वभावात्क्रोधवर्जिताः ॥ २०८ ॥ देहत्यागाद्गतक्रोधा ऊर्ध्वरेतस्त्वहेतुतः ॥ ऊर्ध्वभागात् शिरोरूपाद्दशमद्वाररूपकाः ॥२०९॥ खर्जूरास्तत्र संजातास्तेषु रेतश्चिरं धृतम् ॥ साररूपं तु सौम्यं तत्करीराणीति कीर्तितम् ॥ २१० ॥

**अन्वयः**—शालावृकाः कर्मिणां दर्शनाय तेषां मांसानि तु उत्तरवेद्याः दक्षिणभागतः आनीय आदन् । विरागेण विना क्वचित् कर्म न परित्याज्यं एव त्यागे च दुष्टचेतसां नूनं एषा अवस्था ( प्रभोः कोपात् ) भवेत् । ( इति तद्भक्षणे ज्ञापितं ) तेषां यतीनां यानि वने पतितानि शीर्षाणि आसन् तानि खर्जूराः अभवन् । ततः खर्जूराणां हि यः सारः रसः सः ऊर्ध्वं उपागतः । ( सः रसः भूमौ पतितः सन् ) तानि सौम्यानि करीराणि—आहुतिसाधनं—अभवन् । यतः संन्यासिनः सौम्याः स्वभावात्क्रोधवर्जिताः आसन् । देहत्यागात् गतक्रोधाः । ऊर्ध्वरेतस्त्वहेतुतः शिरोरूपात् ऊर्ध्वभागात् दशमद्वाररूपकाः खर्जूराः तत्र संजाताः । तेषु यत् चिरं धृतं सौम्यं साररूपं रेतः तदेव खर्जूररसभावक्रमेण करीराणि इति तैत्तिरीयशाखायां कीर्तितम् ॥

अर्थ—( मज अन्तर्यामीच्या प्रेरणेनें ) ते शालावृक कर्मठांना दाखविण्यासाठीं त्यांचीं मांसें तर उत्तर वेदीच्या—यागभूमीच्या दक्षिणभागीं आणून खाते झाले २०५. वैराग्यावांचून केव्हांही कर्माचा त्याग करूंच नये व तो केल्यास त्या त्या दुष्टचित्त पुरुषांची खरोखर अशी दशा [ प्रभूच्या कोपामुळें ] होईल [ असें त्या मांसभक्षणानें त्यांनीं कर्मठांस सुचविलें. ] २०६. त्या यतींचीं वनांत पडलेलीं जीं मस्तकें होतीं तींच खजूराचीं झाडें झालीं. त्यानंतर खजूरांचा जो सारभूत रस तो वर आला. २०७ [ तो रस भूमीवर पडलेला असा होत्साता ]

तीं सौम्य करीरें आहुतिसाधन झाली ( तो रस करीराच्या--वंशांकुराच्या --बांबूच्या कोंबांच्या रूपानें परिणत झाला. तीं करीरें सौम्य म्ह० अनुग्र --शांत होतीं. सौम्य असल्यामुळेंच देवताप्रसादाला कारण होणारें असें तें आहुतिसाधन झालें. करीरांना सौम्यत्व कसें प्राप्त झालें तें सांगतात-- ) कारण परंपरेनें करीरांचे कारणभूत असे ते संन्यासी सौम्य--स्वभावतः क्रोधवर्जित होते २०८. ( ते कसे ? ) इंद्रानें देह-त्यागरूप दंड केल्यामुळें ते गतक्रोध झाले होते. ( त्यांचा पापमय क्रोध गेला होता. त्यामुळें ते स्वभावभूत सौम्यतेंतच स्थित झाले, असा भावार्थ, तथापि करीरामध्यें त्यांची सौम्यता कशी आली ? उत्तर--) ते यती ऊर्ध्वरेते होते. त्यामुळें त्यांचें रेत मस्तकांत स्थित होतें. तथापि त्यांचा स्वभाव नष्ट झाला नव्हता. यास्तव त्यापासून मस्तकरूप शरीराच्या ऊर्ध्व भागांतून दशमद्वाररूप खर्जूर झाले. त्या यतींच्या दशमद्वारांत जें चिरकाल धारण केलेलें अत्यंत सौम्य म्ह० कामाग्नीमुळें होणाऱ्या क्षोभानें रहित असल्यामुळें अत्यंत शांत व सार-रूप रेत तें खर्जूररसत्वक्रमानें करीरत्वास प्राप्त झालें, असें तैत्तिरीय शाखेच्या कारीरीष्टिप्रकरणांत सांगितलें आहे. २०९,२१०.

आहुत्या त्वनयाहं हि प्रीतः सर्वात्मकः पुमान् ॥ वृष्टिं सौ-म्यतमां सर्वजन्तूनामुपकारिणीम् ॥ २११ ॥ करोमि ते च यतयो गतदेहा महाधियः ॥ देहान्तरेण मामेव प्राप्ताः क्रोधादि-वर्जिताः ॥ २१२ ॥ व्यासनारायणादीनां विद्यासंतति-पातिनः ॥ अहं ब्रह्मेतिविज्ञानविध्वस्ताखिलतामसाः ॥२१३॥

अन्वयः---अनया-अतिसौम्यया करीराहुत्या अहं-इन्द्रः-सर्वात्मकः पुमान् प्रीतः सन् सर्वजन्तूनां उपाकारिणीं सौम्यतमां वृष्टिं करोमि । ते च यतयः गतदेहाः महाधियः क्रोधादिवर्जिताः व्यासनारायणादीनां विद्यासंततिपातिनः ' अहं ब्रह्म ' इतिविज्ञानविध्वस्ताखिलतामसाः देहान्तरेण मामेव प्राप्ताः ॥

अर्थ---या अतिसौम्य करीराहुतीनें मी इंद्र सर्वात्मक पुरुष संतुष्ट

होत्साता सर्व प्राण्यांवर उपकार करणारी अंत्यंत सौम्य वृष्टि करतो. ( आतां त्या यतींची गति काय झाली तें सांगतात-) ते यती देह-रहित झाल्यामुळें—देहत्याग या दंडामुळें शुद्ध झाले. महाबुद्धिमान् व क्रोधादिविरहित झाले. व्यास-नारायणादिकांच्या विद्यासंप्रदायांतच पड-ण्याचें ज्यांचें शील आहे, असे ते झाले. ' मी ब्रह्म आहें ' या विज्ञा-नानें त्यांचा सर्व तमोगुण नष्ट झाला, आणि दुसऱ्या देहानें ते मलाच प्राप्त झाले २११-२१३.

न केवलं विश्वरूपो ब्राह्मणा यतयस्तथा ॥
निहता वेदविद्वांसः शापानुग्रहकारिणः ॥ २१४ ॥

अन्वयः—केवलं विश्वरूपः न तथा केवलं ब्राह्मणाः यतयः न किंतु वेदवि-द्वांसः शापानुग्रहकारिणः निहताः ॥

**अर्थ**—केवळ त्रिशीर्ष विश्वरूपाला व ब्राह्मण संन्याश्यांनाच मीं मारलें असें नाहीं, तर शाप देण्याचें किंवा अनुग्रह करण्याचें ज्यांना सामर्थ्य आहे अशा वेदवेत्त्यांनाही मारलें २१४.

अन्येऽपि वेदविद्वांसो बलिनो मायिनस्तथा ॥ निहताः कोटिशो दैत्याः प्रह्लादतनयादयः ॥ बलेन मत्समास्ते हि मत्तो वाभ्य-धिका इमे ॥ २१५ ॥ तत्कृताश्च महामाया मायिनामपि मोहिनीः ॥ अलौकिकं तथा वीर्यं तेषामादित्यवर्चसाम् ॥ अतिक्रम्यात्मविज्ञानान्न्यहनं दैत्ययूथपान् ॥ २१६ ॥

अन्वयः—अन्ये अपि वेदविद्वांसः बलिनः तथा मायिनः प्रह्लादतनयादयः दैत्याः कोटिशः निहताः । ते हि बलेन मत्समाः वा इमे मत्तः अभ्याधिकाः । तत्कृ-ताः च मायिनां अपि मोहिनीः महामायाः । तथा आदित्यवर्चसां तेषां अलौकिकं वीर्यं आत्मविज्ञानात् अतिक्रम्य तान् दैत्यपुंगवान् न्यहनं ॥

**अर्थ**—दुसरेही वेदवेत्ते, बळाढ्य, तसेच मायावी प्रह्लादतनयादिक दैत्य मीं कोटिशः मारले. ते बळानें माझ्या सारखेच किंवा हे सर्व

---

१ यति सौम्य, त्यांच्या रेतापासून झालेलीं शरीरें सौम्यतर व त्यांच्या आहु-तीपासून होणारी वृष्टि सौम्यतम, असा भावार्थ.

माझ्यापेक्षां सर्व प्रकारें अधिक होते २१५. मयासुरादिकांनाही विस्मय वाटेल अशा त्यांनीं केलेल्या महामाया व आदित्यासारखें ज्यांचें तेज आहे अशा त्यांचें विचित्र वीर्य यांचें मीं आत्मसाक्षात्काराच्या बलानें अतिक्रमण करून त्या दैत्यसमूहांस मारलें २१६.

दिवि प्रह्लादनामांकान्पौलोमांश्च विहायसि ॥ कालखाञ्जांस्तथा भूमौ हतवानहमासुरान् ॥ २१७ ॥ ब्रह्मघ्नस्य यतिघ्नस्य दैत्यानां घातकस्य च ॥ लोमापि न विनष्टं मे शापेनापि शरेण वा ॥ २१८ ॥ अपकीर्तिर्न मे कापि लोकेऽभूत्क्रूरकर्मणः ॥ प्रत्युतात्राभवत्कीर्तिः कीर्तनीया महात्मभिः॥२१९॥ आत्मविज्ञानसंपन्नः कृतवान्हि सहस्रशः ॥ लोकवेदनिषिद्धानि कर्माण्येवं प्रतर्दन ॥ २२० ॥

अर्थ—स्वर्गांत प्रह्लाद या नांवानें चिह्नित असलेल्या म्ह० प्रह्लादसंबंधी असुरांस, अन्तरिक्षांत पौलोमांस म्ह० वैश्वानरनांवाच्या दानवाची कन्या जी पुलोमा, तिच्या अपत्यांस, त्याचप्रमाणें कालखंज या नांवाच्या असुरांस भूलोकीं मीं मारलें २१७. येणेंप्रमाणें ब्रह्मघ्न, यतिघ्न, व दैत्यांचा घातक अशा माझें शाप किंवा शर यांतील कशानेंही एक लोमही नष्ट झालें नाहीं २१८. ‘ लोके मे क्रूरकर्मणः का अपि अपकीर्तिः न अभूत् । प्रत्युत हे प्रतर्दन, आत्मविज्ञानसंपन्नः इंद्रः एवं लोकवेदनिषिद्धानि कर्माणि सहस्रशः कृतवान् हि इति अत्र महात्मभिः कीर्तनीया कीर्तिः अभवत्-’ लोकांत क्रूर कर्में करणाऱ्या माझी थोडीशी सुद्धां अपकीर्ति झाली नाहीं. उलट हे प्रतर्दना, आत्मविज्ञानसंपन्न इंद्र अशारीतीनें लोकनिषिद्ध व वेदनिषिद्ध कर्में सहस्रशः करता झाला, अशी येथें महात्म्यांनीं वर्णन करण्यास योग्य अशी माझी कीर्ति झाली. २१९–२२०.

शापा द्विजोत्तमानां ये प्रतीकारविवर्जिताः ॥ ब्रह्मास्त्रादीनि चास्त्राणि तादृशानि सहस्रशः ॥ २२१ ॥ मायाश्च दैत्यभेदानां मयस्यापि विमोहिकाः ॥ शस्त्राणि दितिजैः शूरैर्मत्तोधि-

कबलैरपि ॥ २२१ ॥ प्रेषितानि भृशं क्रुद्धैर्मृत्युवक्त्रसमान्यपि ॥ मेरुमन्दरभेदीनि नानाभेदान्यनेकशः ॥ २२३ ॥ हिंसां लोम्नोपि नो चक्रुः कुतः स्यान्मे व्यथा ततः ॥ २२४ ॥

अर्थ—( माझें लोमही नष्ट झालें नाहीं, असें जें वर म्हटलें आहे त्याचेंच चार श्लोकांनीं स्पष्टीकरणः—) 'ये प्रतीकारविवर्जिताः द्विजोत्तमानां शापाः-' जे प्रतीकारशून्य—प्रतीकार न करतां येण्यासारखे श्रेष्ठ द्विजांचे शाप, 'तादृशानि-' तशींच अप्रतीकार्य अशीं जीं ब्रह्मास्त्रादिक सहस्रावधि अस्त्रें, 'मयस्य अपि विमोहिकाः दैत्यभेदानां मायाः-' मयासुरालाहि विमोह पाडणाऱ्या—त्यालाही आश्चर्यचकित करणाऱ्या निरनिराळ्या प्रकारच्या दैत्यांच्या माया, 'मत्तः अपि अधिकबलैः शूरैः भृशं क्रुद्धैः दितिजैः प्रेषितानि मृत्युवक्त्रसमानि अपि मेरुमन्दरभेदीनि नानाभेदानि अनेकशः शस्त्राणि मे लोम्नः अपि हिंसां नो चक्रुः ततः व्यथा कुतः स्यात्-' मजहूनही अधिक बलाढ्य अशा शूर व अत्यंत क्रुद्ध झालेल्या दितिजांनीं—दैत्यांनीं सोडलेलीं मृत्यूच्या साक्षात् मुखांसारखीं, मेरु-मंदाराचाही भेद करणारीं अनेक प्रकारचीं अनेक शस्त्रें माझ्या एका केंसालाही धक्का लावूं शकलीं नाहींत. मग त्यापासून मला व्यथा कोठून होणार ? ( शाप, शस्त्रें, माया व अस्त्रें माझी कांहीं हानि करूं शकलीं नाहींत. ) २२१–२४.

यथा मम स्वविज्ञानान्नाभूल्लोकद्वयेऽपि हि ॥
हिंसा तथैव चान्यस्य मज्ज्ञानान्नैव जायते ॥
लोकवेदनिषिद्धेन दुष्करेणापि कर्मणा ॥ २२५ ॥

अर्थ—ज्याप्रमाणें मज इंद्राची 'स्वविज्ञानात्-' आत्मविज्ञानामुळें 'लोकद्वये अपि हिंसा न अभूत्-' दोन्ही लोकीं हिंसा झाली नाहीं—ऐहिक व पारलौकिक हानि झाली नाहीं. 'तथा एव-' त्याचप्रमाणें दुसऱ्या कोणाचीही माझ्या—आत्म्याच्या ज्ञानामुळें लोकनिषिद्ध व वेदनिषिद्ध अशा दुष्कर कर्मानेंही 'हिंसा-' हानि होतच नाहीं २२५.

[ श्रुतिः—' न मातृवधेन न पितृवधेन न स्तेयेन न भ्रूणहत्यया

नास्य पापं चन चक्षषो मुखान्नीलं वेतीति ॥ १ ॥' मातृवधानें ह्याचें फळ नष्ट होत नाहीं. पितृवधानें होत नाहीं. ( माता व पिता प्रसिद्ध आहेत ) ' न स्तेयेन-' सुवर्ण म्हणून एक ऐशीं गुंजाभार सोन्याचें नाणें आहे. ह्या परिमाणाचें किंवा त्याहून अधिक परिमाणाचें सोनें त्याच्या धन्याला न विचारतां त्याच्या परोक्ष घेणें हें स्तेय. त्या स्तेयानें--सोन्याच्या चोरीनें त्याची हानि होत नाहीं. 'न भ्रूणहत्यया-' भ्रूण म्ह० वेदाध्ययनानंतर सूत्र-भाष्यादिकांचें अध्ययन करणारा ब्राह्मण. त्याची शरीर, वाणी व मन यांनीं हिंसा करणें ही भ्रूणहत्या. तिच्या योगानेंही त्याचें कर्मफळ नष्ट होत नाहीं. 'पापं चन चक्षुःअस्य-' फार काय पण पापही करण्याची इच्छा करणाऱ्या या आत्मज्ञान्याच्या ' मुखात् नीलं न वेति-' मुखावरून नील--मुखकांतिस्वरूप जात नाहीं--याचें तोंड निस्तेज होत नाहीं. ' इति-' शेवटचा इतिशब्द प्रकृत ब्रह्मज्ञानाच्या स्तुतीच्या परिसमाप्त्यर्थ आहे. ] १.

पितृमातृवधेनापि सुवर्णस्तेयतोऽपि वा ॥ श्रोत्रियस्य द्विजेंद्रस्य गुणोदधिसमस्य वा ॥ २२६ ॥ पूर्णदेहस्य गर्भस्य राज्याद्यर्हस्य धीमतः॥ स्वकीयस्य च वा तस्माद्दुष्करेण वधेन वा ॥ २२७ ॥ विप्रस्य वा त्रिवर्णस्य सुरापानोत्थितेन वा ॥ निजां वा जननीं कामाद्ग्राम्यधर्मसमागमात् ॥ २२८ ॥ संवत्सरं वा संसर्गाद्ब्रह्महत्यादिकारिभिः ॥ चतुर्भिः कर्मचंडालैः पतितैः पापहेतुभिः ॥ २२९ ॥ एवमन्यैर्महाक्रूरैः पातकैश्चोपपातकैः ॥ संकरीकरणाद्यैश्च लोकद्वयविनिन्दितैः ॥ २३० ॥ अपि वाप्यात्मविज्ञानसंपन्नस्य महात्मनः ॥ पापेच्छोरपि नापैति मुखकान्तिः कदाचन ॥ २३१ ॥

अर्थ—पिता व माता यांच्या वधानेंही, अथवा सुवर्णाच्या चोरीनेंही, प्रवचनान्त विद्या संपादन केलेल्या श्रोत्रिय ब्राह्मणाच्या किंवा ज्याचा देह पूर्ण वाढला आहे अशा ( किंवा अज्ञात ) गर्भाच्या, राज्यादिकांस योग्य असलेल्या वेदान्तपारंगत ब्राह्मणाच्या अथवा बुद्धिमानाच्या वधानें

किंवा स्वकीयाच्या—सुहृदाच्या लोक-वेदविरुद्ध अशा दुष्कर वधानें त्याची कांहीं हानि होत नाहीं. २२६, २२७. ‘ विप्रस्य वा त्रिवर्णस्य वा सुरापानोत्थितेन-’ किंवा ब्राह्मणाच्या किंवा द्विजाच्या मद्यपानामुळें उद्भवलेल्या पापानें, अथवा ‘ कामात् निजां जननीं ग्राम्यधर्मसमागमात्--’ कामामुळें आपल्या जननीशीं ग्राम्यधर्मानें समागम केल्यानें लागणाऱ्या पापानें, २२८ किंवा ‘ ब्रह्महत्यादिकारिभिः चतुर्भिः कर्मचण्डालैः पापहेतुभिः पतितैः सह संवत्सरं संसर्गात्--’ ब्रह्महत्या, सुरापान, सुवर्णचौर्य व गुरुस्त्रीगमन हीं महापापें करणारे जे चार कर्मचांडाल, म्हणूनच पतित व स्वसंसर्गानें पतित करणारे अशा पाप्यांशीं एक वर्षभर संसर्ग केल्यामुळें होणाऱ्या पांचव्या महापातकानें २२९ त्याचप्रमाणें दुसऱ्या--शरणागताचा घात करणें, इत्यादि महापातकसम पापांनीं, गोवधादि उपपातकांनीं, संकरीकरण, जातिभ्रंशकर इत्यादि दोन्ही लोकीं अत्यंत निंदित असलेल्या पातकांनीं २३०, ‘ अपि वा मम आत्मनः आत्मविज्ञानसंपन्नस्य पापेच्छोः अपि मुखकान्तिः कदाचन न अपैति-’ किंबहुना मज इंद्राचा आत्माच--स्वरूपच, असा आत्मविज्ञानसंपन्न पुरुष पापाची इच्छा जरी करूं लागला तरी त्याच्या मुखावरील कांति केव्हांही दूर होत नाहीं. ( पापाचरण करणाऱ्या अनात्मवेत्त्यांच्या तोंडावरील तेज नष्ट होतें, हें प्रसिद्ध आहे. म्हणजे ब्रह्मविद्येचा हा उत्कर्ष प्रत्यक्ष आहे. )२३१.

राजबंध्वादयस्तद्वज्ज्ञात्वास्यैतां धियं सदा ॥ पापेच्छानिरतं तद्वन्महापापौघकारिणम् ॥ २३२ ॥ न त्यजन्ति न भिन्दन्ति नैव शिक्षां च कुर्वते ॥ प्रत्युताधिकमेवैनमाद्रियन्तेऽतिविस्मिताः ॥ २३३ ॥

**अर्थ**—(श्रुतीनें सांगितलेल्या आत्मज्ञानाच्या प्रभावावरून सर्वमान्यतारूप दुसरा प्रभावही सूचित होतो, तोच दाखवितात--) ‘ तद्वत् राजबन्ध्वादयः अस्य एतां धियं ज्ञात्वा सदा पापेच्छानिरतं तद्वत् महापापौघकारिणं न त्यजन्ति, न भिन्दन्ति, शिक्षां च न एव कुर्वते प्रत्युत अति-

विस्मिताः एनं अधिकमेव आद्रियन्ते--' त्याचप्रमाणें राजादि लोकरक्षक व त्याचे बंधु वगैरे या विद्वानाची—आत्मज्ञाची साम्यामध्यें स्थित असलेली ही बुद्धि जाणून तो सदा पापामध्यें आसक्त जरी असला किंवा अनेक महापापें करणारा असला तरी त्याला बहिष्कृत करीत नाहींत, त्याला शारीरदंड-ताडन वगैरे करीत नाहींत, फार काय पण कठोर शब्दांनींही त्याला शिक्षा करीत नाहींत. उलट अतिशय विस्मित होऊन ते त्याचा—समब्रह्मामध्यें स्थिर झालेल्या विद्वानाचा अधिकच आदर करितात. २३२, २३३.

न हि सर्वात्मविज्ञातुरन्यः कश्चन विद्यते ॥
नानिष्टं कुरुते स्वस्य स्वात्मा कस्यापि देहिनः ॥
राजादीनामयं स्वात्मा तेनास्मिन्नुचितं त्विदम् ॥ २३४ ॥

अर्थ—[ "देव व मनुष्यही त्या ब्रह्मवेत्त्याच्या नाशाला समर्थ होत नाहींत. कारण तो त्यांचा आत्माच होतो." ( बृहदा. भाष्यार्थ अ. १ पृ. २१५ पहा. ) या श्रुतीच्या अनुरोधानें त्याविषयींच उपपत्ति सांगतात—] ' सर्वात्मविज्ञातुः अन्यः कश्चन न हि विद्यते-' सर्वात्मवेत्त्याच्या अपेक्षेनें आत्मभिन्न असा मुळीं कोणताच पदार्थ नाहीं. ' कस्य अपि देहिनः स्वात्मा स्वस्य अनिष्टं न कुरुते-' कोणत्याही देहवानाचा —प्राण्याचा स्वात्मा स्वतःच्याच आत्म्याचें—स्वतःचें अनिष्ट करीत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. ' अयं राजादीनां स्वात्मा संपन्नः । तेन तु इदं स्वस्मिन् उचितम्-' हा विद्वान् राजादिकांचा स्वात्माच झालेला असतो. त्यामुळें स्वात्मभूत अशा विद्वानाला अपकार न करणें व त्याचा अत्यंत मान करणें हें उचितच आहे. २३४

एवं हिततमं ज्ञानं श्रुत्वा शक्रस्य धीमतः ॥ इंगितैरेव पप्रच्छ शक्रं सोऽपि प्रतर्दनः ॥ २३५ ॥ विस्मयाविष्टवदनः सम्यगुत्फुल्ललोचनः ॥ नोक्तवान्प्रतिवाक्यं तं स शक्रं साध्वसाधु वा ॥ २३६ ॥

अर्थ—( आतां दुसऱ्या कंडिकेचें व्याख्यान करण्यासाठीं पंचवीस

श्लोकांनीं भूमिका तयार करितात—) 'एवं धीमतः शक्रस्य मुखात् ज्ञानं हिततमं श्रुत्वा-' याप्रमाणें ज्ञानी इंद्राच्या तोंडून ज्ञान हिततम आहे, असें ऐकून 'सः अपि प्रतर्दनः इंगितैः एव शक्रं प्रपच्छ-' तो प्रतर्दन-ही इंगितांनींच—अभिप्रायसूचक चेष्टांनींच इंद्राला विचारता झाला २३५. 'विस्मयाविष्टवदनः सम्यगुत्फुल्ललोचनः सः तं शक्रं प्रति साधु असाधु वा वाक्यं नोक्तवान्-' ज्याचें मुख विस्मयाविष्ट—आश्चर्यचकित झालें आहे व ज्याचे नेत्र अगदीं उत्फुल्ल—झाले, विकसित—निमिषरहित झाले आहेत असा तो प्रतर्दन त्या इंद्राला मी कृतार्थ झालों, असें किंवा मला या तुझ्या भाषणांत विरोध भासतो, मला त्याविषयीं संशय आहे असें कोणतेंच वाक्य बोलला नाहीं. (तर त्यानें आपला कर्तव्याविषयींचा अनिश्चय मात्र इंगितांनीं व्यक्त केला.) २३६.

तं स्तब्धसदृशं दृष्ट्वा सर्वज्ञः स शचीपतिः ॥
इति तज्ज्ञः स्वमनसा व्यचिन्तयदिदं प्रभुः ॥ २३७ ॥

अर्थ—प्रतर्दन स्तब्धासारखा—जडासारखा—झाला आहे, वस्तुतः तो जड नाहीं, अत्यंत सुबुद्ध आहे, तथापि तो जड असल्याचा बहाणा करीत आहे, असें पाहून तो सर्वज्ञ, तज्ज्ञ—इंगितज्ञ, प्रभु, शचीपति आपल्या मनानें असें चिंतन करता झाला २३७.

प्रतर्दनः स्वमनसा चिन्तयत्येवमत्र हि ॥ इन्द्रेण स्वात्मविज्ञानमुक्तं हिततमं स्फुटम् ॥ २३८ ॥ तत्स्तुतिं कुर्वता स्वस्य पापास्पर्शश्च दर्शितः ॥ दृष्टान्ताय यथा मे स्याद्विश्वासोऽस्मिन्नलौकिके ॥ २३९ ॥ तथापि विषये मेऽस्य संदेहो वर्ततेऽधुना ॥ मां जानीहीति यत्प्रोक्तं मह्यमिन्द्रेण बोधनम् ॥ तत्रास्मच्छब्दबोधाभ्यामर्थः को विषयीकृतः ॥ २४० ॥ इन्द्रोऽयं देवतारूपः सहस्राक्षः पुरो मम ॥ वज्रपाणिः शचीनाथः सुरार्चितपदांबुजः ॥ २४१ ॥ किमयं वास्य देहांतरात्मान्यः सोऽपि कीदृशः ॥ अस्मच्छब्दस्य वक्ता वा ततोऽन्यो

वापि बोधनः ॥ २४२ ॥ इत्यादिचिन्ताकुलितमानसोऽयं प्रतर्दनः ॥ धीधनत्वेन मां नैव वक्ति किंचिन्नराधिपः ॥२४३॥ इंद्रो मदर्थं वृतवान्वरं हिततमं स्वयम् ॥ मयोक्तस्तेन मे नात्र वक्तव्यं विद्यते क्वचित् ॥ २४४ ॥ इति संचिन्त्य राजायं न पृच्छति न भाषते ॥ कृतार्थं इत्यसंपन्नविज्ञानत्वात्प्रतर्दनः ॥

अर्थ—'अयं प्रतर्दनः अत्र हि स्वमनसा एवं चिन्तयति-' हा प्रतर्दन या वेळीं आपल्या मनानें असें चिंतन करीत आहे—इंद्रानें स्वात्मविज्ञान हिततम आहे, असें स्पष्ट सांगितलें. २३८. त्या स्वात्मविज्ञानाची स्तुति करणाऱ्या त्यानें स्वतःला मोठमोठ्या पापांचाही स्पर्श झाला नाहीं, असें माझा—प्रतर्दनाचा या अलौकिक ज्ञानफलावर विश्वास बसेल अशा प्रकारानें दृष्टान्तासाठीं दाखविलें. २३९. तथापि म्ह० आत्मज्ञान हित-तम आहे असा जरी इंद्रानें निर्णय केला आहे तरी 'अस्य विषये मे अधुना संदेहो वर्तते-' ज्ञानाविषयीं मला आतां संदेह आहे. 'मां जानीहि इति इन्द्रेण मह्यं यत् बोधनं प्रोक्तं तत्र अस्मत्-शब्दबोधाभ्यां कः अर्थः विषयीकृतः-' 'मलाच जाण,' असें इंद्रानें मला जें ज्ञानजनक वाक्य म्हटलें—असें तो मला जें बोलला त्यांतील 'मां' या शब्दानें व त्याच्या अर्थानें कोणत्या पदार्थाला विषय केलें आहे? २४० ('मां' या शब्दानें इंद्र या देवतेचा देह घ्यावयाचा कीं त्याचा अभिमानी जीव घ्यावयाचा कीं त्याचा साक्षी घ्यावयाचा? हा त्याचा संशय इंद्रच व्यक्त करतो.) 'अयं देवतारूपः इंद्रः सहस्राक्षः वज्रपाणिः शचीनाथः सुरार्चितपदांबुजः मम पुरः स्थितः-' हा देवतारूप, सहस्रनयन, वज्र-पाणि, शचीपति, देवांकडून ज्याचें पादकमलद्वय पूजित आहे असा इंद्र माझ्या अग्रभागीं स्थित आहे २४१. 'मां' या शब्दाचा अर्थ हाच देवताविग्रह—इंद्राचा देह आहे, कीं त्याचें स्वरूप या देहाच्या आंत आहे? देहाच्या आंत देहाहून भिन्न असा 'मां' शब्दाचा अर्थ असला तरी 'सोऽपि कीदृशः-' तोही कशा प्रकारचा आहे? (वागादि इंद्रियविशिष्ट आहे कीं त्याहून निराळा केवल—निर्विशेष आहे?)

'मां' या शब्दाचा वक्ता—'मां' असें म्हणणारा हा त्याचा अर्थ आहे कीं त्या विशिष्टाहूनही निराळा 'बोधनः-' प्रकाशक, हा मां-शब्दाचा अर्थ आहे? २४२ 'अयं प्रतर्दनः इत्यादिचिन्ताकुलितमानसः-' हा प्रतर्दन इत्यादि चिन्तेनें—अशा संशयानें आकुलचित्त झाला आहे. पण हा राजा धीधन असल्यामुळें अ० बुद्धि हेंच याचें धन—धनाप्रमाणें रक्षणीय वस्तु असल्यामुळें तो मला त्याविषयीं कांहीं बोलत नाहीं २४३. (प्रतर्दनानें ज्या आशयानें मौन धरलें तो आशयच इंद्र व्यक्त करतो—) 'मयोक्तः इन्द्रः मदर्थे स्वयं हिततमं वरं वृतवान् तेन अत्र मे वक्तव्यं न विद्यते-' 'तूंच माझ्यासाठीं हिततम वर माग,' असें मजकडून बोलला गेलेला इंद्र मजकरितां आपणच हिततम वर वरता झाला आहे. त्यामुळें अ० मीं इंद्राला वरप्रदानासाठीं वश करून घेतलेलें असल्यामुळें या संदिग्ध विषयामध्येंही मला कांहीं विचारावयास नको. (तो स्वतःच मत्स्य रक्षणासाठीं माझा संशय दूर करील.) २४४. असा विचार करून हा राजा प्रतर्दन त्याविषयीं मला प्रश्न करीत नाहीं; व त्याचें ज्ञान निश्चयरूप संपत्तीस प्राप्त झालेलें नसल्यामुळें 'मी या उपदेशानें कृतार्थ झालों आहें' असेंही म्हणत नाहीं. २४५.

ततो मयैव वक्तव्यमपृष्टेनापि भूभुजे ॥ यावदस्य न संदेहो बोधे हिततमे भवेत् ॥ २४६ ॥ आनन्दात्मा मया नायमवाङ्मनसगोचरः ॥ वक्तुं शक्यो न चानेन ज्ञातुमप्यस्त्यलौकिकः ॥ २४७ ॥ ततो ज्ञानक्रियाशक्ती प्राणप्रज्ञे हि लौकिके ॥ आश्रित्याहं स्वमात्मानं कथयिष्याम्यलौकिकम् ॥ २४८ ॥ प्राणप्रज्ञे विहायैते न देहादीह तिष्ठति ॥ क्रियाशक्तिस्तथा प्राणो न तिष्ठति धियं विना ॥ २४९ ॥ स्थावरेषु यतो नैष दृश्यते बुद्धिवर्जनात् ॥ प्राणं विना तथा बुद्धिर्न दृष्टा हि घटादिषु ॥ २५० ॥ बुद्धिश्च जडरूपा हि प्रकाशं स्वात्मनः परम् ॥ अपेक्षते यथा स्तम्भः प्राणेन सदृशी ततः ॥ २५१ ॥

अर्थ—(याप्रमाणें प्रतर्दनाचा आशय व्यक्त करून इंद्र आपलें

कर्तव्य काय आहे, याचा विचार करतो--) 'ततः-' यास्तव--याच्या मौनाचें कारण मला कळलेलें असल्यामुळें 'अपृष्टेन अपि मया एव यावत् हिततमे बोधे अस्य संदेहः न भवेत् तावत् भूभुजे वक्तव्यं-' मला जरी यानें विचारलें नाहीं, तरी मींच जोंवर हिततम ज्ञानाविषयीं याला संदेह राहणार नाहीं, तोंवर--याला निश्चित बोध होईपर्यंत या राजाला सांगणें उचित आहे. (हा कृतार्थ होईपर्यंत याला बोध करणें हें माझें कर्तव्य आहे.) २४६ तथापि 'अवाङ्मनसगोचरः अयं आनन्दात्मा मया न वक्तुं शक्यः-' वाणी व मन यांचा विषय न होणारा हा--अपरोक्ष आनन्दात्मा मला साक्षात् सांगतां येणें शक्य नाहीं. तसाच तो 'अत्यलौकिकः-' अत्यंत अलौकिक असल्यामुळें 'अनेन ज्ञातुं अपि न शक्यः-' याच्याकडून जाणला जाणेंही शक्य नाहीं २४७. यास्तव (त्याचा बोध उपाधिद्वाराच केला पाहिजे. पण दूरच्या उपाधींची उपेक्षा करून) आनन्दात्म्याच्या अगदीं समीप असलेल्या ज्ञानशक्तिरूप प्रज्ञा व क्रियाशक्तिरूप प्राण या लौकिक उपाधींचा आश्रय करून 'अहं स्वं आत्मनं' मी याला अलौकिक स्वात्म्याचा बोध करतों. २४८. (प्राण व प्रज्ञा या उपाधींचाच उपन्यास करण्याचें कारण--) 'एते प्राणप्रज्ञे विहाय-' प्राण व प्रज्ञा या दोन उपाधींस सोडून 'देहादि न तिष्ठति-' देहेंद्रियसंघात राहत नाहीं, (त्या दोन्ही विद्यमान असल्या तर देहादि राहतो) 'तथा क्रियाशक्तिः प्राणः धियं विना न तिष्ठति-' तसाच क्रियाशक्तिरूप प्राण प्रज्ञेवांचून रहात नाहीं. २४९. (जेथें प्रज्ञेचा अभाव असतो तेथें प्राणाचाही अभाव असतो, याविषयीं दृष्टांत-) 'यतः स्थावरेषु बुद्धिवर्जनात् एषः न दृश्यते-' कारण स्थावरांमध्यें बुद्धि नसते, त्यामुळें तेथें प्राणही प्रत्यक्ष प्रतीत होत नाहीं. (लतादिकांची वाढ होते, वृक्षाचें क्षत भरून येतें, त्यावरून त्यांत प्राण असतो असें अनुमान होतें, म्हणून म्हणाल तर लता-वृक्षादिक आपल्या वाढीला अनुकूल देश वगैरेही पहात असतात, असेंही आढळतें, त्यावरून त्यांच्यामध्यें प्रज्ञा असते, असेंही अनुमान होतें. पण 'तथा प्राणं विना घटादिषु बुद्धिः न दृष्टा हि-' तशी प्राणाच्या अभावीं

घटादिकांमध्यें बुद्धि असलेली दिसत नाहीं, हें प्रसिद्ध आहे २५०. ( प्राण व प्रज्ञा ह्या उपाधि मुख्य आत्म्याच्या परिचयाचें कारण होतात, असें आतां दाखवितात—) 'यथा स्तम्भः तथा जडरूपा हि बुद्धिः स्वात्मनः परं प्रकाशं अपेक्षते-' जसा खांब तशी जडरूप बुद्धि स्वतः-च्या स्वरूपाहून दुसऱ्या प्रकाशाची अपेक्षा करते. ( खांब आपलें भान, स्थिति, इत्यादिकांच्या सिद्धीसाठीं दुसऱ्या दीपादिकांची अपेक्षा करतो, हें प्रसिद्ध आहे. ) 'ततः प्राणेन सदृशी-' त्यामुळें बु० तिला दुसऱ्या प्रकाशाची अपेक्षा असल्यामुळें ती प्राणासारखीच आहे. ( अर्थात् प्राण व प्रज्ञा हीं दोन्ही साक्षीचीं परिचायक—परिचय करून देणारीं आहेत) २५१.

अन्तर्वायुः प्रचलति प्रजानाति तथैव धीः ॥ प्राणः प्रज्ञेति वै तस्मादेतयोर्नाम देहिनाम् ॥ २५२ ॥ वस्तुतश्चलनं नैव जडानां दृश्यते क्वचित् ॥ रथादयो यथा नैव दृश्यन्ते स्वय-मेव हि ॥ २५३ ॥ अश्वादींश्चेतनान्हित्वा चलन्तः कर्हिचि-त्क्वचित ॥ प्रकर्षस्तत्र केन स्यान्मूलाभावात्तु हेतुतः ॥२५४॥ ज्ञप्तिश्च न जडे क्वापि दृश्यते हि घटादिके ॥ प्रकर्षश्च जडे ज्ञप्तेर्दूरापास्तः सदैव हि ॥ २५५ ॥

**अर्थ**—( आतां प्राण व प्रज्ञा या शब्दांचा मुख्य अर्थ व त्याचा प्रस्तुत स्थळीं बाध कसा होतो, तें चार श्लोकांनीं दाखवितात—) शरीरान्तर्गतवायु 'प्र-' आधिक्यानें 'चलति-' चालतो 'तथा एव धीः प्रजानाति-' तशीच बुद्धि जाणते. 'तस्मात् देहिनां वै एतयोः प्राणः प्रज्ञा इति नाम-' म्हणून आत्मज्ञानहीन असलेल्यांनाही त्यांचे प्राण व प्रज्ञा असें नांव प्रसिद्ध आहे. ( प्र-अनिति—प्रचलति, म्हणून प्राण व 'प्र-जानाति-' आधिक्यानें जाणते म्हणून प्रज्ञा )२५२. वस्तुतः जडानां चलनं क्वचित् न एव दृश्यते-' वस्तुतः जड पदार्थांचें चलन कोठेंच दिसत नाहीं. पण 'यथा रथादयः अश्वादीन् चेतनान् हित्वा स्वयं एव हि चलनाः कर्हिचित् क्वचित् न एव दृश्यन्ते-' जसे रथादिक अश्वादि

चेतनांवाचून--त्यांना सोडून स्वतःच चालत असल्याचें केव्हांही व कोठें-ही दिसत नाहींच. मग ‘ तत्र प्रकर्षः केन स्यात्-’ त्या जडाच्या चळनांत प्रकर्ष कोणत्या कारणानें असणार ? ( जड पदार्थांचें स्वतः नुस्तें चळनही जर संभवत नाहीं, तर प्रकृष्ट चलन कसें उत्पन्न होईल ? तें अगदींच शक्य नाहीं. ) मूळाभावरूप हेतुमुळें. ( मूळ धन--भांडवल --मुद्दल जर असेल तर त्याचा वृद्धिरूप प्रकर्ष संभवतो. व्याजानें वाढ होते, त्यावांचून नाहीं. त्याचप्रमाणें प्राणामध्यें सामान्य चळनाचाही अभाव असल्यामुळें प्रकर्ष शक्यच नाहीं. ) २५३--२५४. त्याच न्यायानें ‘ घटादिके जडे ज्ञप्तिः च न दृश्यते हि-’ घटादिक जड पदार्थांमध्यें ज्ञप्ति--प्रकाश दिसत नाहीं, हें सुप्रसिद्ध आहे. ‘ जडे ज्ञप्तेः प्रकर्षः तु सदैव दूरापास्तः-’ त्यामुळें जडांत प्रज्ञेचा प्रकर्ष तर सर्वदाच असंभाव्य आहे. २५५.

तस्माद्यत्संनिधावस्य जडस्येदं विजायते ॥ प्रकर्षेण तथा वायोः स प्राणश्चेतनो भवेत् ॥ २५६ ॥ प्रकाशयति यः सर्वं स ज्ञ-प्तिश्चेतनः स्मृतः ॥ आत्मानं च प्रकर्षेण जडजातप्रकाशनात् ॥ २५७ ॥ स्वसजातिविजात्युत्थभेदाभावेन हेतुना ॥ स्वप्र-काशेन चात्मानमात्मा जानाति नापरः ॥ २५८ ॥ प्राणप्र-ज्ञाभिधेयोऽहमानन्दात्मा न चापरः ॥ तत एवेति संचिन्त्य शक्रो राजानमुक्तवान् ॥ २५९ ॥

**अर्थ**--( त्यामुळें प्राण हा शब्द लक्षणेनें आत्मामध्येंच पर्यवसित होतो, असें सांगतात--) ‘ तस्मात् यस्य--चेतनस्य सन्निधौ अस्य--प्रत्यक्षाद्युपस्थापितस्य जडस्य--देहेंद्रियादिरूपस्य तथा वायोः इदं--चळनं प्रकर्षेण विजायते स चेतनः एव प्राणः भवेत्-’ यास्तव ज्या चेतनाच्या सांनिध्यानें प्रत्यक्षादि प्रमाणाचा विषय होणाऱ्या या जड देहेंद्रियांचें, तसेंच वायूचें हें चळन प्रकर्षानें--आधिक्यानें होतें तो चेतनच प्राण आहे २५६. ( तशीच प्रज्ञा लक्षणेनें आत्म्याचा बोध करते--) ‘ यः सर्वं प्रकाशयति सः चेतनः ज्ञप्तिः स्मृतः-’ जो सर्वांळा प्रकाशित करतो

तो चेतन हीच ज्ञप्ति–'प्रज्ञा' या पदांतील 'ज्ञा' या धातूचा अर्थ आहे. 'आत्मानं च प्रकाशयति अतः प्रकर्षेण ज्ञा-' आपल्या स्वरूपालाच --आत्म्यालाच प्रकाशित करते, म्हणून प्रकर्षानें--आधिक्यानें ज्ञा–प्रज्ञा. सर्व जड वर्गाला प्रकाशित केल्यामुळें प्रज्ञा सर्व प्रकाशिका आहे २५७. (हा 'सर्वं प्रकाशयति-' याविषयीं हेतु आहे. 'आत्मानं च' या अंशाचेंच उपपादन–) आत्म्यामध्यें स्वगत, सजातीय व विजातीय भेदांचा अभाव आहे. त्यामुळें त्याचा दुसरा प्रकाश्य संभवतच नाहीं. अर्थात् आत्मा स्वप्रकाशानें जें प्रकाशित करतो तें स्वात्मस्वरूपच आहे. अशा प्रकारचा दुसरा नाहीं, असा भावार्थ. २५८. 'ततः-' त्यामुळें म्ह० वर सांगितल्याप्रमाणें प्राण व प्रज्ञा यांना मुख्य चलन व ज्ञान संभवत नसल्यामुळें प्राण व प्रज्ञा यांचा अभिधेय–प्रतिपाद्य विषय–त्यांचा अर्थ 'अहं आनन्दात्मा एव-' मी आनंदात्माच आहे. दुसरा कोणी नाहीं. 'इति संचिन्त्य-' असा आशय मनांत धरून 'शक्रः-' इंद्र राजाला असें म्हणाला. २५९.

श्रुतिः—"स होवाच--प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा तं मामायुरमृतमित्युपास्व-" (याप्रमाणें ब्रह्मज्ञानाची स्तुति करून आत्म्याचें म्ह० ब्रह्माचें स्वरूप सांगण्याची इच्छा करणारा) 'सः-' तो इंद्र 'ह-' खरोखर 'उवाच—' म्हणाला. 'प्राणः--' प्राणशब्दवाच्य--प्राणसंज्ञक अथवा प्राणोपाधिक--प्राण ज्याची उपाधि आहे तो 'अस्मि-' मी आहें. 'प्रज्ञात्मा-' बुद्धिवृत्तींत प्रतिबिंबित झालेला प्रज्ञान-एकस्वभाव 'तं मां-' त्या प्राणप्रज्ञात्मस्वरूप अशा मला--आनंदात्म्या इंद्राला 'आयुः-' सर्व प्राण्यांच्या जीवनाचें कारण--प्राण व अपान यांहून व्यतिरिक्त--प्राणापानांच्या आश्रयभूत 'अमृतं-' मरणशून्य–षड्भावविकारशून्य, असा भावार्थ 'इति-' असें म्ह० 'प्राण प्रज्ञात्मा इंद्र आयु अमृत मी आहें' अशा रूपानें 'उपास्व-' आत्मसाक्षात्कार होईतों उपासन कर म्ह० विजातीयप्रत्ययशून्य सजातीयप्रत्ययप्रवाह सुरू ठेव.]

प्राणो भवाम्यहं राजन् क्रियायाः कारणं परम् ॥ प्रज्ञावपुः स्वप्रकाशः सर्वभेदविवर्जितः ॥ २६० ॥ तं मां ज्ञानक्रियाहेतुं

भेदशून्यं स्वयंप्रभम् ॥ आयुष्करं स्वयं मृत्युशून्यं त्वदुपदेश-
कम् ॥ २६१ ॥ प्रत्ययानपरान्हित्वा विचार्योक्तं मया मुहुः ॥
मदेकविषयैर्बोधैर्घटवद्विद्धि मानसे ॥ २६२ ॥

अर्थ—हे राजन्, 'यतः अहं क्रियायाः परं कारणं अतः प्राणः भवामि-' ज्या अर्थी मी क्रियेचें उत्कृष्ट कारण आहें त्या अर्थी मी प्राण आहें. मी 'प्रज्ञावपुः-' प्रज्ञारूपही आहें. कारण मी स्वप्रकाश व सर्व भेदवर्जित आहें २६०. 'तं मां०-' त्या मला--सर्व ज्ञान व सर्व क्रिया यांच्या कारणाला--केवळ स्वसांनिध्यानें ज्ञान व क्रिया यांच्या साधकास, भेदशून्य, स्वयंप्रकाश 'आयुः-' आयुष्कर --जीवनाचें कारण, स्वयं मृत्युशून्य अशा मला म्ह० तुझ्या उपदेशकाला २६१ 'मया उक्तं मुहुः विचार्य अपरान् प्रत्ययान् हित्वा मदेकविषयैः बोधैः मानसे घटवत् विद्धि-' मी प्रज्ञा-प्राण-आयुः-अमृतपदांनीं जें सांगितलें, ज्याचें प्रतिपादन केलें त्या मद्रूपाचा वारंवार विचार करून दुसऱ्या विजातीय विषयांविषयींच्या प्रत्ययांस सोडून केवळ माझ्या विषयींच्या मनांतील बोधांनीं घटाप्रमाणें मला अपरोक्ष जाण. म्ह० मत्परायण हो, असा भावार्थ. २६२.

[श्रुतिः—"आयुः प्राणः प्राणो वा आयुः। प्राण एवामृतम्। याव-द्ध्यस्मिञ्शरीरे प्राणो वसति तावदायुः। प्राणेन ह्येवामुष्मिँल्लोकेऽमृतत्व-माप्नोति। प्रज्ञया सत्यं संकल्पम्। स यो मामायुरमृतमित्युपास्ते सर्व-मायुरस्मिँल्लोक एति। आप्नोत्यमृतत्वमक्षितिं स्वर्गे लोके।" 'आयुः-' वर सांगितलेलें प्राण्यांचें जें जीवनकारण तें प्राण आहे. व 'प्राणच आयु' आहे, तसाच प्राणच अमृत आहे—षड्भावविकाररहित आहे. (प्राणाच्या आयुष्ट्वाचें व अमृतत्वाचें उपपादन—) 'यावत्-' जोंवर 'हि-' ज्याअर्थी 'अस्मिन् शरीरे-' या प्रत्यक्ष शरीरांत 'प्राणः वसति' प्राण राहतो 'तावत्-' तोंवरच आयु—प्राण्याचें आयुष्य असतें. (तसेंच) 'प्राणेन हेव-' ज्याअर्थी प्राणानेंच (म्ह० शरीरानेंही नव्हे) 'अमुष्मिन् लोके-' स्वर्गादि परलोकीं 'अमृतत्वं-' सुखास 'आप्नोति-' प्राप्त होतो, 'प्रज्ञया-' ज्ञानशक्तिरूपानें 'सत्यं-' सत्य वचनास किंवा निष्प्रपंच ब्रह्मास

व 'संकल्पं.' हें मला असावें, अशा प्रकारच्या मनाच्या प्रचारास प्राप्त होतो. (याप्रमाणें प्रज्ञादिकांचा उपयोग सांगून आयुष्य व अमृतत्व यांच्या उपासनेचें फल श्रुति सांगते-) 'यः-' जो कोणीही 'मां-' मज इंद्राचें प्राणात्मरूपानें-प्रत्यग्भूत अशा माझें आयु व अमृत असें उपासन करतो 'सः-' तो उपासक 'सर्वं आयु०:-' या लोकांतील सर्व म्ह० शतसंवत्सरात्मक आयुष्यास प्राप्त होतो; आणि 'स्वर्गे लोके-' परलोकीं 'अक्षितिं अमृतं आप्नोति-' क्षयरहित अमृतत्वास प्राप्त होतो]

आयुस्तथामृतं यत्ते द्वयमुक्तं विशेषणम् ॥ न तत्प्राणाद्विभिन्नं त्वं जानीथा दण्डवन्नरात् ॥ २६३ ॥ यथाकाशो नभः प्रोक्तं नभोऽप्याकाशमेव हि ॥ तथायुरमृतं प्राणः प्राण आयुरनश्वरम् ॥ २६४ ॥ न चात्र व्यर्थता शंक्या पुनरुक्तत्वहेतुतः ॥ यतो जीवति लोकेऽस्मिन्प्राणेन प्राणभृज्जनः ॥ २६५ ॥ तथा शरीरसंपाते स्वर्गमोक्षामृतं व्रजेत् ॥ ततोऽमृतायुःशब्दाभ्यां प्राण आत्मा मयेरितः ॥ २६६ ॥ प्रज्ञाविशेषणं चैव प्राणभेद-विवर्जिते ॥ यतोऽहं प्रज्ञया प्राप्यो वेद्म्येतत्सदसद्वपुः ॥ २६७ ॥ उपास्तेऽपि च मां यो हि प्राणमायुः स जीवति ॥ शतसंव-त्सरं राजन्नमृतं च तथैव हि ॥ २६८ ॥ य उपास्ते स गच्छे-द्धि स्वर्गलोकमविच्युतम् ॥ उभयोपासनात्तद्वत्फलद्वयमदो भवेत् ॥ २६९ ॥ किं पुनर्निर्विशेषं यत्सर्वाध्यासविवर्जितम् ॥ विजानाति प्रयात्यत्र स आयुरमृतं पुमान् ॥ २७० ॥

**अर्थ**—'ते आयुः तथा अमृतं इति यत् द्वयं विशेषणं उक्तं तत् त्वं नरात् दंडवत् प्राणात् विभिन्नं न जानीथाः-' मीं तुला 'आयुः' व 'अमृतं' असें जें प्राणाचें विशेषणद्वय [दोन विशेषणें] सांगितलें तें तूं पुरुषाहून त्याच्या हातांतील काठी जशी अगदीं भिन्न असते तसें प्राणाहून अगदीं भिन्न आहे, असें समजूं नको. (तर अभिन्नच आहे, असें समज) २६३. 'यथा आकाशः नभः प्रोक्तं-' ज्याप्रमाणें आकाशाला 'नभ' असेंही म्हटलें जातें व नभालाही 'आकाश' म्हणतात, त्याप्रमाणें आयुः,

अमृत व प्राण आणि प्राण—आयु—अमृत हे शब्द परस्पर पर्याय आहेत. त्यामुळें त्यांचा अभेद आहे. २६४. 'अत्र पुनरुक्तत्वहेतुतः व्यर्थता न शंक्या-' पण त्यांना पर्यायशब्द मानल्यास त्यावर पुनरुक्तता हा दोष येत असल्यामुळें 'प्राण' असें म्हटल्यावर पुनः 'आयुः' व 'अमृत' असें म्हणणें व्यर्थ आहे, अशी व्यर्थतेची शंका घेऊं नये. (कारण ते पर्यायशब्दही अधिक अर्थाचा लाभ होण्यासाठीं योजलेले आहेत. त्यामुळें त्यांवर पुनरुक्ति हा दोष येत नाहीं.) 'यतः-' कारण 'प्राणभृत् जनः-' प्राणधारण करणारा प्रत्येक प्राणी 'अस्मिन् लोके-' या लोकीं 'प्राणेन-' शरीरांत विद्यमान असलेल्या प्राणानें जिवंत राहतो. २६५. त्याचप्रमाणें शरीराचा पात झाल्यावर—मेल्यावर कर्म, उपासना व ज्ञान या साधनानुष्ठानानुसार स्वर्गरूप अथवा मोक्षरूप अमृतास—पारलौकिक फळास तो प्राणानें जातो—प्राप्त होतो. 'ततः-' त्यामुळें—अशा प्रकारचा विशेष अर्थ ते शब्द सांगत असल्यामुळें अमृत व आयुः या दोन शब्दांनीं 'मया प्राणः आत्मा ईरितः-' मीं प्राण—आत्मा सांगितला आहे २६६. 'प्रज्ञा' हें विशेषण प्राणभेदरहित अशा मजमध्येंच साक्षात् अन्वित होतें. [म्ह० आयु व अमृत हीं प्राणाशीं अभेदानें अन्वित होतात व प्राण साक्षात् मजशीं अन्वित होतो. तशीच प्रज्ञा साक्षात् मजशीं अन्वित होते. आयु व अमृत यांप्रमाणें परंपरेनें नव्हे. अर्थात् क्रियाशक्ति—प्राण, ह्या उपाधीचा मी अभेदानें जसा अंगीकार केला आहे तसा प्रज्ञेचा म्ह० विज्ञानशक्तीचाही मी अभेदानें अंगीकार केला आहे.] 'यतः-' कारण मी प्रज्ञेनेंही प्राप्त होण्यासारखा आहें. (तो कसा?) मी हें व्यावहारिक सत्य शरीर व असत्—संकल्पमात्र शरीर प्रज्ञेनेंच जाणतों. (त्यामुळें प्रज्ञाही करणरूपानें मला उपलक्षित करते.) २६७ (प्राणोपाधीचें आयूरूपानें व अमृतरूपानें केलेल्या उपासनेचें फळ—) 'यः मां प्राणं आयुः इति रूपेण उपास्ते सः शतसंवत्सरं जीवति-' हे राजन्, जो मज प्राणाला 'आयुः' अशा रूपानें उपासितो—आयुर्गुणविशिष्ट अशा मज प्राणाची उपासना करतो तो शंभर वर्षें जिवंत राहतो. 'तथा एव हि यः अमृतं इति रूपेण प्राणं उपास्ते सः अविच्युतं स्वर्गलोकं गच्छेत्-' त्याचप्रमाणें जो अमृत अशा रूपानें प्राणाची उपासना करतो

तो अक्षय स्वर्गलोकास जातो. ‘ तद्वत्- ’ त्याचप्रमाणें ‘ उभयोपासनात्- ’ आयु व अमृत या दोन्ही रूपानें जो प्राणाची उपासना करतो त्याला ‘ अदः फलद्वयं- ’ हें दोन्ही प्रकारचें फळ—ऐहिक शतसंवत्सर आयु व पारलौकिक अक्षय स्वर्ग प्राप्त होईल २६८-६९. ( प्राणविशिष्ट आशाही माझें वर सांगितल्याप्रमाणें उपासन केल्यास जर असें फळ मिळतें तर ) ‘ यत् सर्वाध्यासविवर्जितं निर्विशेषं मां विजानाति सः पुमान् अत्र आयुरमृतं प्रयाति इति किं पुनः- ’ जें सर्व अध्यासशून्य म्ह० स्वाभाविक निर्विशेष मद्रूप त्याला जो साक्षात् जाणतो तो पुरुष शुद्ध विज्ञानामुळें आयु व अमृत यांस प्राप्त होतो, हें काय सांगावें? २७०

[ श्रुतिः—“ तद्वैक आहुरेकभूयं वै प्राणा गच्छन्तीति । न हि कश्चन शक्नुयात्सकृद्वाचा नाम प्रज्ञापयितुं चक्षुषा रूपं श्रोत्रेण शब्दं मनसा ध्यातुमित्येकभूयं वै प्राणाः । एकैकमेतानि सर्वाण्येव प्रज्ञापयन्ति । वाचं वदन्तीं सर्वे प्राणा अनुवदन्ति । चक्षुः पश्यत्सर्वे प्राणा अनुपश्यन्ति । श्रोत्रं शृण्वत् सर्वे प्राणा अनु शृण्वन्ति मनो ध्यायत्सर्वे प्राणा अनुध्यायन्ति प्राणं प्राणन्तं सर्वे प्राणा अनुप्राणन्ति ॥ ” ( इंद्रानें सांगितलेला हा प्राणशब्द ऐकून प्राण व इंद्रियें यांच्या एकत्वाविषयीं प्रतर्दनानें पूर्वीं जें ऐकलें होतें, त्याचें त्याला स्मरण झालें व त्यामुळें तो इंद्रास म्हणाला— ‘ तत्- ’ प्राणांचें अनेकत्व असतांना ‘ ह- ’ खरोखर ‘ एके- ’ कित्येक विद्वान् ‘ आहुः- ’ सांगतात--( काय? ) ‘ एकभूयं वै- ’ एकभावासच—एकत्वासच ‘ प्राणाः- ’ इंद्रियें ‘ गच्छन्ति- ’ प्राप्त होतात, ‘ इति- ’ असें सांगतात. ( त्याविषयीं उपपत्ति- ) ‘ हि- ’ कारण ‘ कश्चन- ’ कोणीहि ‘ सकृत्- ’ एकाच वेळीं ‘ वाचा०- ’ वाणीनें नाम बोलण्यास, चक्षूनें रूप ‘ प्रज्ञापयितुं- ’ जाणण्यास ‘ श्रोत्रेण०- ’ श्रोत्रेंद्रियानें शब्द ऐकण्यास व ‘ मनानें ध्यान करण्यास ’ ‘ न शक्नुयात्- ’ समर्थ होत नाहीं. ‘ इति- ’ याप्रकारें ‘ एकभूयं वै प्राणाः- ’ प्राण—इंद्रियें एकभावासच प्राप्त होतात. ‘ सर्वाणि एव एतानि- ’ हीं सर्वच वागादि इंद्रियें ‘एकैकं-’ रूप-रसादि एकेकासच ‘ प्रज्ञापयन्ति- ’ आधिक्यानें निष्पन्न करितात. ( तीं कशीं? ) ‘ वाचं वदन्तीं- ’ वाग्-इंद्रिय बोलूं लागलें असतां —आपला व्यापार करूं लागलें असतां ‘ सर्वे प्राणाः- ’ सर्व इंद्रियें

'अनुवदन्ति-' ( राजा बोलूं लागला असतां सर्व सभासद जसे त्याला अनुमोदन देतात किंवा आपला व्यापार सोडून त्याला अनुसरतात त्याप्रमाणें सर्व इंद्रियें ) आपापला व्यापार सोडून तिला (वाणीला) अनुसरतात किंवा जर कांहीं व्यापार केलाच तर तो तिच्या व्यापाराला अनुकूल असाच करितात. त्याच न्यायानें 'चक्षुः पश्यत्०-' चक्षु पाहूं लागला असतां इतर इंद्रियें त्याला अनुसरतात; श्रोत्र ऐकूं लागलें असतां इतर सर्व प्राण त्याला अनुसरतात; मन ध्यान करूं लागलें असतां सर्व इंद्रियें त्याच्या मागोमाग ध्यान करूं लागतात व मुख्य प्राण आपला प्राणन हा व्यापार करूं लागला असतां सर्व इंद्रियें त्याला अनुसरतात. 'इति-' हा शब्द प्रतर्दनाचा प्रश्न संपला हें सुचवितो. यावरून अष्टावधानी-शतावधानी इत्यादिकांच्या एकाच वेळीं अनेक क्रिया होत असल्याचा जो भास होतो तो मिथ्या आहे. कारण एकाद्या शतपत्र कमळाला सुईच्या अग्रानें वेध केला असतां तो एकाच क्षणीं झाला, हें जसें वाटतें पण वस्तुतः प्रत्येक पाकळीच्या वेधाचा काळ फारच सूक्ष्मप्रमाणानें भिन्न भिन्न असतो त्याप्रमाणेंच शतावधान्याच्या ज्ञानांचाही काळ अगदीं सूक्ष्मप्रमाणांत भिन्न असतो असें जाणावें. ]

एवं शक्रेण कथिते प्राणरूपे निजे सति ॥ पप्रच्छ कारणं तस्मिन्निंगितज्ञः प्रतर्दनः ॥ २७१ ॥ भगवन्संशयः कश्चिन्मम चेतसि वर्तते ॥ मुनीनां वचनं स्मृत्वा वाक्यं श्रुत्वा तवापि हि ॥ २७२ ॥ केचिद्धि मुनयः शक्र सभायामागता मम ॥ कदाचिदूचिरे वाक्यं प्रसंगाद्वेदवित्तमाः ॥ २७३ ॥ प्राणशब्दो हि सर्वेषामिन्द्रियाणां स्मृतः समः ॥ सप्राणानां न चैतेषां नियतास्ति प्रधानता ॥ २७४ ॥ एकतां प्रतिपद्यन्ते भिन्ना नामादिकार्यतः ॥ ग्रामे महाजना यद्वत्कार्यार्थं त्वेकतामियुः ॥ २७५ ॥ वदन्त्यां नाम वाच्येते चक्षुराद्या न कुर्वते ॥ व्यापारं हि तथा नेत्रे पश्यत्यन्ये निजं च न ॥ २७६ ॥ एवं प्राणेषु सर्वेषु वरस्येवास्ति नैव हि ॥ गुणप्रधानभावोऽयं नियतोऽतः समा इमे ॥ २७७ ॥ सर्वे समा अनंताश्च श्रुत्यापि

कथिता यतः ॥ तर्कतोऽपि न चैतेषां वैषम्यं विद्यते क्वचित् ॥

अर्थ—'एवं-' याप्रमाणें शक्रानें—इंद्रानें 'निजे प्राणरूपे कथिते सति-' आपलें प्राणरूप सांगितलें असतां—'प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा०'(पृ. ७१) या वाक्यानें प्राणरूपानें आपलें वर्णन केलें असतां 'इंगितज्ञः प्रतर्दनः तस्मिन् कारणं पप्रच्छ-' अभिप्रायसूचक क्रिया कशा कराव्या हें जाणणारा प्रतर्दन आपलें प्राणरूपत्व सांगण्याचें कारण इंद्राला विचारता झाला. २७१ भगवन् 'मुनीनां वचनं स्मृत्वा तव वाक्यं अपि श्रुत्वा मम चेतसि कश्चित् संशयः वर्तते-' मुनींचें वचन आठवून व तुझें वाक्यही ऐकून माझ्या मनांत कांहीं संशय आला आहे २७२. 'हे शक्रा' 'कदाचित् मम सभायां आगताः केचित् वेदवित्तमाः मुनयः प्रसंगात् वाक्यं ऊचिरे-' एकदा माझ्या सभेंत आलेले कांहीं अतिशय वेदवेत्ते मुनी शास्त्रसंबंधी कथा चालल्या असतां त्या प्रसंगानें असें वाक्य बोलले २७३. प्राणशब्द मुख्य प्राणासह सर्व इंद्रियांचा एकसारखाच वाचक आहे. (तो त्यांतील एकाद्याचाच वाचक नाहीं. कारण प्र+अन प्रधानभावानें—प्राधान्यानें अनिति—आपला व्यापार करणें हा योग इंद्रियांमध्यें समान आहे.) त्यांना नियत प्राधान्य नाहीं. म्ह० त्यांतील एकाद्यालाच निश्चित प्राधान्य नाहीं २७४. 'यद्वत् ग्रामे महाजनाः कार्यार्थं एकतां इयुः तद्वत् भिन्नाः वागादयः नामादिकार्यतः एकतां प्रतिपद्यन्ते-' ज्याप्रमाणें एकाद्या गावांतील सर्व महाजन एकाच्या विवाहादि कार्यासाठीं एकत्र जमतात—एकरूप होतात त्याप्रमाणें वागादि इंद्रियें भाषण करणें, पाहणें, ऐकणें इत्यादि कार्यरूपानें जरी भिन्न आहेत तरी एकतेस प्राप्त होतात २७५. (येथें एक इंद्रिय आपला व्यापार करूं लागलें असतां दुसऱ्या इंद्रियांनीं आपापले व्यापार न करणें हीच एकता आहे, असें दाखवितात—) 'वाचि नाम वदन्त्यां एते चक्षुराद्याः व्यापारं न कुर्वते हि-' वाक्-इंद्रिय नाम—शब्द बोलूं लागलें असतां हे चक्षुरादिक आपापला व्यापार करीत नाहींत. त्याचप्रमाणें नेत्र पाहूं लागला असतां इतर इंद्रियें आपापला व्यापार करीत नाहींत. २७६ जसें वराला त्याच्या विवाहांत प्राधान्य असतें पण इतराच्या विवाहांत तें नसतें त्याप्रमाणें सर्व इंद्रियांमध्यें 'अयं गुणप्रधानभावः नैव हि नियतः

अस्ति-' हा गुणप्रधानभाव नियत नसतोच. 'अतः-' यास्तव 'इमे समाः-'हे सर्व सम आहेत २७७. (या साम्याविषयीं 'एते सर्वे एव समा सर्वेऽनन्ताः' ही बृहदारण्यक श्रुति अनुकूल आहे, असें सांगतात–) 'यतः सर्वे समाः च अनन्ताः इति श्रुत्या अपि कथिताः-' कारण हे सर्व प्राण सम आहेत व अनन्त आहेत, असें श्रुतीनेंही सांगितलें आहे. (केवळ श्रुतीनेंच सर्व प्राणांचें साम्य सांगितलें आहे, असें नाहीं तर तर्कसहकृत अनुभवानेंही तें सिद्ध होतें, असें सांगतात–) 'तर्कानेंही यांचें वैषम्य कोठेंही विद्यमान नाहीं.' २७८.

वाचा वदन्यतः कश्चिच्चक्षुषा नैव पश्यति ॥ तथा नेत्रेण संपश्यन्नैव वक्ति कथंचन ॥ २७९ ॥ एवं प्राणेषु सर्वेषु युगपन्नास्ति हि क्रिया ॥ किं त्वेकस्मिन्नुपरते व्यापारं कुरुते परः ॥

अर्थ—'यतः कश्चित् वाचा वदन् चक्षुषा नैव पश्यति-' (तर्कसहकृत अनुभवच व्यक्त करितात– ) कारण कोणी एकादा वागिंद्रियानें बोलणारा चक्षूनें पाहत नाहीच. तसाच नेत्रानें पाहणारा 'कथंचन-' कोणत्याही प्रकारें बोलत नाहीं. (याप्रमाणें सर्व प्राणांना क्रमानें प्राधान्य आहे, एकाच वेळीं सर्वांना प्राधान्य नाहीं. तसें जर नसतें तर वाक्-चा व्यापार चालला असतांना गुणभावास प्राप्त झालेल्या नेत्रादिकांस प्राधान्य केंव्हांच संभवलें नसतें, त्यामुळें त्यांचें प्राधान्य नियत नाहीं, असा त्या विषयीं तर्क करितां येतो. ) २७९. 'एवं-' याप्रमाणें सर्व प्राणांमध्यें एकाच वेळीं क्रिया होत नाहीं; तर एक इंद्रिय आपला व्यापार करून थांबलें असतां दुसरें आपला व्यापार सुरू करतें. २८०

वदन्नेत्रेण पश्यामि श्रोत्रेण च शृणोम्यहम् ॥ जिघ्रामि घ्राणतस्तद्वत् स्पर्शनेन स्पृशामि च ॥ २८१ ॥ रसनाद्रसयाम्येव पाणिभ्यामाददे तथा ॥ पद्भ्यां गच्छामि शिश्नेन तद्वदानन्दयाम्यहम् ॥ २८२ ॥ विसृजे पायुना तद्वत्प्राणेन प्राणिमीह च ॥ अहंकारेण चैवाहंकरोमि मनसा तथा ॥ २८३ ॥ संकल्पयामि चित्तेन सामान्येनैव वेद्म्यहम् ॥ सुखदुःखे धिया तद्वद्विशेषेणापि देहके ॥ २८४ ॥ एककालमिमे सर्वे व्यापाराः करणेषु हि ॥

अर्थ—('अहो पण सर्व इंद्रियांचे व्यापार एकाच वेळीं होतात, असें अनुभवास येतें,' अशी शंका—) 'वदन् सन् नेत्रेण पश्यामि-' मी भाषण करीत असतांना नेत्रानें पाहतों, श्रोत्रानें ऐकतों, घ्राणानें वास घेतों, त्याचप्रमाणें त्वगिंद्रियानें स्पर्श करतों २८१. रसनेंद्रियानें रस चाखतों, दोन्ही हातांनीं वस्तु उचलतों, पायांनीं चालतों, शिश्नानें आनंदाचा अनुभव घेतों २८२. पायूनें विष्ठाविसर्ग करतों, त्याचप्रमाणें मी येथें प्राणानें श्वासादि क्रिया करतों; अहंकारानें 'अहं' असा अभिमान करतों, तसाच मनानें २८३ मी संकल्प करतों, सामान्यरूप चित्तानें मी जाणतों. 'तद्वत् धिया देहके सुखदुःखे विशेषेण अपि जानामि-' त्याचप्रमाणें बुद्धीनें शरीरांतील सुखदुःखांना मी सामान्यरूपानें व विशेषरूपानेंही जाणतों २८४. 'इमे सर्वे व्यापाराः करणेषु एककालं हि अनुभूयन्ते-' हे सर्व व्यापार इंद्रियांमध्यें एकाच वेळीं होत असल्याचा अनुभव येतो. (तेव्हां त्या सर्वांना क्रमानें प्राधान्य आहे व त्यामुळें त्यांना साम्य आहे, असें कसें सांगितलें जात आहे?)

एककालाभिमानोऽयं तेषु कालाप्रतीतितः ॥ २८५ ॥ यथा-पद्मपलाशानामाधाराधेयभावतः ॥ स्थितानामप्यनन्तानां सूक्ष्मसूच्यभिवेधने ॥ २८६ ॥ दले दले प्रभिन्नोऽयं कालो नैव प्रतीयते ॥ तथैव व्यापृतौ कालः प्राणानां नैककालता ॥ २८७ ॥ एवं प्राणेषु सर्वेषु समेष्वसमता कुतः ॥ एकस्मिन्नेव यत्तस्मिन्नात्मबुद्धिस्त्वयेरिता ॥ २८८ ॥

अर्थ—(वरील शंकेचें समाधान—)'कालाप्रतीतितः तेषु अयं एककालाभिमानः-' वरील क्रिया अतिशय शीघ्रतेनें होत असल्यामुळें त्यांच्या पृथक् कालाची प्रतीति येत नाहीं, त्यामुळें त्या क्रियांमध्यें हा एक कालाविषयींचा अभिमान असतो. पण तो भ्रम आहे. २८५ (कालाची अप्रतीतिच दृष्टान्तानें विशद करितात—) 'यथा आधाराधेयभावतः स्थितानां अनंतानां अपि पद्मपलाशानां सूक्ष्मसूच्यभिवेधने दले दले प्रभिन्नः अयं कालः नैव प्रतीयते तथैव प्राणानां व्यापृतौ कालः न लक्ष्यते तस्मात् करणव्यापाराणां एककालता न-' ज्याप्रमाणें आधारा-

धेयभावानें ह्म० एकावर एक अशा असलेल्या कमळाच्या अनेक पाकळ्यांना बारीक सुईच्या अग्रानें वेध केला असतां त्यांतील प्रत्येक दळाच्या वेधाचा काल अगदीं भिन्न असला तरी त्यांतील अंतर अगदीं अल्प असल्यामुळें तो भिन्न काल प्रतीत होत नाहीं त्याप्रमाणेंच इंद्रियांच्या पृथक् व्यापाराचा काल प्रतीत होत नाहीं. ( तथापि त्यांचा काल एक नाहीं. ) तस्मात् इंद्रियव्यापारांना एककालता नाहीं. २८६-८७. (प्रतर्दन आपल्या पूर्वपक्षाचें निगमन करतो—) याप्रमाणें सर्व प्राण सम असतांना त्यांतील एकालाच प्राधान्य आहे, असें म्हणणें ही असमता कोणत्या कारणानें ? 'यत् तस्मिन् एकस्मिन् एव त्वया आत्मबुद्धिः ईरिता-' कारण त्यांतील एकाच्या ठिकाणींच तूं आत्मबुद्धि सांगितली आहेस. २८८.

[ श्रुतिः—"एवमु हैतदिति हेन्द्र उवाच । अस्ति त्वेव प्राणानां निःश्रेयसमिति" ॥ २ ॥ (प्रतर्दनाच्या वरील प्रश्नाचा अंगीकार करूनच इंद्र उत्तर सांगतो—) 'एवं उ-' प्रतर्दना, असेंच आहे. सर्व प्राण एकाच वेळीं आपापले व्यापार करीत नाहींत. 'ह-' ही गोष्ट सर्व लोकांच्या अनुभवानेंच सिद्ध आहे. 'एतत्-' एकाच वेळीं सर्व इंद्रियांनीं आपापला व्यापार न करणें हें ( असेंच आहे, असा 'एवं उ' याच्याशीं संबंध. ) 'इति ह-' असें खरोखर 'इंद्र उवाच-' इंद्र बोलला. (मग असें जर आहे ह्म० सर्व प्राणांना तुझें उपाधित्व जर समान आहे तर तुझा 'प्राणोऽस्मि' असा एका मुख्य प्राणाविषयींच पक्षपात कां ? उत्तर—)'तु-' असें जरी आहे तरी प्राण निःश्रेयसरूप अशा माझी निःश्रेयसरूप उपाधि आहे. प्राणसंवादादिकांत प्राणाचें निःश्रेयस प्रसिद्ध आहे. तें मागें होतें किंवा पुढें असेल असें नाहीं तर 'अस्ति एव-' नित्य आहेच. ( केव्हांही नाहीं असें नाहीं. ) 'प्राणानां-' प्राणाच्या प्राणनादि पंचवृत्तींचें 'निःश्रेयसं-' शरीरधारणादिक नित्य आहे. 'इति' हा शब्द निःश्रेयसाच्या अस्तित्वाची प्रतिज्ञा परिसमाप्त झाली, हें सुचविण्यासाठीं आहे. २.]

आत्मबुद्धावथैकस्मिन्वक्तुकामः स कारणम् ॥ अंगीचकार तद्वाक्यमेवमेवेति देवराट् ॥ २८९ ॥ अस्त्येव कारणं राज-

न्निहामुत्र च जीवनम् ॥ निःश्रेयसाख्यं प्राणेऽस्मिन्वागादि-ष्वस्ति नैव तत् ॥ एतदेव हि वैषम्यं वागादेर्नापरं क्वचित् ॥ २९० ॥ गुणप्रधानभावोऽयं नियतो नैव विद्यते ॥ यदुक्तं तदपि प्राणव्यापाराद्परेषु हि ॥ २९१ ॥ व्यापारोपरमे नैत्र प्राणस्यास्ति क्रिया क्वचित् ॥ काचित्कदाचिद्वाप्यत्र कथंचिन्न प्रतर्दन ॥ २९२ ॥

अर्थः---('एवमु०-' इत्यादि वाक्याचें व्याख्यान करितात--) 'अथ एकस्मिन् प्राणे आत्मबुद्धा उत्कार्या कारणं वक्तुकामः देवराट् तद्वाक्यं एवमेव इति अंगीचकार-' नंतर एका प्राणांत आत्मबुद्धि करावयास सांगण्याचें कारण सांगण्याची इच्छा करणारा देवराज त्या प्रतर्दनाचें तें म्हणणें 'एवमेव' असेंच आहे, असें ह्मणून मान्य करता झाला. २८९ ( नंतर इंद्र त्याच्या उत्तराचाच अभिनय करितो--) 'हे राजन् इह अमुत्र च जीवनं लोकद्वयस्थितिहेतुत्वं निःश्रेयसाख्यं अस्मिन् प्राणे अस्ति एव । वागादिषु तत् न अस्ति एव । एतदेव कारणं । एतदेव वागादेः वैषम्यं न अपरं क्वचित् अस्ति-' हे राजा ! या लोकीं व परलोकीं जीवन--ज्याला 'निःश्रेयस' असें म्हटलें आहे, तें दोन्ही लोकांतील स्थितीचें हेतुत्व--निमित्तत्व, या प्राणांत--निःश्रेयसरूप मज आत्म्याची उपाधि अशा मुख्य प्राणांत आहेच. वर्तमानसमयीं प्राण जीवनाचें निमित्त आहे, भूतकाळीं तेंच जीवननिमित्त होतें व भविष्यत्काळींही तेंच त्याचें निमित्त असेल. पण वागादि इतर गौण प्राणांत तें निःश्रेयस --जीवननिमित्तत्व नाहींच. प्राण्याच्या ठिकाणीं आत्मबुद्धि करण्याचें हेंच कारण आहे. हें निःश्रेयसाभावरूपच वागादिकांचें मुख्य प्राणाहून वैषम्य आहे. दुसरें कोठेंही कांहीं नाहीं २९०. ( 'असें जर म्हटलें तर ऋषींच्या पूर्वोक्त वाक्याशीं विरोध येतो,' म्हणून म्हणशील तर त्या ऋषिवाक्याला इतर गौण प्राणांमध्यें अवकाश आहे त्यामुळें विरोध येत नाहीं. असें इंद्र सांगतो-- ) 'अयं गुणप्रधानभावः नियतः नैव विद्यते इति यदुक्तं तदपि प्राणव्यापारात् अपरेषु व्यापारेषु बोध्यं-' हा सर्व प्राणांचा गुणप्रधानभाव नियत नाहींच,

असें जें वर सांगितलें आहे तेंही मुख्य प्राणाच्या व्यापाराला सोडून इतर व्यापारांविषयीं जाणावें २९१. कारण 'प्राणस्य व्यापारोपरमे सति हे प्रतर्दन, अत्र काचित् क्रिया कदाचित् क्वचित् कथंचित् वा न एव अस्ति–' प्राणाच्या व्यापाराचा उपरम झाला असतां–प्राणव्यापार बंद पडला असतां हे प्रतर्दना, व्यवहारांत कोणतीही क्रिया केव्हांही कोठेंही व कोणत्याही प्रकारें होतच नाहीं २९२. ( २ )

[श्रुतिः—"जीवति वागपेतो मूकान्हि पश्यामो जीवति चक्षुरपेतोऽन्धान्हि पश्यामो जीवति श्रोत्रापेतो बधिरान्हि पश्यामो जीवति मनोऽपेतो बालान्हि पश्यामो जीवति बाहुच्छिन्नो जीवत्यूरुच्छिन्न इति । एवं हि पश्याम इति ।" ( वाक्, चक्षु, श्रोत्र इत्यादिकांनाही हें निःश्रेयस नाहीं, असें सहेतुक सांगतात–) 'वागपेतः-' वाक् रहित प्राणी 'जीवति-' जिवंत असतो. 'हि-' कारण आपण 'मूकान् पश्यामः-' मुक्यांना पाहतों. 'चक्षूरहितही जिवंत असतो. कारण आपण अंधांना पाहतों.' 'श्रोत्रेंद्रियरहितही जिवंत असतो. कारण आपण बहिऱ्यांना पाहतों.' 'मनोविरहितही प्राणी जिवंत असतो. कारण आपण मूढांना पाहतों.' ( इंद्रियांचें ज्ञान त्यांच्या कार्यावरून होतें. भाषणादि कार्यांच्या अभावीं त्यांचाही अभाव सिद्ध होतो. ) 'बाहुच्छिन्नः-' ज्याचे बाहू तोडले आहेत असाही जिवंत राहतो. 'ऊरुच्छिन्नः-' ज्याच्या मांड्या तोडलेल्या आहेत असाही जिवंत राहतो. 'एवं हि पश्यामः-' असेंच आम्ही पाहतों, असें इंद्र बोलला.]

**वाक्पाणिपादपायूनामुपस्थस्य तथैव च ॥ त्वक्चक्षुःश्रोत्ररसनाघ्राणानामपि वा विना ॥ व्यापारान्मिलितानां वाप्यन्यथा वास्ति जीवनम् ॥ २९३ ॥ मूकाश्च कुणयस्तद्वत्पंगवो रुद्धवायुकाः ॥ ब्रह्मचर्यरतास्तद्वत्कुष्ठिनो नेत्रवर्जिताः ॥ २९४ ॥ बधिरा रसनाघ्राणदोषिणोऽपीह जन्तवः ॥ अन्तःकरणशून्याश्च जडोन्मत्तादयोऽपि हि ॥ २९५ ॥ जीवन्ति न विना प्राणव्यापारं केऽपि कर्हिचित् ॥ प्राणस्तेनाहमस्मीति प्रतर्दन मयेरितम् ॥ २९६ ॥**

अर्थ—वाक्-इंद्रिय, हात, पाय, पायु, उपस्थ, त्वगिंद्रिय, चक्षुरिंद्रिय, श्रोत्रेंद्रिय, रसनेंद्रिय, व घ्राणेंद्रिय यांतील प्रत्येकाच्या व्यापारावांचून अथवा त्या सर्वांच्या व्यापारावांचूनही प्राण्याचें जीवन झालेलें दिसतें. कारण मुके, थोटे, पांगळे, बद्धकोष्ठ—ज्यांच्या अपानवायूचा रोध झाला आहे असे, त्याचप्रमाणें ब्रह्मचर्यामध्यें तत्पर, कुष्ठरोगी, अंध, बधिर, रसनादोषवान्, पीनसरोगी हेही प्राणी तसेच अंतःकरणशून्य, जड, वेडे इत्यादिकही जिवंत राहतात. पण ' प्राणव्यापारं विना-' प्राणाच्या व्यापारावाचून ' के अपि कर्हिचित्-' कोणीही कधींसुद्धां ' न जीवन्ति-' जिवंत रहात नाहींत. ' तेन हे प्रतर्दन, प्राणः अहं अस्मि इति मया ईरितम्-' त्यामुळें हे प्रतर्दना, मी प्राण आहें, असें मीं तुला सांगितलें ( मुख्य प्राणामध्यें इतरांहून असा विशेष असल्यामुळें त्याचेंच उपाधित्वानें ग्रहण करून ' प्राणोऽस्मि ' असें सांगितलें. ) २९३–९६.

[ श्रुतिः—"अथ खलु प्राण एव प्रज्ञात्मेदं शरीरं परिगृह्योत्थापयति । तस्मादेतदेवोक्थमुपासीत ॥" ( मुख्य प्राणामध्येंच निःश्रेयस आहे, याविषयीं उपपत्ति—) 'अथ खलु-' ज्या अर्थीं हें सर्व प्रत्यक्ष आहे, त्या अर्थीं ' प्राणः एव प्रज्ञात्मा-' क्रियाशक्ति ही ज्याची उपाधि आहे तोच ज्ञानशक्ति-उपाधि आहे [ म्ह० क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति या दोन्ही एकाच्याच उपाधि आहेत. ] तो ' इदं शरीरं-' हें प्रत्यक्ष दिसणारें स्थूल शरीर ' परिगृह्य-' हेंच मी किंवा हें माझें, अशारीतीनें याचा स्वीकार करून ' उत्थापयति-' शयन, आसन इत्यादिकांवरून वर उठवितो. ( आतां प्रसंगानें म्ह० स्मरण झाल्यामुळें छांदोग्य व बृहदारण्यक या उपनिषदांत प्रसिद्ध असलेल्या प्राणाच्याच दुसऱ्या उपासनेचें स्मरण करून देतात—) ' तस्मात्-' ज्या अर्थीं हा प्राण या शरीराला उठवितो त्या अर्थीं ' एतदेव-' या उत्थापनाला कारण होणाऱ्याच 'उक्थं-' उक्थ या नांवाच्या प्राणाची उपासना करावी. ]

मृतप्रायमिमं देहं सेन्द्रियच्छिद्रदैवतम् ॥ आसनाच्छयनात्स्थानादुत्थापयति वै यतः ॥ प्राणस्तेनोक्थनामायं ज्ञातव्यो वेदवादिभिः ॥ २९७ ॥ उक्थमुत्थानतः पूर्वं श्रेष्ठं पूर्वोत्थितं भवेत् ॥ श्रेष्ठो हिततमः प्राणः सोऽहं हिततमात्मधीः ॥ २९८ ॥

अर्थ—' यतः प्राणः इमं मृतप्रायं देहं सेंद्रियछिद्रदैवतं आसनात् शयनात् स्थानात् उत्थापयति वै तेन अयं वेदवादिभिः उक्थनामा ज्ञातव्यः-' ज्या अर्थी प्राण या मृतप्राय म्ह० मूर्च्छितादि शरीरास इंद्रियांचे गोलक, देवता, छिद्रें यांसहवर्तमान आसन, शय्या, भूमि वगैरे इतर स्थान यांवरून वर उत्थापित करतो, हें प्रसिद्ध आहे त्या अर्थी वेदवेत्त्यांना हा उत्थापनामुळें उक्थ या नांवानें उपास्य–उपासना करण्यास योग्य आहे. २९७. ' पूर्वं उत्थानतः उक्थं-' पूर्वी वर उठविल्यामुळें या प्राणाचें उक्थ हें नांव आहे. ' यत् पूर्वोत्थितं तत् श्रेष्ठं भवेत्-' व्यवहारांतही जें पूर्वी उत्पन्न झालेलें तें श्रेष्ठ असें प्रसिद्ध असतें. ( जसा हिरण्यगर्भ, इत्यादि. ) ' हिततमः प्राणः श्रेष्ठः-' अतिशय हितकर प्राण श्रेष्ठ आहे. ( ती श्रेष्ठता प्राणोपलक्षित अद्वितीय आत्म्यामध्यें पर्यवसित होते. म्हणूनच मी तुला ' प्राणोऽस्मि ' असा उपदेश केला, असें सांगतात—) ' सः अहं हिततमात्मधीः-' तो मी प्राण हिततम–अतिशय हित असें आत्मत्वानें ज्ञान ज्याला आहे असा आहें. [ म्ह० तो मी प्राण हिततम आत्मज्ञानी आहें. ] २९८.

[ श्रुतिः—“ यो वै प्राणः सा प्रज्ञा या वा प्रज्ञा स प्राणः । सह ह्येतावस्मिञ्शरीरे वसतः सहोत्क्रामतः । ” ( अहोपण प्राणच जर ' उक्थ ' या नांवानें उपास्य असेल तर तो परमात्मा नव्हे, तर प्राण-अपान इत्यादि पंचवृत्ति भौतिक प्राण असला पाहिजे, अशी आशंका कोणी घेईल, म्हणून श्रुति सांगते—) ' यः-' जो येथें ' वै प्राणः-' प्राण म्हणून प्रसिद्ध आहे ' सा प्रज्ञा-' ती प्रसिद्ध प्रज्ञा सर्व बोधांची साक्षिभूत संवित् आहे; आणि ' या वा प्रज्ञा-' जी प्रज्ञा म्हणून सांगितली आहे ' सः-' तो ' प्राणः-' प्राणोपाधिक परमात्मा आहे. ( कारण ) ' हि-' ज्या अर्थी ' एतौ-' तीं दोन्ही प्रज्ञा व प्राण ' सह-' मिळून ' अस्मिन् शरीरे-' या शरीरांत ' वसतः-' राहतात—निवास करितात व ' सह-' जीवाशीं मिळून ' उत्क्रामतः-' मरणसमयीं या शरीरापासून उत्क्रमण करितात. ]

प्रज्ञात्मत्वं न चाप्यस्य कदाचिद्योगतो भवेत् ॥ प्रज्ञया नेत्रवागादेर्यथा स्यादुपचारतः ॥ २९९ ॥ भेदोऽमृतायुषोर्यद्वत्प्रा-

णस्य च न विद्यते ॥ प्राणप्रज्ञानयोरेवं भेदः क्वापि न विद्यते ॥ ३०० ॥ प्राणप्रज्ञे प्रसिद्धे ये लौकिके सर्वदेहिनाम् ॥ खट्वांगवन्न लभ्येते अपि ते क्वापि वै पृथक् ॥ ३०१ ॥ अस्मिन् जंगममात्रस्य शरीरे सहिते स्थिते ॥ जीवने मरणे तद्वत्सहोत्क्रामत एव ते ॥ ३०२ ॥ यतो लौकिकयोः प्राणप्रज्ञयोर्नास्ति वै भिदा ॥ ततोऽलौकिक एकस्मिन्मयि केन भवेदिह ॥

अर्थ—( प्राण व प्रज्ञा यांना अद्वितीयत्व व सर्वान्तरत्व असल्यामुळें तीं दोन्ही परमात्म्याचीं बोधक आहेत. म्हणून त्यांना एकसारखेंच प्राधान्य आहे, असें पूर्वीं सांगितलें. आतां तीं दोन्ही लक्ष्यरूपानें एकच आहेत, असें श्रुति सांगते—) 'यथा नेत्रवागादेः कदाचित् प्रज्ञया योगतः उपचारतः प्रज्ञात्मत्वं स्यात् तथा अस्य अपि प्रज्ञात्मत्वं न-' ज्याप्रमाणें नेत्रादि ज्ञानेंद्रियांचें व वागादि कर्मेंद्रियांचें एकादेवेळीं वृत्तिरूप प्रज्ञेच्या संबंधानें औपचारिक प्रज्ञात्मत्व होतें तसें या प्राणालाही औपचारिक प्रज्ञात्मत्व नाहीं. ( तर त्याला मुख्य प्रज्ञात्मत्वच आहे ) २९९. 'यद्वत् अमृतायुषोः प्राणस्य च भेदः न विद्यते एवं प्राणप्रज्ञानयोः भेदः क अपि न विद्यते-' ज्याप्रमाणें वर सांगितलेल्या आयु व अमृत या विशेषणांचा व प्राणाचा भेद नाहीं त्याप्रमाणें प्राण व प्रज्ञान यांचा कोठेंही भेद नाहीं ३००. ( आतां कैमुत्यन्यायानेंही लक्ष्य परब्रह्माचें ऐक्य दृढ करण्यासाठीं प्राण व प्रज्ञा या उपाधींचाही भेद नाहीं, असें सांगतात— ) 'सर्वदेहिनां प्रसिद्धे ये लौकिके प्राणप्रज्ञे ते अपि खट्वांगवत् क अपि पृथक् न वै लभ्येते-' सर्व प्राण्यांना प्रसिद्ध असा जो लौकिक प्राण व प्रज्ञा, तीं दोन्ही खाटेच्या पायांप्रमाणें कोठेंही पृथक् असल्याचा अनुभव येत नाहीं ३०१. ( तर तीं दोन्ही सहवर्तमान असलेलींच दिसतात—) 'अस्मिन् जंगममात्रस्य शरीरे ते जीवने सहिते स्थिते तद्वत् मरणे ते सह एव उत्क्रामतः-' या प्रत्येक जीवाच्या शरीरांत जीवनसमयीं प्राण व प्रज्ञा सह—बरोबरच राहतात व त्याचप्रमाणें मरणसमयीं सहवर्तमानच शरीराला सोडून जातात ३०२. जर याप्रमाणें लौकिक प्राण व प्रज्ञा यांचाही भेद प्रसिद्ध नाहीं तर मग

अलौकिक व एक अशा माझ्या ठिकाणीं भेद कसा संभवणार ? ( कारण मी अलौकिक असल्यामुळें माझ्या ठिकाणचा भेद प्रत्यक्षादि लौकिक प्रमाणांनीं सिद्ध होणें शक्य नाहीं व मी एक असल्यामुळें माझ्या ठिकाणीं भेद—द्वित्व संभवतच नाहीं. अर्थात् या श्लोकांतील ' अलौकिके ' व ' एकस्मिन् ' हीं विशेषणें सहेतुक आहेत ) ३०३.

[ श्रुतिः—"तस्यैषैव दृष्टिः । एतद्विज्ञानम् ।". ' तस्य-' त्या प्राणाची —प्राणोपाधिक आत्म्याची ' एषा एव-' ही पुढें सांगितलेल्या प्रकारचीच ' दृष्टिः- ' दर्शन या नांवाची अवगति—ज्ञान—बोध आहे. म्हणजे ' एतत् विज्ञानं- ' हें जें सुषुप्त तेंच आत्म्याला प्राणत्व आहे, हें जाणण्याचें कारण आहे. ]

अन्वयव्यतिरेकाभ्यां प्राणस्यैवात्मता भवेत् ।। सुप्तौ मृतौ च तावेतौ कर्तुं शक्यौ महात्मभिः ।। ३०४ ।। इदमेव हि विज्ञानं मृतिसुप्तिसमुत्थितम्।। दर्शनाय भवेन्नृणां प्राणात्मत्वस्य वस्तुनः।।

अर्थः—' अन्वय ' म्ह० सुषुप्ति-स्वप्न-जागृति या अवस्थांत प्राणाची अनुवृत्ति व ' व्यतिरेक ' म्ह० मुख्य प्राणाहून इतर जीं इंद्रियें त्यांचा सुषुप्तींत लय होणें, यांच्या योगानें प्राणच आत्मा आहे, असा निश्चय होतो. ' प्राणस्य एव आत्मता भवेत्-' अन्वय-व्यतिरेकानें प्राणाचीच आत्मता निश्चित होते. ' महात्मभिः सुप्तौ मृतौ च तौ एतौ कर्तुं शक्यौ- ' महात्म्यांना सुषुप्ति व मरण यांमध्यें प्राणाचा अन्वय व व्यतिरेक करतां येणें शक्य आहे. ( सुषुप्तींत प्राणाची अनुवृत्ति असते व मरणावस्थेंत त्याचा अभाव होतो, हें पाहून विचारी जनांना प्राणच आत्मा आहे, असें म्हणतां येतें. कारण आत्मा—प्राण जोंवर शरीरांत असतो तोंवर तें सजीव असतें व आत्मा—प्राण शरीरांतून गेला कीं तें मरतें. यास्तव प्राणच आत्मा आहे, असा भावार्थ. ) ३०४. ' इदं एव हि मृतिसुप्तिसमुत्थितं विज्ञानं नृणां प्राणात्मत्वस्य वस्तुनः दर्शनाय भवेत्- ' हेंच—मरण व सुषुप्ति यांच्या विषयींचें अन्वयादिचिंतनरूप विज्ञान मनुष्यांना प्राणात्मभावरूप वस्तूच्या दर्शनास—वेदान्तशास्त्राचें प्रमेय असा जो आत्मा त्याच्या साक्षात्कारास कारण होतें.

( सुषुप्तींत प्राण असतो व मरणावस्थेंत नसतो, असें सतत चिंतन करणें हेंच शेवटीं आत्मसाक्षात्कार करवितें. श्रुतींतील ' दृष्टिः ' या शब्दाचा ' साक्षात्कार ' असा मुख्य अर्थ न करितां साक्षात्काराचें साधन ' प्राणच मी आहें ' असें चिंतन, असा लाक्षणिक अर्थ करावा. कारण तसें चिंतन केल्यावर मग साक्षात्कार होतो. ) २०५

[ श्रुतिः—" यत्रैतत्पुरुषः सुप्तः स्वप्नं न कंचन पश्यत्यथास्मिन्प्राण एवैकधा भवति । तदैनं वाक्सर्वैर्नामभिः सहाप्येति चक्षुः सर्वै रूपैः सहाप्येति श्रोत्रं सर्वैः शब्दैः सहाप्येति मनः सर्वैर्ध्यानैः सहाप्येति ।" ' यत्र-' ज्या अवस्थेंत ' एतत्-' सर्व विशेषज्ञानरहित होऊन 'पुरुषः-' वस्तुतः परिपूर्ण असूनही परिच्छिन्न हृदयांत राहणारा आत्मा ' सुप्तः- ' झोपीं गेलेला असा होत्साता ' कंचन स्वप्नं न पश्यति- ' कोणताच जाग्रद्वासनारूप पदार्थ पहात नाहीं ' अथ-' त्यावेळीं ' अस्मिन् प्राणे एव-' या मुख-नासिकादि स्थानांतून संचार करणाऱ्या प्राणांतच —क्रियाशक्तींतच—दुसऱ्या कशाही मध्यें नाहीं ' एकधा भवति-' एकत्वास प्राप्त होतो. ह० प्राणोपाधिक—' प्राण ' या शब्दास योग्य असा पुरुष होतो. ' तदा- ' त्यावेळीं—प्राण एकत्वास प्राप्त होण्याच्या वेळीं ' एनं-' या प्राणोपाधिक आत्म्यास—आत्म्यामध्यें ' वाक् सर्वैः नामभिः सह अप्येति- ' वाक् सर्व नामांसह लय पावते. ' चक्षुः०- ' चक्षु सर्व रूपांसह लय पावतें, ' श्रोत्रं०-' श्रोत्र सर्व शब्दांसह लय पावतें. 'मनः०-' मन सर्व ध्यानांसह लय पावतें. श्रुतिः—" स यदा प्रतिबुध्यते यथाऽग्नेर्ज्वलतः सर्वा दिशो विस्फुलिङ्गा विप्रतिष्ठेरन्नेवमेवैतस्मादात्मनः प्राणा यथायतनं विप्रतिष्ठन्ते प्राणेभ्यो देवा देवेभ्यो लोकाः । " ' सः- ' तो प्राणोपाधिक पुरुष ' यदा-' जेव्हां ' प्रतिबुध्यते- ' जाग्रदवस्थेस प्राप्त होतो—जागा होतो तेव्हां ' यथा- ' ज्याप्रमाणें ' ज्वलतः अग्नेः- ' जाज्वल्यमान अग्नीपासून ' सर्वा दिशः-' सर्व दिशांकडे ' विस्फुलिंगाः-' क्षुद्र अग्निकण —बारीक किटाळें ' विप्रतिष्ठेरन्-' नाना बाजूंना उडतात ' एवमेव-' याच न्यायानें ' एतस्मात् आत्मनः-' या प्राणोपाधिक आत्म्यापासून ' प्राणाः- ' वाक्, चक्षु इत्यादि गौण प्राण ' यथायतनं- ' ज्याचें जें जिह्वा, डोळे, कान इत्यादि स्थान असतें त्याला उद्देशून—त्याच्याकडे

' विप्रतिष्ठन्ते- ' नानाप्रकारें जातात. ' प्राणेभ्यः- ' त्या वागादि प्राणांपासून ' देवाः- ' विविध अग्न्यादि देव व ' देवेभ्यः लोकाः ' त्या देवांपासून नाम-रूपादि विविध लोक—विषय उद्भवतात. ]

यत्रायं पुरुषः सुप्तः स्वप्नं वेत्ति न कंचन ॥ प्राणात्मनि तदा देव एकधैवावतिष्ठते ॥ ३०६ ॥ कर्मज्ञानेंद्रियैस्तद्वदन्तःकरणकेन च ॥ एतेषां विषयैर्नापि भेदो यस्मात्प्रतीयते ॥ ३०७ ॥ अयं हि करणग्रामः प्राणोपाधौ मयीश्वरे ॥ प्रत्येकमात्मविषयैः सह सुप्तौ प्रलीयते ॥ ३०८ ॥ तत एकत्वमेवात्र मम प्राणस्वरूपिणः ॥ सर्वप्रकारो भेदोऽयं विलीनो मयि सर्वथा ॥ ३०९ ॥ प्रबोधकाले नैवैते जायन्तेऽन्यत एव हि ॥ मत्तः प्राणात्मनस्तस्मात्प्राणात्माहं प्रतर्दन ॥ ३१० ॥ जायमानास्तथा प्राणा ज्ञानकर्मेंद्रियात्मकाः ॥ मत्तः प्राणात्मनो भिन्ना न स्युरेते कथंचन ॥ ३११ ॥ किंत्विमे मम रूपाणि जायन्ते मत्त एव हि ॥ अभेदेऽपि जनिर्दृष्टा यथाग्नेर्ज्वलतः कणाः ॥ ३१२ ॥ ज्वलतो महतो वह्नेः प्रजायन्ते कणा यथा ॥ प्रबुद्धात्प्राणतो मत्तः प्राणा अपि तथैव हि ॥ ३१२ ॥ इंद्रियेभ्यस्ततो देवा अग्न्याद्या अपि जज्ञिरे ॥ अग्न्यादिभ्यश्च संजाता विषया लोकशब्दिताः ॥ ३१४ ॥

अर्थः—' यत्र- ' ज्या अवस्थेमध्यें ' अयं पुरुषः- ' हा पुरुष—स्थूल-सूक्ष्माभिमानी जीव ' सुप्तः- ' शयन केलेला असा होत्साता ' कंचन स्वप्नं- ' कोणत्याही स्वप्नास—जाग्रद्वासनाकार्यास ' न वेत्ति- ' जाणत नाहीं ' तदा— ' त्या अवस्थेंत ' प्राणात्मनि देवे- ' प्राणरूप ह्म० प्राणोपाधिक देवामध्यें—परमात्म्यामध्यें ' एकधा एव- ' एका प्रकारानेंच ह्म० एक-रूपानेंच " अवतिष्ठते- ' अवस्थित होतो. ( स्वप्न व जागृति या दोन अवस्थांमध्यें उपाधिप्रयुक्त भेद व वास्तविक भेद असे दोन प्रकार होते. पण या सुषुप्तिदशेंत फक्त अभेद अवशिष्ट राहतो, असा भावार्थ. ) ३०६ ' यस्मात् ज्ञानकर्मेंद्रियैः तद्वत् अन्तःकरणेन एतेषां विषयैः अपि

भेदः न प्रतीयते-' कारण ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, अन्तःकरण, व या सर्वांचे विषय यांच्या योगानें भेद प्रतीत होत नाहीं. म्हणून तो पुरुष सुषुप्तींत एकरूपच होतो २०७. ( सुषुप्तींत उपाधिप्रयुक्त भेदाचा अभाव कां होतो ? म्हणून विचाराल तर सांगतों— ) 'अयं हि करणग्रामः प्रत्येकं आत्मविषयैः सह सुप्तौ प्राणोपाधौ मयि ईश्वरे प्रलीयते-' कारण हा इंद्रियसमुदाय आपापल्या नामादि विषयांसह सुषुप्तिकाळीं प्राण हीच ज्याची उपाधि आहे अशा मज ईश्वराचे ठिकाणीं प्रळय पावतो २०८. 'यतः अयं सर्वप्रकारः भेदः मयि सर्वथा विलीनः ततः प्राणस्वरूपिणः मम अत्र एकत्वं एव सिद्धं-' ज्या अर्थीं हा सर्व प्रकारचा भेद माझ्या ठिकाणीं सर्वप्रकारें विलीन झालेला आहे म्हणजे वास्तविक भेद स्वरूपाच्या महिम्यानेंच निरस्त झालेला असून औपाधिक भेदही उपाधिलयामुळेंच नाहींसा झालेला आहे त्या अर्थीं ज्याचें स्वरूप प्राणावरून उपलक्षित होतें अशा माझें सुषुप्तींत एकत्वच सिद्ध होतें २०९. ( मी लयाचा आधार आहें, असें दाखवून आत्म्याचें उपादानत्व सांगितलें. तथापि त्या प्राणांचा कर्ता कोणी निराळा असेल अशी शंका राहूं नये म्हणून उत्पत्तीचें कारणही आत्माच आहे म्ह० जगाचें उपादान व निमित्त कारण एक आहे असें दाखवितात— ) 'प्रबोधकाले एते अन्यतः एव हि नैव जायन्ते किंतु इमे मत्तः प्राणात्मनः एव जायन्ते । तस्मात् हे प्रतर्दन, अहं प्राणात्मा अस्मि-' जागें होण्याच्या वेळीं हे वागादिक प्राण दुसऱ्या कोणापासूनच उत्पन्न होत नाहींत. तर मी जो प्राणात्मा त्या मजपासून ते उत्पन्न होतात. त्यामुळें माझ्या ठिकाणीं ब्रह्माचें लक्षण संभवतें. म्हणून हे प्रतर्दना, मी प्राणात्मा आहें, वेदान्तवेद्यरूप आहें २१०. ( लयोक्तीप्रमाणें सृष्टयुक्तीचेंही अद्वितीयत्वेंतच पर्यवसान होतें, असें दाखवितात — ) 'मत्तः प्राणात्मनः जायमानाः एते ज्ञानकर्मेंद्रियात्मकाः प्राणाः मत्सकाशात् कथंचन भिन्नाः न स्युः-' प्राणरूप अशा मजपासून उत्पन्न होणारे हे ज्ञानकर्मेंद्रियरूप प्राण मजहून कोणत्याही प्रकारें भिन्न नाहींत. ( मृत्तिकेचा घट मृत्तिकेहून भिन्न जसा नसतो त्याप्रमाणें. ) २११. ( ते भिन्न जर नाहींत तर भिन्न दिसतात कसे ? उत्तर— ) 'किं तु इमे मम रूपाणि-' पण हे

सर्व प्राण ह्या माझ्या विभूति आहेत. ते ' मत्तः एव हि जायन्ते-' मजपासूनच उत्पन्न होतात. ( अहो पण विभूति व विभूतिमान् यांचा भेद नसल्यामुळें विभूतिमानापासून विभूतींचा जन्म कसा ? उत्तर— ) ' यथा ज्वलतः अग्नेः कणाः तथा अभेदे अपि जनिः दृष्टा-' ज्याप्रमाणें जळणाऱ्या अग्नीपासून किटाळें त्याप्रमाणें विभूति व विभूतिमान् यांचा अभेद असला तरी विभूतींचा जन्म होतो ३१२. ' ज्वलतः महतः वह्नेः यथा कणाः प्रजायन्ते तथा एव हि प्रबुद्धात् प्राणतः मत्तः प्राणाः अपि जायन्ते-' जळणाऱ्या मोठ्या अग्नीपासून जसे कण उत्पन्न होतात त्याचप्रमाणें जाग्या झालेल्या प्राणरूप मजपासून इंद्रियेंही उत्पन्न होतात ३१३. ' ततः इंद्रियेभ्यः अग्न्याद्याः देवाः अपि जज्ञिरे । अग्न्यादिभ्यश्च लोकशब्दिताः विषयाः संजाताः-' त्यानंतर इंद्रियांपासून अग्निप्रभृति इंद्रियाभिमानी देव उत्पन्न झाले. अग्न्यादि देवांपासून लोक या नांवाचे विषय उत्पन्न झाले ३१४.

( याप्रमाणें ' यत्रैतत्पुरुषः-' इत्यादि श्रुतिवाक्याचा अर्थ सांगून या वाक्याचें मूळ असा जो दृष्टिसृष्टिवाद तो व्यक्त करण्यासाठीं वरील श्रुत्यर्थ तर्कानेंही कसा सिद्ध होतो, तें दाखवितात— )

सुषुप्ते न हि वागादि नामादिसहितं क्वचित् ॥
दृश्यते तेन चान्येन प्राणस्त्वन्येन दृश्यते ॥ ३१५ ॥

अर्थ—' सुषुप्ते नामादिसहितं वागादि तेन अन्येन वा क्वचित् न हि दृश्यते प्राणः तु अन्येन दृश्यते-' सुषुप्त्यवस्थेंत नामादि विषयांसह वागादि इंद्रियजात त्या निजलेल्या पुरुषाकडून किंवा दुसऱ्या पुरुषाकडून केव्हांही पाहिलें जात नाहीं. पण प्राण निजलेल्या पुरुषाहून अन्य पुरुषाकडून पाहिला जातो. ( निजलेल्या पुरुषाच्या इंद्रियांचा स्वतः त्याला किंवा त्याच्या जवळ बसलेल्या दुसऱ्या कोणाला प्रत्यय येत नाहीं. पण निजलेल्या पुरुषाच्या प्राणाचा अनुभव त्याच्यापाशीं बसलेल्या मनुष्याला श्वासोच्छ्वासाच्या रूपानें येतो. याविषयीं कोणाचाही मतभेद असणें शक्य नाहीं ) ३१५. ( अर्थात् वागादि इंद्रियें हीं प्राणाचीं कार्यें आहेत, असें प्राप्त होतें, हें दाखविण्यासाठीं उदाहरणासह कार्याचें लक्षण सांगतात— )

यद्यस्मिन्सति लभ्यं तत्तत्रैव च न लभ्यते ॥
तत्तस्य कार्यं विज्ञेयं मृदो यद्वद्घटादिकम् ॥ ३१६ ॥

**अर्थ**—' यत् यस्मिन् सति लभ्यं तत् तत्रैव च न लभ्यते तत् तस्य एव कार्यं विज्ञेयं यद्वत् मृदः घटादिकम्-' जें, जें असेल तेव्हांच दिसतें व तें असतांनाच दिसत नाहीं तें त्याचें कार्य. जसें—मृत्तिकेचें घटादिक हें कार्य आहे. कारण मृतिका असतांनाच घटादिकार्य उपलब्ध होतें व घटादिकांच्या नाशानंतर मृत्तिका असली तरी तें कार्य दिसत नाहीं. म्हणून मृत्तिका ही वस्तु व्यापक असून घटादिक हें त्याचें कार्य आहे ३१६. ( या लक्षणांत सत्तेचाही निवेश केला पाहिजे, असें सांगतात— )

न सत्ता लभ्यतेऽन्यस्माद्यस्मिन्सत्येव लभ्यते ॥
तत्तस्य कार्यं विज्ञेयं तंतूनां हि यथा पटः ॥ ३१७ ॥

अर्थः—यस्य सत्ता अन्यस्मात् न लभ्यते यस्मिन् सति एव लभ्यते तत् तस्य कार्यं विज्ञेयं यथा तंतूनां पटः हि-' ज्याची सत्ता दुसऱ्या कोणापासूनही प्राप्त होत नाहीं तर जें असलें तरच जें सत्तावान् होतें तें त्याचें कार्य असें जाणावें, जसें तंतूचें पट हें कार्य आहे ३१७. ( हेंच लक्षण इंद्रियांनाही लागू आहे— )

करणानां समूहोऽपि प्राणे सति न दृश्यते ॥
प्राणे सत्येव नान्यस्माज्जायते कार्यमस्य सः ॥ ३१८ ॥

अर्थः—' करणानां समूहः अपि सुषुप्तौ प्राणे सति न दृश्यते प्रबोधे प्राणे सति एव अन्यस्मात् न जायते अतः सः अस्य कार्य-' त्याच न्यायानें इंद्रियांचा समुदायही सुषुप्तींत प्राण असला तरी दिसत नाहीं. जागरावस्थेंत प्राण असतांनाच तो दिसतो. तो इंद्रियसमूह दुसऱ्या कशापासूनही उत्पन्न होत नाहीं. त्याला प्राणावाचून दुसऱ्या कोणापासूनही सत्ता प्राप्त होत नाहीं. म्हणून तो इंद्रियसमुदाय या प्राणाचें कार्य आहे, हें सिद्ध झालें. ३१८ ( म्हणूनच प्राणांत त्याच्या कार्यभूत इंद्रियांचा लय होतो, असें जें श्रुतींत म्हटलें आहे तें योग्य आहे, असें सांगतात—)

सुषुप्तौ करणग्रामो लभ्यते विषयैः सह ॥

नैव तस्मादयं लीनः प्रध्वस्तघटवत्तदा ॥ ३१९ ॥

**अर्थः**—'यस्मात् सुषुप्तौ करणग्रामः विषयैः सह नैव लभ्यते तस्मात् तदा अयं प्रध्वस्तघटवत् लीनः-' ज्या अर्थी सुषुप्तींत हा इंद्रियसमुदाय विषयांसह दिसत नाहीं त्या अर्थी त्या अदर्शनामुळेंच हा इंद्रियसमूह नाश पावलेल्या घटाप्रमाणें आपल्या कारणांत लीन झालेला आहे, असें ज्ञान होतें. ३१९ ( अहो पण इंद्रियांचा जरी लय झाला तरी इंद्रियांहून अगदीं भिन्न असलेल्या विषयांचा लय इंद्रियलयामुळें कसा होतो ? उत्तर— )

तदभावे कथं स स्यात्तदीयो विषयो हि यः ॥

न प्रदीपं विना तस्य प्रभा लोकेन दृश्यते ॥ ३२० ॥

**अर्थः**—'तदभावे यः तदीयः विषयः सः कथं स्यात् । प्रदीपं विना तस्य प्रभा लोकेन न दृश्यते- ' त्या इंद्रियांचा अभाव झाला असतां जो इंद्रियांचाच विषय आहे असा नामादि विषय सत्तावान् कसा होईल ? ( इंद्रियांच्या अभावीं त्यांची सत्ता संभवत नाहीं. ) प्रदीपावाचून त्याचें कार्य जी प्रभा ती लोकांकडून कशी पाहिली जाणार ? शक्यच नाहीं. ३२० (तशीच लयाच्या आधारापासून उत्पत्ति संभवते, असें सांगतात. )

यो हि यत्र विलीयेत निर्गच्छति ततो हि सः ॥

अग्नौ यथा कणो लीनोऽप्यग्नेरेव विनिःसरेत् ॥ ३२१ ॥

**अर्थः**—' यः यत्र विलीयेत ततः हि सः निर्गच्छति । यथा अग्नौ लीनः अपि कणः अग्नेः एव विनिःसरेत्-' जो ज्यांत विलीन होतो त्यापासूनच तो बाहेर निघतो. जसा अग्नींत लीन झालेलाही कण अग्नीपासूनच बाहेर पडतो. ३२१ ( अहो, अग्नीपासून उडणारें किटाळ अग्नींत लीन झालेल्या किटाळाहून निराळें असतें. जागें होतांच प्राणात्म्यापासून उत्पन्न होणारा इंद्रियसमुदायही तसाच पूर्वी लीन झालेल्या समूहाहून निराळा असतो कीं काय ? उत्तर—)

न चान्यः कणवत्प्राणान्निःसरन्नुपलभ्यते ॥

इंन्द्रियग्राम एतस्मात्स एवातो विनिःसरेत् ॥ ३२२ ॥

**अर्थ**—' कणवत् प्राणात् निःसरन् इंद्रियग्रामः अन्यः न उपलभ्यते। एतस्मात् सः एव अतः विनिःसरेत्' जसा अग्नीपासून उडणारा अग्निकण पूर्वी लीन झालेल्या कणाहून निराळा असल्याचा अनुभव येतो त्याप्रमाणें प्राणापासून बाहेर पडणारा इंद्रियसमुदाय पूर्वी लीन झालेल्या समुदायाहून निराळा आहे, असा अनुभव येत नाहीं. भेद प्रत्यक्ष न दिसणें या कारणामुळें पूर्वी लीन झालेला जो इंद्रियसमुदाय तोच प्राणापासून बाहेर निघतो. ( अर्थात् पूर्व समूहाहून दुसरा इंद्रियसमूह भिन्न आहे, अशाविषयीं प्रत्यक्ष प्रमाण नाहीं.) ३२२ ( त्याविषयीं अनुमान प्रमाणही नाहीं, असें सांगतात—)

न चानुमानतस्तस्य विलीनादन्यता भवेत् ॥
धूलिपुंजे विलीनस्य घटादेरन्यता न च ॥ ३२३ ॥

**अर्थ**—' अनुमानतः अपि तस्य विलीनात् अन्यता न भवेत् । धूलिपुंजे विलीनस्य घटादेः अन्यता न च-' अनुमानानेंही इंद्रियसमुदाय पूर्वी लीन झालेल्या समुदायाहून भिन्न नाहीं. धुळीच्या ढिगांत झांकलेल्या घटादिकाला कोणी अन्य समजत नाहीं—मातींत झांकलेला घट बाहेर काढल्यावर तो त्याहून भिन्न आहे, असें कोणी म्हणत नाहीं. (' अहो पण धुळींत झांकून ठेवलेला घट विलीन कसा ? ' अशी शंका—)

न चादर्शनमात्रात्स्यादन्यो हि विलयः क्वचित् ॥
न ह्यदृष्टा विलीयन्ते पुत्राद्याः स्वस्य कस्यचित् ॥ ३२४ ॥

अर्थ—' अदर्शनमात्रात् क्वचित् विलयः न स्यात् । विलयः अन्यः हि । अदृष्टाः कस्यचित् स्वस्य पुत्राद्याः न हि विलीयन्ते-' केवळ अदर्शनानेंच केव्हांही विलय होणें शक्य नांहीं. कारण विलय अदर्शनाहून निराळा आहे. ( 'अहो पण जागेपणीं न दिसणाऱ्या स्वप्नपदार्थांचा विलय झाला असें म्हणतात' म्हणून म्हणाल तर प्रातिभासिक पदार्थांचें अदर्शन झालें असतां ते विलीन झाले असें म्हणतां येणें जरी शक्य असलें तरी व्यावहारिक पदार्थांविषयीं तसें म्हणतां येत नाहीं, असें शंकाकारच म्हणतो—) न दिसलेले आपले पुत्रादिक विलीन झाले आहेत, असें कोणी म्हणत नाहीं. तेव्हां तुमचें म्हणणें उपपन्न कसें

होतें ? ३२४ ( या शंकेचें खरें समाधान सिद्धान्ती पुढें सांगणार आहेत. तथापि वाद्याला अगोदर एक प्रश्न करितात— )

तदा तेषां लयो भूयाद्दर्शनेऽस्तु पुनर्जनिः ॥

**अर्थ**—'तदा-' जेव्हां त्यांचें दर्शन होत नाहीं तेव्हां 'तेषां-' त्या पुत्रादिकांचा 'लयः भूयात्-' लय होवो व 'दर्शनकाळे पुनः जनिः अस्तु-' दर्शनाच्या वेळीं—जेव्हां त्यांचें दर्शन होतें तेव्हां पुनः त्यांची उत्पत्ति होवो, असें मानण्यांत तुला कोणता अनिष्ट प्रसंग वाटतो ? ( यावर वादी म्हणतो— )

नैवं मृतानामुत्पत्तिः प्रसज्येत कथंचन ॥

**अर्थ**—'एवं—' असें जर मानलें तर तुझ्या मतीं 'मृतानां उत्पत्तिः कथंचन न प्रसज्येत-' मेलेल्या जीवांची उत्पत्ति कोणत्याही प्रकारें होणार नाहीं. ( मरण किंवा जीवन हें पुनर्दर्शनाचें कारण नाहीं, तर दृष्टादृष्टसामग्रीचें सांनिध्य हेंच त्याचें कारण आहे, असें मनांत धरून जिवंत पुरुषाचें नियमानें पुनर्दर्शन होतेंच असें नाहीं, असें सिद्धान्ती म्हणतात— )

जीवतोऽपि यतः क्वापि पुनर्नैवास्ति दर्शनम् ॥ ३२५ ॥

**अर्थ**—'यतः-' कारण 'जीवतः अपि क्व अपि पुनः दर्शनं नैवास्ति-' जिवंत असलेल्याही एकाद्याचें कोठें कोठें पुनर्दर्शन होतच नाहीं ३२५ .( वादी—अहो पण— )

देशांतरगतौ दृश्याः पुत्राद्या न मृतास्तथा ॥

**अर्थ**—दूर देशीं गेलेले 'पुत्राद्याः-' पुत्रादिक 'देशान्तरगतौ-' त्या देशांत गेलें असतां 'दृश्याः-' दिसतात. 'तथा मृताः न दृश्याः-' पण मेलेले पुत्रादिक तसे दिसण्यास योग्य नसतात. ( यावर सिद्धान्ती म्हणतात— )

अत्राप्येव हि दृश्यन्ते क्वापि स्वप्ने मृता अपि ॥ ३२६ ॥

**अर्थ**—तर मग 'मृताः अपि अत्राप्येव हि क्वापि स्वप्ने दृश्यन्ते-' मेलेले पुत्रादिकही येथल्या येथेंच क्षणभर भासणाऱ्या स्वप्नांत दिसतात.

( अर्थात् अदृष्टादि सामग्रीच पुनर्दर्शनादिकांचें निमित्त आहे, त्यामुळें अदर्शनानें लय व दर्शनानें उत्पत्ति होते, हें आमचें म्हणणें अगदीं युक्तियुक्त आहे ) ३२६. ( यावर वादी पुनः शंका घेतो- )

ततोऽहं जात इत्येषा पुत्रादीनां हि विद्यते ॥
बुद्धिरस्मान्न जायन्ते पुत्राद्याः सति दर्शने ॥ ३२७ ॥

अर्थ--' ततः अहं जातः ' इत्येषा पुत्रादीनां बुद्धिः विद्यते हि । अस्मात् दर्शने सति पुत्राद्याः न जायन्ते-' ' त्या अमक्या पित्यापासून मी झालों ' अशा प्रकारची पुत्रादिकांची बुद्धि विद्यमान असते. त्यामुळें दर्शन झालें असतां पुत्रादिक उत्पन्न होत नाहींत. कारण पित्यानें वगैरे पुत्रादिकांना पाहिलें असतां ' मी यापासून झालों ' अशी बुद्धि पुत्रादिकांना होत नाहीं. ३२७ ( दृष्टिसृष्टिवादी या शंकेचें उत्तर देतो- )

यतो घटेऽपि नैवास्ति जातोऽहमिति धीः क्वचित् ॥
किंतु तद्द्रष्टुरेवैषा तस्माद्व्यर्थमिदं वचः ॥ ३२८ ॥

अर्थ--' यतः-' कारण ' घटे अपि-' घटाच्या ठिकाणींही ' जातोऽहं इति धीः-' मी उत्पन्न झालों अशी बुद्धि ' क्वचित् नैवास्ति ' केव्हांही नसते. ( घट उत्पन्न होतो. पण त्याच्या ठिकाणीं मी यापासून उत्पन्न झालों अशी भावना नसते. त्यामुळें जेथें जेथें उत्पत्ति तेथें तेथें ' मी झालों ' ही बुद्धि अशी व्याप्ति-असें साहचर्य संभवत नाहीं. ) ' किंतु तद्द्रष्टुः एव एषा-' तर त्या घटाला पाहणारा जो पुरुष त्यालाच हा घट उत्पन्न झाला, अशी बुद्धि होते. ' तस्मात इदं वचः व्यर्थ-' म्हणून वरील आक्षेपवचन व्यर्थ आहे ३२८. ( अहो पण जड पदार्थांच्या ठिकाणीं तशी बुद्धि जरी न संभवली तरी उत्पन्न होणारे चेतन मनुष्यादि मी झालों असें मानतात. त्यामुळें ही बुद्धि चेतनोत्पत्तीची व्यापिका आहे, म्हणून म्हणाल तर सांगतों- )

चेतना अपि नैवात्र जानन्त्युत्पत्तिमात्रतः ॥
वयं जातास्ततो व्यर्था जडाजडविभागधीः ॥ ३२९ ॥

अर्थ--' चेतनाः अपि उत्पत्तिमात्रतः ' वयं जाताः ' इति नैवात्र

जानन्ति-' चेतन मनुष्य प्राणीही केवळ उत्पत्ति होतांच ' आम्ही उत्पन्न झालों ' असें येथें जाणत नाहींतच. ( तर ते मोठे होऊन बोलूं लागले व त्यांना चांगलें स्मरण राहूं लागलें म्हणजे मग आई-बाप इत्यादिकांच्या सांगण्यावरून त्यांची तशी बुद्धि होते. ) ' ततः जडाजडविभागधीः व्यर्था-' त्यामुळें जड व अजड अशी विभागबुद्धि व्यर्थ आहे. २२९. ( चेतनाला तशी बुद्धि होते जडाला होत नाहीं, इत्यादि विभागाची कल्पना करणें व्यर्थ आहे. शिवाय-)

अपि कुत्रापि चैतन्यं जगत्यस्मिन्न जायते ॥

देहे जाते पुमान् जात इत्येषा भ्रांतिधीर्नृणाम् ॥ २३० ॥

अर्थ—' अस्मिन् जगति चैतन्यं कुत्रापि न जायते-' या जगांत चैतन्य कोठेंही उत्पन्न होत नाहीं. ' देहे जाते पुमान् जातः इति एषा नृणां भ्रांतिधीः-' देह उत्पन्न झाला असतां 'पुरुष उत्पन्न झाला' अशी ही मनुष्यांना भ्रांतिबुद्धि होते. २३० ( शिवाय धात्वर्थाचें पर्यालोचन जरी केलें तरी आमचा दृष्टिसृष्टिपक्षच सिद्ध होतो, असें सिद्धान्ती सांगतात- )

प्रादुर्भावो जनेश्चार्थः स स्याद्दर्शनमेव हि ॥

प्रादुर्बभूव सवितेत्यादौ दर्शनमीरितम् ॥ २३१ ॥

अर्थ—' जनेः अर्थः प्रादुर्भावः । सः दर्शनं एव हि स्यात् । सविता प्रादुर्बभूव इत्यादौ दर्शनं ईरितम्-' ' जातः ' यांत ' जन् ' हा धातु आहे. प्रादुर्भाव-व्यक्त होणें, हा त्याचा अर्थ आहे. दर्शन हाच तो अर्थ आहे. कारण सूर्य प्रादुर्भूत झाला इत्यादि ठिकाणीं त्याचें दर्शनच सांगितलेलें आहे २३१. ( अहो पण जेव्हां जेव्हां आपण सृष्टीकडे पाहतों तेव्हां तेव्हां पुत्रादिकांची उत्पत्ति होते, असें म्हटल्यास प्रत्येक क्षणीं जातकर्मादि संस्कार करण्याचा प्रसंग येईल, म्हणून म्हणाल तर सांगतों-)

न चैवं जातकर्मादि प्रसज्येत क्षणे क्षणे ।

बालस्य यौवने कस्माद्भवतोऽपि न चापतेत् ॥ २३२ ॥

अर्थ—' एवं अपि क्षणे क्षणे जातकर्मादि न प्रसज्येत-' दृष्टि-

सृष्टिवाद जरी मानला तरी क्षणोक्षणीं जातकर्मादि संस्कार करण्याची प्रसक्ति होत नाहीं. ( कारण दृष्टिसृष्टिवादांत त्यांची भ्रांति होते असें म्हटल्यास— ) ' भवतः अपि बालस्य यौवने कस्मात् न भ्रान्तिः ' तुम्हांलाही बालकाला तारुण्याची भ्रांति झाली असतां त्यांची प्रांति कां होऊं नये ? ( बालशरीराहून तरुणाचें शरीर अगदीं भिन्न आहे, असें स्पष्ट भान होत असतांना तुम्ही आपला बाल पुत्र तरुण झाला असतां त्याचा जातकर्मादि संस्कार कां करीत नाहीं ? ) ३६२.

भवतोऽपि न चैकत्वं बालयौवनदेहयोः ।
देहभेदे हि तद्दृष्टं यथा ते तनयान्तरे ॥ ३६३ ॥

**अर्थ**—' बालयौवनदेहयोः एकत्वं भवतः अपि न च- ' बाल-शरीर व तरुणशरीर यांचें एकत्व तुम्हांलाही इष्ट नाहीं. ( तुम्हीही जें बालकाचें शरीर होतें तेंच तो तरुण झाल्यावरही राहतें, असें म्हणत नाहीं. ) ' देहभेदे हि तत् दृष्टं- ' आणि जर देहच पृथक् होत असेल तर संस्कार करणें अवश्य आहे. ( याला दृष्टान्त— ) ' यथा ते तनया-न्तरे- ' ज्याप्रमाणें तुला दुसरा पुत्र झाला असतां त्याचा तूं जातकर्म संस्कार करतोस त्याप्रमाणें बालपुत्राचें तरुणशरीर उत्पन्न झालें असतां त्या नूतनशरीराचा संस्कार तुलाही करणें भाग आहे ३६३. ( यावर कदाचित् तूं म्हणशील कीं बालशरीर व तरुणशरीर यांचा भेद नाहीं. तो एकच देह आहे, तर तें बरोबर नाहीं— )

अभेदो नैव युक्तोऽयं बालयौवनदेहयोः ।
विभिन्नपरिमाणादेर्दर्शनात्पटयोरिव ॥ ३६४ ॥

**अर्थ**—' बालयौवनदेहयोः अयं अभेदः नैव युक्तः । पटयोः इव विभिन्नपरिमाणादेः दर्शनात्- ' बालशरीर व यौवनदशेंतील शरीर यांचा अभेद—ऐक्य मानणें—ते दोन्ही देह एकच आहेत—लहानपणचें शरीर कोवळें वगैरे व तारुण्यांतील शरीर राठ वगैरे जरी दिसलें तरी तें एकच आहे, असें म्हणणें युक्त नाहीं. कारण लांब-आखुड वगैरे दोन पटांचें प्रमाण वगैरे जसें भिन्न असतें त्याप्रमाणें त्या दोन देहांचें भिन्न भिन्न प्रमाण स्पष्ट प्रतीत होतें. त्यामुळें त्यांचें ऐक्य मानणें युक्त नव्हे.

प्रत्यभिज्ञा च देहेऽस्मिन्स्वस्य स्वात्मन ऐक्यतः ॥
अपरस्य तु विश्वासात्तदीयादेव जायते ॥ ३३५ ॥

अर्थ—'अस्मिन् देहे च स्वस्य प्रत्यभिज्ञा स्वात्मनः ऐक्यतः भवति। अपरस्य तु तदीयात् एव विश्वासात् जायते-' या शरीराविषयीं 'तेंच हें शरीर' अशी स्वतःला जी ओळख पटते ती स्वात्म्याचा धर्म शरीराचे ठिकाणीं आरोपित केल्यामुळें—अभेदाध्यासामुळें पटते. ('शरीरच मी' असा हा आत्मा व अनात्मा यांचा अभेदाध्यास स्वाभाविक आहे. आत्मा एक आहे, ही गोष्ट वेदान्तशास्त्रप्रमाणें सिद्ध आहे. अध्यासामुळें आत्म्याचें एकत्व शरीराचे ठिकाणीं जीव अज्ञानामुळें मानतो, व बालपणचें आणि तरुणपणचें शरीर एकच आहे असें म्हणतो. ) पण दुसऱ्यालाही तीं दोन्हीं शरीरें एकच आहेत, याचें जें शरीर लहानपणीं होतें तेंच आतां या तरुणपणीं आहे, असें जें वाटतें तें त्या पाहणाऱ्याच्या विश्वासामुळेंच वाटतें, त्या दुसऱ्यालाही अध्यासामुळेंच तसा भ्रम होतो. (ज्याला स्वतःचें शरीरही दोन्ही अवस्थांमध्यें एकच आहे, असें वाटतें त्याला दुसऱ्याचें समान आकाराचें शरीर निराळें कसें वाटणार? अर्थात् हा याचा देह पूर्वदेहाहून निराळा नाहीं, अशा प्रकारच्या अभिमानामुळें तशी ओळख पटते ) ३३५. ( यावर आरंभवाद्याची शंका घेऊन समाधान करितात— )

आरंभकस्य चाभेदात्प्रत्यभिज्ञा न संभवेत् ॥
स्तंभयोरेकहेत्वोर्न प्रत्यभिज्ञास्ति कर्हिचित् ॥ ३३६ ॥

अर्थ—('तोच हा देह' अशी जी प्रत्यभिज्ञा—ओळख पटते ती अध्यासामुळें नव्हे तर कार्याचा आरंभक जो अवयवसंयोग तो एकरूप असल्यामुळें पटते,' असें 'संयोग नित्य आहे.' असें मानणारे कांहीं नैयायिक म्हणतात, पण—) 'आरंभकस्य अभेदात् प्रत्यभिज्ञा न संभवेत्-' आरंभक अवयवसंयोगाला एकत्व असल्यामुळें प्रत्यभिज्ञा संभवणार नाहीं. 'एकहेत्वोः स्तम्भयोः कर्हिचित् प्रत्यभिज्ञा नास्ति-' विटांचा संयोग हा हेतु ज्यांचा एक आहे अशा दोन स्तंभांची 'हाच तो खांब' अशी प्रत्यभिज्ञा होत नाहीं. ( किंवा श्लोकांतील 'आरंभक' हें पद 'कारण' या

अर्थी मानून 'शुक्र-शोणितादि कारण एक असल्यामुळें 'तेंच हें शरीर' अशी प्रत्यभिज्ञा होते' म्हणून म्हटल्यास काष्ठरूप किंवा पाषाणरूप कारण ज्यांचें एक आहे असें, म्ह० एकाच मोठ्या लाकडाचे किंवा पाषाणाचे दोन खांब पाहून 'तोच हा' अशी प्रत्यभिज्ञा व्हावयास पाहिजे. पण ती तशी केव्हांही होत नाहीं. ) २३६. ( 'अहोपण दृष्टिसृष्टिपक्षीं तरी 'तोच हा खांब' अशी प्रत्यभिज्ञा कशी होऊं शकते? कारण खांब जड असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं ऐक्याध्यास होऊं शकत नाहीं.' अशी आशंका घेऊन समाधान—)

न च स्तंभादिविषये नैषा स्यादुक्तहेतुतः ॥
विश्वासादात्मनस्तत्र संभवेद्देहवत्सदा ॥ २३७ ॥

अर्थ—'स्तंभादिविषये उक्तहेतुतः एषा न स्यात् इति न शंक्यं यतः आत्मनः विश्वासात् तत्र सदा देहवत् संभवेत्-' स्तंभादि जड पदार्थांचे ठिकाणीं आत्मैक्याध्यासरूप उक्त कारणामुळें 'तोच हा' अशी प्रत्यभिज्ञा होऊं शकणार नाहीं, अशी शंका घेऊं नये. कारण द्रष्टा जो आत्मा त्याच्या विश्वासामुळें त्या खांबाच्या विषयींही सदा देहाप्रमाणें प्रत्यभिज्ञा होऊं शकेल. ( ज्याप्रमाणें 'देवदत्ताचा बालपणीं जो देह होता तोच हा मोठेपणीं आहे,' अशी यज्ञदत्ताला प्रत्यभिज्ञा होते त्याप्रमाणें पाहणाऱ्या मनुष्याच्या विश्वासामुळें-अभेदामुळें तसाही अध्यास होऊं शकतो. ) २३७ ( बाल व तरुण यांच्या शरीरांमध्यें कारणाची अनुवृत्ति होते, असेंही तुम्हांला म्हणतां येणें शक्य नाहीं, असें सांगतात— )

कारणानुगमोऽप्येष बालयौवनदेहयोः ॥
को यतो नैव विद्येते ते उभे शुक्रशोणिते ॥ २३८ ॥

अर्थ—'बालयौवनदेहयोः कारणानुगमः अपि एषः कः। यतः ते उभे शुक्रशोणिते न विद्येते-' बाल्यावस्था व तारुण्यावस्था यांतील देहांमध्यें तुम्हांला अभिमत असलेल्या कारणाचा अनुगम—अनुवृत्ति कशी होणार? तीही संभवत नाहीं. कारण तुमच्या मतीं अंकुराची उत्पत्ति झाली असतां बीज नष्ट होतें. त्यामुळें शरीराचें कारण जें शुक्र व

शोणित, तें दोन्ही प्रकारचें कारण शरीर उत्पन्न होतांच नष्ट झालें आहे. ( बरें आमच्या सिद्धान्ताप्रमाणें बीजाद्यवच्छिन्न मायाशबल सत्पदवाच्य चैतन्य कारण आहे, म्हणून म्हणशील तर कल्पित स्वप्नपदार्थाप्रमाणें दृष्टिसृष्टिवादांतच त्याचें पर्यवसान होईल. कारण सत् जरी कारण असलें तरी त्यामुळेंच प्रत्यभिज्ञा होऊं शकणार नाहीं. कारण सतच प्रत्यभिज्ञेचें निमित्त मानल्यास सर्वत्र ऐक्यबुद्धि होईल ! ) ३३८ ( बरें, अवयवांची रचना हें कारण एक आहे. बाल्यावस्थेंतील शरीरावयवांची रचना व तारुण्यांतील त्यांची रचना यांत भेद नसतो, त्यामुळें ' तेंच हें ' अशी प्रत्यभिज्ञा होते, म्हणून म्हणाल तर त्यावेंही उत्तर— )

नैवावयवसंस्थानं कारणं दुर्भणत्वतः ।

न प्रत्यक्षा अवयवाः सूक्ष्मत्वाद्दृग्गताणुवत् ॥ ३३९ ॥

अर्थ—' अवयवसंस्थानं कारणं न एव दुर्भणत्वतः ' अवयवांचें संस्थान म्ह० एकप्रकारची रचना कारणच होऊं शकत नाहीं. कारण त्या रचनेचें निरूपणच करतां येत नाहीं. 'दृग्गताणुवत् अवयवाः सूक्ष्मत्वात् न प्रत्यक्षाः' चक्षुरिंद्रियाचे विषय होणारे म्ह० नजरेच्या आटोक्यांत आलेले अणु जसे प्रत्यक्ष दिसत नाहींत त्याप्रमाणें देहाचे अवयव—परमाणु अतिशय सूक्ष्म असल्यामुळें प्रत्यक्ष दिसूं शकत नाहींत. ( कारण तुम्हांला परमाणुच शरीराचे अवयव आहेत, असें मानणें भाग आहे; पण परमाणूंच्या [illegible] किंवा समवेतरूप द्व्यणुकादिकांचा, त्यांच्यामधील [illegible] यांचा पहिल्या अध्यायांत निरास केला आहे. आत्मपुराण अ. १ पृ. १२४-२९ पहा. ) ३३९. ( शिवाय परमाणूंना कारण मानणें युक्तही नाहीं, असें सांगतात— )

न चैतै रचितं किंचित्संस्थानमिह विद्यते ॥

तेषां जडबहुत्वाभ्यां रचनानुपपत्तितः ॥ ३४० ॥

अर्थ—' एतैः रचितं किंचित् संस्थानं इह न विद्यते ' या परमाणूंनीं रचलेलें कोणतेंही रचनायुक्त कार्य येथें विद्यमान नाहीं. कारण ' तेषां जडबहुत्वाभ्यां रचनानुपपत्तितः ' त्या परमाणूंना जडत्व आहे व बहुत्व आहे. त्यामुळें त्यांच्या रचनेची अनुपपत्ति आहे ३४०. (जड परमा-

पुन्हा आलोचन करितां येणें शक्य नाहीं. म्हणून त्यांची रचना दुष्कर आहे. बरें, त्यांना चेतन मानावें तर परमाणु अनंत–असंख्य असल्या-मुळें भिन्न भिन्न अभिप्रायानें युक्त असलेल्या त्यांना एकाच प्रकारची रचना करतां येणें शक्य नाहीं. बरें, शरीराच्या स्थूल अवयवांचें ग्रहण केलें तरी त्यांची रचना बाल्य व तारुण्य या अवस्थामध्यें समान नसते, असें सांगतात-- )

संस्थानमपि नैवैकं बालयौवनदेहयोः ॥

विद्यते तस्य चैकत्वे न स्यान्मानादिभेदधीः ॥ ३४१ ॥

अर्थ---' बालयौवनदेहयोः संस्थानमपि नैव एकं विद्यते-' बाल-देह व यौवनदशेंतील देह यांचें संस्थान–रचनाही एकच नसते. कारण ' तस्य च एकत्वे मानादिभेदधीः न स्यात्-' त्या रचनेला जर एकत्व असतें तर त्या दोन शरीरांचें प्रमाण, पराक्रम इत्यादिकांची भेदबुद्धि झाली नसती. ( बालशरीर लहान, कोमल, तरुणशरीर मोठें, राकट इत्यादि भेद स्पष्ट प्रत्ययास येतो. त्याचप्रमाणें बालशरीर निर्बळ असतें, तरुणशरीर बळकट असतें. त्यामुळें बालशरीर व तरुणशरीर यांचे अवयव एकच आहेत, असें म्हणतां येत नाहीं ) ३४१. ( अवयवांची वृद्धि किंवा क्षय झाला असतां तीच रचना रहात नाहीं, असें सांगतात-)

माषराशेर्हि माषाणां निर्गमेऽपि समागमे ॥

संस्थानस्यैकतां नैव मन्यन्ते स्थलरक्षकाः ॥ ३४२ ॥

अर्थ---' माषराशेः माषाणां निर्गमे अपि समागमे स्थलरक्षकाः संस्थानस्य एकतां नैव मन्यन्ते हि-' उडदांच्या राशींतून उडीद कोणी काढून घेतले असतां किंवा त्यांत आणखीं उडीद आणून घातले असतां उडिदांचें स्थळ राखणारे लोक त्या राशीची रचना एकच आहे, असें मानीत नाहींत, हे प्रसिद्ध आहे ३४२. ( तात्पर्य-- )

युवदेहजनौ यद्वत्संस्कृतिर्नैव ते भवेत् ॥

एवं मे दर्शनाज्जाते पुत्रादौ नैव संस्क्रिया ॥ ३४३ ॥

अर्थ---' युवदेहजनौ यद्वत् ते संस्कृतिः नैव भवेत्, एवं दर्शनात् पुत्रादौ जाते मे संस्क्रिया नैव-' तरुण पुत्रांच्या देहाची उत्पत्ति झाली

असतां त्याप्रमाणें तूं जातकर्म करीस नाहींस त्याप्रमाणें दर्शनामुळें पुत्रादि उत्पन्न झाले असतां मलाही संस्कार करावा लागत नाहीं २४३. (वादी आपल्याला संस्कार न करण्याचें कारण सांगतो व सिद्धान्ती आपल्यालाही तोच न्याय लागू आहे, असें सांगतात— )

जातोऽयमितिधीस्तत्र यौवने चेन्न विद्यते ॥
सममत्रापि दृष्टेषु पुत्रादिषु न साऽस्ति यत् ॥ २४४ ॥

अर्थ—' तत्र यौवने ' अयं जातः ' इति धीः न विद्यते इति चेत् अत्रापि समम् । यत् पुत्रादिषु दृष्टेषु सा न अस्ति-' वरें ' जेव्हां बाल्यावस्था संपून तारुण्यदशा प्राप्त होते तेव्हां ' हा उत्पन्न झाला ' अशी बुद्धि होत नाहीं, म्हणून आम्हांला त्यावेळीं संस्कार करावा लागत नाहीं, ' म्हणून म्हणाल तर आमच्या पक्षींही तें तसेंच आहे. कारण पुत्रादिकांना पाहिलें असतां ' हा झाला ' अशी बुद्धि होत नाहीं २४४. (हाच न्याय अदर्शनात्मक मरणालाही लागू आहे. असें सांगतात— )

अदर्शनेऽपि मरणे वह्निदाहादि नापतेत् ॥
यथा बालशरीरस्य भवतो यौवने न हि ॥ २४५ ॥

अर्थ—' अदर्शने अपि मरणे वह्निदाहादि न आपतेत् । यथा बालशरीरस्य यौवने भवतः न हि- ' पुत्रादिकांविषयींची दृष्टि नष्ट होणें हेंच एकप्रकारचें मरण आहे, म्हणून तें अदर्शनरूप मरण झालें असतां पुत्रादिकांच्या अग्निदाहादि अन्त्यक्रियेचीही प्राप्ति होत नाहीं. (यालाही तुमचेंच उदाहरण—) जसें, बालशरीराला तारुण्यदशा प्राप्त झाली असतां तुम्ही बालशरीराचें अग्नींत दहन करीत नाहीं त्याप्रमाणेंच हें समजावें २४५. (हें साम्यच दोन श्लोकांनीं स्पष्ट करितात— )

न दृश्यते यथा बालशरीरं यौवने सति ॥ तथैव च बहिष्ठत्वे पुत्रादिर्नैव दृश्यते ॥ २४६ ॥ अथैकबुद्धिरत्रास्ति पुत्रादौ सा समा तव ॥ बालयौवनदेहेऽपि विना मानसमाग्रहम् ॥ २४७ ॥

अर्थ—' यथा यौवने सति बालशरीरं नैव दृश्यते तथैव च बहिष्ठत्वे सति पुत्रादिः नैव दृश्यते । अथ अत्र पुत्रादौ एकबुद्धिः अस्ति सा बाल-

यौवनदेहे अपि मानसं आग्रहं विना तव समा-' ज्याप्रमाणें तारुण्य दशा प्राप्त झाली असतां बालशरीर दिसत नाहीं त्याचप्रमाणें पुत्रादिक बाहेर कोठें गेले असतां दिसत नाहींत. ( कारण अदर्शनच नाश आहे. 'नश्-अदर्शने' असा पाणिनीचा धातुपाठ आहे. ) बरें, या बाहेर गेलेल्या पुत्रादिकांच्या ठिकाणीं 'तोच हा' अशी एकत्व बुद्धि आहे, म्हणून म्हणावें तर बालयौवनदेहांमध्येंही तुझी ती बुद्धि मनांतील दुराग्रह सोडल्यास तशीच आहे. ( त्यामुळेंही दोन्ही प्रसंगीं दाहादिकांची प्राप्ति नाहीं. त्याच न्यायानें शोकप्रसंगही येत नाहीं, असें सांगतात— )

बालदेहे गते यद्वत् शोकः स्वस्य परस्य न ॥
अदर्शनेन मरणे पुत्रादेरपि वै तथा ॥ २४८ ॥

**अर्थ**—' यद्वत् बालदेहे गते स्वस्य परस्य शोकः न, तथा अदर्शनेन पुत्रादेः मरणे अपि न वै.' ज्याप्रमाणें बालशरीर गेलें असतां व तरुणशरीर प्राप्त झालें असतां स्वतः त्याला किंवा त्याच्या मातापितरांना शोक होत नाहीं कारण 'तोच हा' असा अभिमान असतो, त्याप्रमाणें अदर्शनानें पुत्रादिकांना मरण आलें असतां तसा अभिमान विद्यमान असल्यामुळें शोक होत नाहीं. २४८ ( 'अहो पण अदर्शनालाच मरण म्हटल्यास 'आम्ही मेलों नाहीं' या त्यांच्याच वचनाशीं विरोध येतो,' अशी शंका घेऊन समाधान— )

न मृता वयमित्येवं यदि ते दर्शने पुनः ॥
वदन्ति तर्हि देहोऽपि यून एवं वदत्ययम् ॥ २४९ ॥

**अर्थ**—' यदि ते पुनः दर्शने 'वयं न मृताः' इति वदन्ति तर्हि अयं यूनः देहः अपि एवं वदति.' जर ते पुत्रादिक त्यांचें पुनरपि दर्शन झालें असतां 'आम्ही मेलों नाहीं, जिवंत आहों' असें म्हणतात, त्यामुळें अदर्शनानें पुत्रादिकांचा नाश होतो, या सिद्धान्ताशीं विरोध येतो म्हणून म्हणशील तर तरुणाचा देह प्राप्त झाला असतां व बालदेह गेला असतांही हा पुरुष 'मी गेलों नाहीं,' असें म्हणतोच. ( पण तेवढ्यावरून बालदेह निवृत्त झाला नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. आतां बाल व तरुण देह भिन्न आहेत हें न कळणें, या दोषामुळें तो

मी मेलों नाहीं असें म्हणतो, म्हणून म्हणशील तर अदर्शनानें नाश पावलेल्या पुत्रादिकांचें वरील वाक्यही तसेंच अज्ञानजन्य असल्यामुळें अप्रमाण आहे, असें समज. ) ३४९ (आणि—)

अन्यथा परिमाणादिभेदाद्देहे स्फुटापदि ॥
कालभेदे हि पुत्रादौ केनासौ विनिवार्यते ॥ ३५० ॥

अर्थ—' अन्यथा स्फुटापदि देहे कालभेदे हि परिमाणादिभेदात् पुत्रादौ असौ केन विनिवार्यते-' अशा प्रकारचा अज्ञानरूप दोष जर न मानला तर ज्यांत रोगादि आपत्ति स्पष्ट आहेत अशा देहांत कालभेदामुळें परिमाणादिकांचा भेद पडणें अवश्य असल्यामुळें पुत्रादिकांविषयींचा शोक किंवा अदर्शनानें त्यांचा नाश झाला ही बुद्धि, यांचें निवारण कोणाला करितां येणार आहे ? (कोणालाच करितां येणें शक्य नाहीं. कारण शरीरांत प्रतिक्षणीं परिणाम होणें अपरिहार्य आहे व तो झाल्यानंतर कालांतरीं पाहिलेला व पूर्वींचा देह एकच आहे, असें कोणालाही म्हणतां येणें शक्य नाहीं ) ३५०. ( भेद आहे पण भेदबुद्धि दोषानें प्रतिबद्ध झालेली आहे, असें दृष्टान्त व दार्ष्टान्तिक या दोन्हींमध्यें दाखवितात— )

कालभेदे न चाभेदो युववालशरीरयोः ॥ भवेत्तद्वद्धि पुत्रादौ पूर्वोत्तरविबोधयोः ॥ ३५१ ॥ बालदेहे गते यद्वन्मृतधीनैव जायते ॥ अदर्शनेऽपि पुत्रादेर्मृतधीस्तद्वदेव न ॥ ३५२ ॥

अर्थ—' यथा तव मते कालभेदे सति युववालशरीरयोः अभेदः न भवेत् तद्वत् हि मम मते पूर्वोत्तरविबोधयोः पुत्रादौ अभेदः न-' ज्याप्रमाणें तुझ्या मतीं कालभेद असतां युव-बालशरीरांचा अभेद नाहीं, तर भूतकालीन बाल्यदशेंतील बालदेह निराळा, वर्तमानकालचा तरुण देह निराळा, असें तूं मानतोस त्याचप्रमाणें माझ्या मतीं पूर्वकालीन पुत्रादिकांचें ज्ञान व उत्तरकालीन पुत्रादिकांचें ज्ञान यांमध्यें त्यांचें ऐक्य नाहीं. तर कालभेदामुळें पुत्रादिकांचाही भेद आहे. ३५१ ' बालदेहे गते यद्वत् मृतधीः न एव जायते-' बालपणाचा देह गेला असतां ज्याप्रमाणें वर सांगितलेल्या अज्ञानरूप दोषामुळें तो मेला आहे, अशी तुझी बुद्धि होत नाहीं ' तद्वदेव पुत्रादेः अदर्शने अपि मृतधीः न एव-' त्या-

प्रमाणेंच पुत्रादिकांचें अदर्शन झालें असतांही ते मृत झाले अशी बुद्धि होत नाहींच. ३५२ ( दृष्टिसृष्टीविषयीं बाकीचीं उदाहरणें राहूं देत. प्रत्यक्ष जन्म व मरण हेंच त्याचें उत्कृष्ट उदाहरण आहे, असें सांगतात— )

अपि लोके जनिमृती प्रसिद्धे ये हि देहिनाम् ॥

तेऽपि विज्ञानमात्रेण प्रसिद्धे नान्यकारणात् ॥ ३५३ ॥

अर्थ—' ये लोके देहिनां प्रसिद्धे जनिमृती ते अपि विज्ञानमात्रेण प्रसिद्धे न अन्यकारणात्-' जें या लोकीं सर्व देहवानांचें प्रसिद्ध असलेलें जन्म व मरण तेंही केवल विज्ञानानेंच प्रसिद्ध आहे. ज्ञानावाचून दुसऱ्या, कोणत्याही कारणानें त्यांचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं. ३५३ (तें कसें, तेंच स्पष्ट करितात— )

जातं वापि मृतं वापि यावज्जानाति नैव हि ॥ तावद्वर्षशतै-र्वापि हर्षशोकौ न गच्छति ॥ ३५४ ॥ स्वयमप्येवमेवायं सुखदुःखे समाप्नुयात् ॥ अविज्ञाते तयोर्नैव स्यातां ते कस्य-चित्क्वचित् ॥ ३५५ ॥

अर्थ—' जातं वा मृतं वा अपि यावत् नैव जानाति तावत् वर्ष-शतैः वा अपि हर्षशोकौ न गच्छति-' उत्पन्न झालेल्या किंवा मेलेल्या पुत्रादिकाला पुरुष जोंवर जाणत नाहीं तोंवर तो शतवर्षांनीही हर्ष किंवा शोक यांस प्राप्त होत नाहीं. ( परदेशीं गेलेल्या पुरुषाला पुत्र झाला. पण बरींच वर्षें परदेशीं राहिलेल्या त्याला ती वार्ता कळली नाहीं, तर त्याला पुत्रजन्माचा हर्ष होत नाहीं. त्याचप्रमाणें दूरदेशीं गेलेला पुत्र मेला, पण पित्याला ती वार्ता बरींच वर्षें कळली नाहीं, तर त्याला त्याचा शोकही होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. ) ३५४ ' अयं जनः स्वयं अपि यत् सुखदुःखे समाप्नुयात् तदपि एवमेव-' ह्या जनाला स्वतःही जें जन्म-मरणांचें सुखदुःख होतें तेंही असेंच म्हणजे दुसऱ्याच्या सांगण्या-वरून त्यांचें ज्ञान झाल्यामुळेंच होतें. कारण ' तयोः अविज्ञाने ते कस्य-चित् क्वचित् न स्याताम्-' त्या दोघांचें—जन्ममरणांचें अज्ञान असतां, त्यांचें ज्ञान नसल्यास तत्प्रयुक्त सुखदुःख कोणालाही केव्हांही होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. ३५५ ( शिवाय— )

अप्येते स्वस्य न स्यातां प्रत्यक्षे प्राणिनः क्वचित् ॥ किं तु मात्रादिवचनादनुमानात्तयोर्हि धीः ॥ २५६ ॥ को हि योने-र्विनिर्याणे मूर्छां प्राप्तः शरीरभाक् ॥ योनिनिर्गमनं स्वस्य प्रत्यक्षीकर्तुमर्हति ॥ २५७ ॥ एवं विशेषविज्ञानविलोपे प्राण-निर्गमे ॥ को नाम मरणं स्वस्य प्रत्यक्षेणावगच्छति ॥२५८॥ अतः शब्दादिविज्ञानाद्बुद्धे जनिमृती यथा ॥ तद्वच्छास्त्रस्य विज्ञानाद्दर्शनादर्शने स्थिते ॥ २५९ ॥

अर्थ—' एते अपि प्राणिनः स्वस्य प्रत्यक्षे क्वचित् न स्याताम् । किंतु मात्रादिवचनात् अनुमानात् तयोः धीः हि-' तें जन्ममरणप्रयुक्त सुखदुःखही कोणत्याही प्राण्याला स्वतःच प्रत्यक्ष केव्हांही दिसणें शक्य नाहीं. ( कारण त्या प्रसंगीं प्राणी मूर्च्छावश झालेला असतो. ) तर आई-बाप इत्यादिकांच्या सांगण्यावरून व अनुमानादिकांच्या योगानें त्याला त्या सुखदुःखांचें ज्ञान होतें. २५६ ( आतां प्रत्यक्ष ज्ञानाचा असंभव कसा तो पहा— ) ' योनेः विनिर्याणे मूर्च्छां प्राप्तः कः हि शरीर-भाक् स्वस्य योनिनिर्गमनं प्रत्यक्षीकर्तुं अर्हति-' योनींतून विशेषतः बाहेर निघावयाच्या वेळीं मूर्च्छेस प्राप्त झालेला कोणता प्राणी—शरीरी आपलें योनींतून बाहेर पडणें प्रत्यक्ष जाणण्यास समर्थ आहे ? ( योनीनिर्गमन त्यावेळीं प्रत्यक्ष जाणण्यास कोणी समर्थ नाहीं ) २५७. ' एवं प्राण-निर्गमे विशेषविज्ञानविलोपे सति कः नाम स्वस्य मरणं प्रत्यक्षेण अव-गच्छति-' त्याचप्रमाणें शरीरांतून प्राण निघून जाण्याच्या वेळीं विशेषा-कार विज्ञानांचा लोप झाला असतां कोण बरें स्वतःचें मरण प्रत्यक्ष जाणणार ? ( कोणालाही त्याचें प्रत्यक्ष ज्ञान होणें शक्य नाहीं ) २५८. ' अतः शब्दादिविज्ञानात् जनिमृती यथा बुद्धे तद्वत् शास्त्रस्य विज्ञानात् दर्शनादर्शने स्थिते-' याप्रमाणें स्वप्रत्यक्षाचा असंभव असल्यामुळें शब्दादि-विज्ञानरूप प्रमाणावरून जन्म व मरण जसें ज्ञात होतें त्याप्रमाणें शास्त्राच्या विज्ञानावरून दर्शन व अदर्शन सिद्ध होतें. ( आम्ही हल्लीं ज्या श्रुतिवचनाचें व्याख्यान करीत आहों तिच्या विज्ञानावरून दर्शनानें जन्म व अदर्शनानें मरण सिद्ध होतें ) २५९. ( ' अहो पण या दृष्टि-

सृष्टीविषयींच्या उपपत्ति तुम्ही बाह्य विषयांमध्येंच कां दाखविता ? इंद्रियें व देवता यांविषयीं त्या कां दाखवीत नाहीं ?' याचें उत्तर— )

प्रत्यभिज्ञा च नैवास्ति करणग्रामसंश्रया ॥ तदेव चक्षुरेतर्हि यथासीन्मामकेंद्रियम् ॥ एवं न कस्यचिद्बुद्धिरिंद्रियेषूपलभ्यते ॥ ३६० ॥ अपि प्रत्यक्षता नास्ति सदैवेंद्रियसंश्रया ॥ प्रत्यभिज्ञा कुतस्तत्र यतः प्रत्यक्षगा हि सा ॥ ३६१ ॥ इंद्रियाणामधिष्ठात्र्यो वह्न्याद्या अपि देवताः ॥ प्रत्यक्षा न यतस्तेन तासामिंद्रियतुल्यता ॥ ३६२ ॥ विषया लोकशब्देन कथितास्ते सुतादयः ॥ दर्शनादर्शने तेषां जन्मनाशौ समीरिते ॥

अर्थ—' करणग्रामसंश्रया प्रत्यभिज्ञा न एव अस्ति-' इंद्रियसमूहाविषयींची प्रत्यभिज्ञा असतच नाहीं. कारण ' मामकेंद्रियं चक्षुः यथा पूर्वं आसीत् तदेव एतर्हि वर्तते इत्येवं बुद्धिः इंद्रियेषु न कस्यचित् उपलभ्यते.' माझें इंद्रिय—चक्षु जसें पूर्वीं होतें तसेंच तें आतां आहे, अशाप्रकारची बुद्धि इंद्रियांविषयीं कोणाच्या ठिकाणींही उपलब्ध होत नाहीं ३६० (कारण) 'इंद्रियसंश्रया प्रत्यक्षता अपि नास्ति-' इंद्रियनिष्ठ प्रत्यक्षताही नाहीं मग 'तत्र प्रत्यभिज्ञा कुतः-' इंद्रियांविषयींची प्रत्यभिज्ञा कोठून संभवणार ? ' यतः सा प्रत्यक्षगा हि-' कारण ती—प्रत्यभिज्ञा—ओळख प्रत्यक्ष वस्तूविषयींच संभवते. ( जी वस्तु प्रत्यक्ष ज्ञानाचा विषय होते तिचीच प्रत्यभिज्ञा—ओळख संभवते. इंद्रियें सूक्ष्म—अतींद्रिय आहेत. त्यामुळें त्यांची संस्कारसहकृतइंद्रियजन्यज्ञानरूप प्रत्यभिज्ञा संभवत नाहीं. एकादी वस्तु पूर्वीं प्रत्यक्ष पाहिलेली असावी. त्या ज्ञानाचे संस्कार जागे होऊन त्याचवेळीं तीच वस्तु पुनः प्रत्यक्ष दिसावी. म्हणजे ' तीच ही ' असें जें ज्ञान होतें तो प्रत्यभिज्ञा होय. अर्थात् तिचा विषय प्रत्यक्ष ज्ञानाला योग्य असाच असला पाहिजे. इंद्रियें अतींद्रिय आहेत. त्यामुळें तीं प्रत्यक्ष ज्ञानाला योग्य नाहींत. म्हणून त्यांच्याविषयींची ' तेंच हें ' अशी प्रत्यभिज्ञा संभवत नाहीं. ) ३६१. ( देवांची प्रत्यभिज्ञाही याच कारणामुळें संभवत नाहीं, असें सांगतात- ) ' यतः इंद्रियाणां अधिष्ठात्र्यः वह्न्याद्याः देवताः अपि प्रत्यक्षाः न । तेन तासां

इंद्रियतुल्यता.' ज्या अर्थी इंद्रियांच्या अधिष्ठात्री अग्न्यादि देवताही प्रत्यक्ष नाहींत त्याअर्थी त्यांना इंद्रियतुल्यता आहे. ( इंद्रियांप्रमाणें त्यांचीही प्रत्यभिज्ञा संभवत नाहीं. ) २६२. 'विषयाः लोकशब्देन कथिताः । ते तु सुतादयः । तेषां दर्शनादर्शनें जन्मनाशौ समीरितौ ' विषयच श्रुतींतील लोकशब्दानें सांगितले आहेत. ते विषय पुत्रादिक आहेत, असेंही प्रदर्शित केलें आहे. त्यांचें दर्शन हा जन्म व अदर्शन हें मरण सांगितलेलें आहे २६३. ( श्रुतींत लोकशब्दाचा प्रयोग करून 'जो जें पाहतो तो तें करतो ' असें सुचविलें आहे. त्यामुळें सृष्टींतील प्रत्येक जड वस्तु ही दृष्टिसृष्टि आहे, असें श्रुतीलाही अभिमत आहे. इंद्रियें जरी आपल्याला परोक्ष असली तरी त्यांच्या त्यांच्या अभिमानी देवतांना तीं प्रत्यक्षच असतात, त्यामुळें त्यांचीही दृष्टिसृष्टि उपपन्न होते. सर्व भौतिक वस्तूंचा हाच न्याय सर्व भूतांनाही लागू आहे, असें सांगतात— )

भौतिकं यद्वदेवेदं जायते च विनश्यति ॥

भूतपंचकमप्येवं जडत्वादात्मभेदतः ॥ २६४ ॥

**अर्थ**—' यद्वदेव इदं भौतिकं जायते च विनश्यति एवं भूतपंचकं अपि जडत्वात् आत्मभेदतः दर्शनादर्शनयोः जन्मविनाशप्रतियोगि.' जसें हें भौतिक दर्शनानें उत्पन्न होतें व अदर्शनानें विनाश पावतें त्याप्रमाणें हें भूतपंचकही जड असल्यामुळें व अनात्मत्वामुळें दर्शन व अदर्शन या निमित्तानें जन्म विनाश पावणारें आहे. ( ' अहो पण सर्व भूत-भौतिकांना दर्शनादर्शनानें उत्पन्न होऊन विनाश पावणारीं मानल्यास जीव, ईश, शुद्ध चित्, जीव व ईश यांचा विभाग, अविद्या आणि अविद्या व चित् यांचा संबंध, असे सहा पदार्थ जे तुम्ही अनादि मानले आहेत त्यांच्याशीं विरोध येतो. ' म्हणून म्हणाल तर सांगतों—या सर्व अनादि पदार्थांमध्येंही जेवढा अज्ञांश आहे तेवढा कल्पित आहे. तो हा प्रतिभास असेपर्यंत राहणारा आहे. हा प्रतिभासही अनादि आहे. त्यामुळेंच या सहा पदार्थांना अनादित्व आहे, असें आम्ही मानलेलें आहे. सर्व उपाधींमध्यें चैतन्य एक आहे, व त्या चैतन्याच्या सत्तेनेंच सर्वांना सत्ता

प्राप्त होते, असें शेवटीं ठरतें. त्यामुळें दृष्टिसृष्टिवादाशीं कांहीं विरोध येत नाहीं. ) ३६४.

प्रत्यभिज्ञापि सर्वत्र देहवत्प्रागुदाहृता ॥
न संस्थानं नावयवा अस्याः कारणमित्यपि ॥ ३६५ ॥

**अर्थ**—' सर्वत्र प्रत्यभिज्ञा अपि देहवत् प्रागुदाहृता-' सर्वांविषयींची प्रत्यभिज्ञाही देहाप्रमाणें पूर्वी उपपादिली आहे.[ म्ह० तीच ही पृथ्वी, तेंच हें आकाश इत्यादि जी ओळख पटते तीही कालभेदामुळें अवश्य झालेल्या भेदाचें ज्ञान नसल्यामुळें भ्रामक आहे. ] ' अस्याः संस्थानं अवयवाः वा न कारणं इत्यपि प्राक् उदाहृतं-' या प्रत्यभिज्ञेचें पदार्थांची रचना किंवा अवयवही कारण नव्हे, याचेंही वर उपपादन केलें आहे. ३६५ ( कर्म या सर्वांचें कारण आहे, असें उपपादन— )

न च नीरविनाशे स्यात्तेजसस्तत्र वै जनिः ।
पुंसो बाल्यविनाशे किं युवा वा न भवेद्भवान् ॥
कर्म तत्र निमित्तं चेदत्रापि समं मम ॥ ३६६ ॥

**अर्थ**—' नीरविनाशे तत्र तेजसः जनिः न स्यात्-' दृष्टिसृष्टिमतांत अदर्शन हाच नाश असल्यामुळें तळ्यांतील न दिसलेलें पाणी नाश पावतें. पण त्या-जल नष्ट झालेल्या प्रदेशीं जलाच्या विरोधी तेजाची उत्पत्ति होईल, अशी शंका घेऊं नये. ( कारण जेथें जेथें जलाचा अभाव होतो तेथें तेथें तेजाची उत्पत्ति नियमानें होतेच असें नाहीं. कारण— ) ' पुंसः बाल्यविनाशे भवान् युवा वा किं न भवेत्-' एकाद्या पुरुषाच्या बाल्यावस्थेचा नाश झाला असतां त्याच्या विरुद्ध असलेलें जें तारुण्य तें तुझ्या ठिकाणीं कां उत्पन्न होत नाहीं ? ( कारण त्याच्या बाल्याचा नाश तुझ्या ठिकाणीं झाला; तुला कळला. तेव्हां जेथें जलाचा नाश तेथें तेजाची उत्पत्ति व्हावी, म्हणून जसें म्हणतोस त्याचप्रमाणें जेथें बाल्याचा नाश तेथेंच तारुण्याची उत्पत्ति व्हावयास पाहिजे, असा भावार्थ. ) बरें, ' तत्र कर्म निमित्तं चेत् अत्रापि मम तत् समं-' यौवन-सृष्टीमध्यें कर्म निमित्त आहे म्हणून म्हणशील तर मींही कर्माचें निमित्तत्व

स्वीकारलेंच आहे. ( कर्माचा आश्रय करून उत्पत्ति-विनाशांची व्यवस्था तुजप्रमाणें मलाही लावतां येणें शक्य आहे.) २६६ (यावर वादीची शंका— )

महाभूतजनौ नैव कर्म कारणमिष्यते ॥
भवतोऽप्येतदप्यात्माऽज्ञानमाविष्कृतं त्वया ॥ २६७ ॥

अर्थ—' भवतः अपि महाभूतजनौ कर्म कारणं न एव इष्यते- ' दृष्टिसृष्टिवाद्याच्या मतीं महाभूतांच्या उत्पत्तीचें कारण कर्म आहे असें मानलेलें नाहीं. ( सिद्धान्ती या शंकेचें उत्तर देतो— ) ' त्वया एतदपि आत्माज्ञानं आविष्कृतं- ' तूं हेंही आपलें अज्ञान प्रकट केलें आहेस. ( वाद्यानें श्रुति-स्मृति-न्यायसिद्ध अर्थ न जाणतांच शंका कशी केली, तें प्रकट करितात— )

यतो हि जगतो योनिः प्राणात्मा कर्मवासितः ॥ भूतभौतिकजातं हि सृजत्यत्ति च सर्वदा ॥ २६८ ॥ संसारस्य न कस्यापि प्राथम्यमिह विद्यते ॥ अनादित्वान्न चाप्यन्तो विना मोक्षेण विद्यते ॥ २६९ ॥ कर्मकारणपक्षे हि मायाया व्यर्थता न हि ॥ कर्मणोऽपि विना मायां निवृत्तिर्नोपपद्यते ॥ २७० ॥ इदं कर्म कुतोऽस्यैव शरीरस्य सुखस्य च ॥ कारणं न परस्येति नास्ति चोद्यप्रतिक्रिया ॥ २७१ ॥ न जानामीति मायाया वाक्यं शक्यनिवारणम् ॥ हित्वा तस्मादियं माया सर्वा दुर्घटकारिणी ॥ २७२ ॥

अर्थ—'यतः हि । जगतः योनिः ( अभिन्ननिमित्तोपादानं ) प्राणात्मा कर्मवासितः भूतभौतिकजातं सर्वदा सृजति अत्ति च-' कारण ही गोष्ट श्रुत्यादि प्रमाणांनीं सिद्ध आहे. ( ही कोणती तें सांगतात— ) जगाची योनि—अभिन्ननिमित्तोपादान प्राणात्मा आहे. तो कर्मांनीं वासित होऊन भूत व भौतिकवर्ग सर्वदा उत्पन्न करतो व खातो. ( तो कर्मसापेक्षच सृष्टीला उत्पन्न करतो व तिचा नाश करतो ) २६८. ( 'अहो पण कर्म प्रत्येक जन्य पदार्थाचें कारण होऊं शकत नाहीं. कारण अगदीं पहिल्या सृष्टींत कर्म, या निमित्ताचा असंभव असतो ' या शंकेचें समा-

धान--) 'कस्यापि संसारस्य इह प्राथम्यं न विद्यते । अनादित्वात् । मोक्षेण विना अन्तः अपि न विद्यते-' कोणत्याही संसाराला येथें प्रथमत्व नाहीं. कारण संसार अनादि आहे. मोक्षावाचून त्याचा अंतही होत नाहीं. (त्यामुळें पूर्व पूर्व कर्माच्या निमित्तानें पुढची पुढची सृष्टि होते, असा भावार्थ.) ३६९. (अहो पण मग मायेचा स्वीकार करण्याचें कांहींच कारण नाहीं. कारण कर्माच्या योगानेंच सर्व निर्वाह होऊं शकतो, म्हणून म्हणाल तर सांगतों--) 'कर्मकारणपक्षे हि मायायाः व्यर्थता न हि-' वर सांगितल्याप्रमाणें कर्म सृष्टीचें कारण आहे, असें जरी मानलें तरी मायेला व्यर्थता येत नाहीं. कारण 'मायां विना कर्मणः अपि नियतिः न उपपद्यते-' मायेवाचून कर्माची व्यवस्थाही उपपन्न होत नाहीं ३७०. 'इदं कर्म अस्य एव शरीरस्य च सुखस्य कारणं कुतः परस्य कुतः न इति चोद्यप्रतिक्रिया नास्ति-' हें कर्म याच शरीराचें व याच सुखाचें कारण कां, दुसऱ्याचें कां नाहीं अशा या प्रश्नाचें समाधान-कारक उत्तर देतां येत नाहीं ३७१. 'न जानामि इति मायायाः वाचकं शब्दबोधकं हित्वा प्रतिक्रिया नास्ति । तस्मात् इयं दुर्घटकारिणी माया सार्थी-' मला माहीत नाहीं, असा मायेचा वाचक शब्दप्रयोग सोडून त्याचें दुसरें उत्तर नाहीं. तस्मात् ही दुर्घट कार्यही करणारी माया सार्थ आहे. व्यर्थ नाहीं ३७२. (मायेचें दुर्घट कार्यकारित्वच स्पष्ट करण्यासाठीं एक दुर्घट कार्य दाखवितात-- )

स्वभावाद्या हि ये पक्षास्तान्सर्वानत्ति सर्वदा ॥
कुतो राक्षसराजोऽयं विना त्वां जननीमिमाम् ॥ ३७३ ॥

अर्थ---' स्वभावाद्याः हि ये पक्षाः तान् सर्वान् अयं खंडनतर्करूपः राक्षसराजः त्वां इमां जननीं विना कुतः अत्ति-' स्वभावतः ही सृष्टि होते, काळाच्या प्रभावानेंच सृष्टीचा उदय होतो, इत्यादि जे चार्वाका-दिकांचे पक्ष त्या सर्वांना हा खंडनतर्करूप राक्षसराज आपल्या या मायाजननीवाचून--तिच्या साह्यावाचून कसा खाणार ? ( मायाजन-नीच्या साह्यानेंच तो त्या सर्व पक्षांना खातो, असा भावार्थ-ज्ञानी आस्ति-कांच्या मताचें खंडन करणें अशक्य आहे. म्हणून अज्ञानामुळें उत्पन्न

झालेल्या चार्वाकादिकांच्या मतांचें खंडन करावयाच्या वेळीं खंडनतर्करूप राक्षसाची व त्या खंडनीय मतांची जननी जी माया ती चार्वाकादिकांच्या चित्तांत ' मी जाणत नाहीं ' या रूपानें प्रादुर्भूत होते व तशा प्रादुर्भावरूप करानें—हातानें चार्वाकादि मतें जणुकाय धरून आपला लाडका धाकटा पुत्र जो खंडनतर्करूप राक्षसराज त्याला त्यांचा खाऊन देते. मायेचें हें खंडनजयसंपादनरूप दुर्घट कर्म पहा. चार्वाकादिकांचीं मतें अज्ञानमूलक आहेत या विषयीं ' या वेदबाह्याः स्मृतयो याश्च तासां प्रवृत्तयः । सर्वास्ता निष्फलाः प्रेत्य तमोमूला हि ताः स्मृताः-' ही स्मृति प्रमाण आहे. ज्या वेदबाह्य स्मृति आहेत व ज्या त्यांच्या प्रवृत्ति आहेत त्या सर्व परलोकीं निष्फल आहेत. त्या तमोमूलक म्हटलेल्या आहेत. ) ३७३. ( परमतखंडन करण्याच्या वेळीं स्वरक्षणरूप दुर्घटकार्यही माया करते, असें सांगतात—)

दुर्घटत्वमपि स्वस्य धर्मभूतं न लक्षयेत् ॥
कुतो राक्षसराजस्य स्पर्धा नास्यै हि विद्यते ॥ ३७४ ॥

अर्थ—' स्वस्य धर्मभूतं दुर्घटत्वं अपि न लक्षयेत्-' ती मायाजननी आपलें धर्मभूत दुर्घटत्वही खंडनतर्करूप राक्षसराजाला दाखवीत नाहीं. तर तें त्याच्यापासूनही गुप्त ठेवते. ' हि राक्षसराजस्य स्पर्धा अस्यै कुतः न विद्यते-' कारण राक्षसराजाची स्पर्धा हिच्याशींच कशी नाहींशी होईल. ( सर्वांशीं स्पर्धा करणें हेंच या राक्षसाचें शील असल्यामुळें मायेनें आपलें दुर्घटकारित्व जर याला दाखविलें तर तो त्यालाही खाऊन टाकील. कारण स्वकुलाला भक्षण करणें हें राक्षसांचें कर्तव्यच आहे. ) ३७४ ( अहो पण ' मी जाणत नाहीं ' या म्हणण्याला इतकें महत्त्व देऊन त्यावरून मायेची सिद्धि करणें उचित नाहीं. कारण तें वाक्य निरर्थक असल्यामुळें तें वरील प्रश्नाचें उत्तरच होऊं शकत नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात—)

न जानामीति वचनं कुतः स्याद्धि निरर्थकम् ॥
न ह्यज्ञेषु कुतः कश्चिद्ब्रूते मानं समाश्रितः ॥ ३७५ ॥

अर्थ—' न जानामि इति वचनं कुतः हि निरर्थकं स्यात्-'

"मी जाणत नाहीं, मला माहीत नाहीं,' हें वचन निरर्थक कां असेल ? तें व्यर्थ असणें शक्यच नाहीं. कारण कोणताही वादी प्रायः प्रमाणाचा आश्रय करूनच वाद करावयास प्रवृत्त झालेला असतो, त्यामुळें 'मानसमाश्रितः कश्चित् अज्ञेषु 'कुतः' इति न ब्रूते.' प्रमाणाचा आश्रय केलेला कोणीही 'आम्ही याविषयीं अज्ञ आहोंत' असें बोलणाऱ्या अज्ञांना 'तें कां ?' 'तुम्हांला याचें ज्ञान कां नाहीं,' असें तो विचारीत नाहीं. ( कारण अज्ञानाविषयीं प्रश्न करतां येत नाहीं. वाद्याला निरुत्तर करणें हेंच वादाचें फळ आहे ) ३७५. (पण ही अज्ञता हें दूषण नव्हे असें सांगतात—)

जन्मादिविषयेनॄणामज्ञता नैव दूषणम् ॥
अंधस्य हि न दोषोऽस्ति रूपाज्ञाने कथंचन ॥ ३७६ ॥

अर्थ—'जन्मादिविषये नॄणां अज्ञता दूषणं नैव । हि रूपाज्ञाने अंधस्य दोषः कथंचन न अस्ति.' जन्मादिकांविषयीं अनात्मज्ञ मनुष्यांची अज्ञता हें दूषण नव्हे. कारण रूपाचें ज्ञान न होणें, यांत आंधळ्याचा दोष कोणत्याही प्रकारें नसतो. ( मुमुक्षूला प्रपंचाचें विस्मरणच झालें पाहिजे. अर्थात् प्रपंचाचें अज्ञान हा दोष नसून गुणच आहे. आत्मज्ञान झालें असतां सर्व ज्ञात होतें व प्रपंच उपेक्षणीय होतो. त्यामुळें अनात्मज्ञादशेंतील विशेष अज्ञान हा दोष नव्हे आत्मज्ञान झाल्यावर तर ज्याला धूळीचा लेप झाला आहे त्याला पुनः धुळीचा लेप देण्याप्रमाणें जन्मादिकांचें अज्ञान हा दोष नव्हेच ) ३७६. ( प्रपंच अनिर्वचनीय असल्यामुळें विशेषतः ज्ञात होणें शक्य नाहीं. त्यामुळें त्याचें अज्ञान हा कांहीं दोष नव्हे, हें सुचविण्यासाठीं प्रपंचोत्पत्ति तर्काचा विषय होण्याजोगा नाहीं, असें सांगतात—)

आनंदात्मा प्रकाशैकस्वभावो द्वयवर्जितः ॥ असंगो निर्गुणोऽनंतो विक्रियादेरनाश्रयः ॥ ३७७ ॥ अवाङ्मनसगम्योऽपि विश्वमेतदजीजनत् ॥ विचित्रं विविधाकारमाचिन्त्यानन्तशक्तिकम् ॥ ३७८ ॥ विलक्षणं प्रमाणादिभेदभिन्नमनेकधा ॥ इति को नाम वै वक्तुं विज्ञातुं च प्रभुर्भवेत् ॥ ३७९ ॥

**अर्थ**—'प्रकाशैकस्वभावः द्वयवर्जितः असंगः निर्गुणः अनन्तः विक्रियादेः अनाश्रयः अवाङ्मनसगम्यः अपि आनन्दात्मा विचित्रं विविधाकारं अचिन्त्यानन्तशक्तिकं विलक्षणं प्रमाणादिभेदभिन्नं इदं विश्वं कथं अनेकधा अजनयत् इति पृष्टे कः नाम वै वक्तुं विज्ञातुं च प्रभुः भवेत्-' प्रकाश ज्ञान हाच एक ज्याचा स्वभाव आहे असा, द्वयरहित, असंग, निर्गुण, अनन्त, विक्रियादिकांचा आश्रय नसलेला, वाक् व मन यांचा विषय न होणारा असाही आनन्दात्मा विचित्र, विविध आकाराचें, अचिन्त्य अनंत शक्तींनीं युक्त, प्रमाण-प्रमेय-प्रमाता या भेदांनीं भिन्न असें हें विश्व अनेक प्रकारें कसा उत्पन्न करिता झाला, असें कोणीं विचारलें असतां त्याचें उत्तर सांगण्यास किंवा तें पूर्ण जाणण्यास तरी कोण समर्थ आहे? ( कोणी नाहीं. ) २७७-७९. ( जगाची अचिन्त्यशक्तिताच स्पष्ट करितात— )

यस्मिन्नैकैकमप्यत्र प्रमाणशतकोटिभिः ॥
न ज्ञायते स्वरूपेण तथा धर्मादिनापि च ॥ २८० ॥

**अर्थ**—' यस्मिन् एकैकमपि वस्तु प्रमाणशतकोटिभिः अत्र स्वरूपेण तथा धर्मादिना अपि च न ज्ञायते-' ज्या विश्वांतील एकेक पदार्थ अनेक प्रमाणांनी सुद्धां, याचें स्वरूप काय आहे? याचे धर्म कोणते कोणते आहेत? याचे अवयव किती आहेत? इत्यादि प्रकारें जाणला जात नाहीं त्या विश्वाचें समग्र वर्णन करण्यास कोण समर्थ आहे? ( कोणी नाहीं. ) २८०

जानीमो वयमित्येवं बुद्धिर्येषां महात्मनाम् ॥ ते पृष्टाः प्रवदन्त्वत्र घटमेकं महाधियः ॥ २८१ ॥ घटः कोऽयं कुतो वा स्याद्घटोऽयमघटो न हि ॥ कस्मादस्य हि संबंधो नैवान्येन परस्य न ॥ २८२ ॥ अयमित्येष निर्देशः सर्वस्यापि हि वस्तुनः ॥ घट इत्यपि निर्देशो विद्यते हि घटान्तरे ॥२८३॥ यथा घटे घटाभावः पटेऽप्येवं स विद्यते ॥ कुतो घटः पटो न स्यात्पटो वापि घटो न किम् ॥ २८४ ॥

**अर्थ**—' येषां महात्मनां वयं जानीमः इत्येव बुद्धिः अस्ति ते पृष्टा-

महाधियः अत्र एकं घटं प्रवदन्तु-' ज्या महात्म्यांची 'आम्ही सर्व विश्वाला जाणतों' अशी बुद्धि आहे ते आम्हांकडून विचारले गेलेले महाबुद्धिमान् लोक या विश्वांतील एक घटच सांगू देत ३८१. 'घटः कः अयं-' हा घट काय आहे ? त्याचें स्वरूप काय आहे ? 'अयं घटः अघटः कुतः वा न स्यात्-' हा घट घटभिन्न–घटाहून निराळा पदार्थच कां नव्हे ? म्ह० याची घटेतर पदार्थापासून व्यावृत्ति कशी होते ? 'नेत्रादैः संबंधः अस्य एव अपरस्य न इति कस्मात्-' नेत्रादिकांशीं याचाच संबंध आहे दुसऱ्याचा नाहीं, हें कशावरून ? ३८२ ('अयं-' हा–असें आपण त्याला म्हणतों. अर्थात् 'हा' असें म्हणण्यास जो योग्य असतो तो घट, असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण-)'अयं इत्येषः निर्देशः सर्वस्य वस्तुनः अस्ति हि-' 'हा' अशा तऱ्हेचा हा निर्देश सर्व वस्तूंविषयीं होऊं शकतो. प्रत्येक पदार्थाला 'हा' असें आपण म्हणतों. बरें, जो 'घट' असें म्हणण्यास योग्य असतो तो घट असें म्हणावें तर 'घटः इत्यपि निर्देशः घटान्तरे विद्यते हि-' घट असाही निर्देश दुसऱ्या घटाच्या ठिकाणीं होतो, हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें 'घट' हा निर्देशही या पुढील विशिष्ट घटाचेंच लक्षण होऊं शकत नाहीं. ३८३ ('अघटव्यावृत्तिरूपघटत्वशाली घटः' जो घट नव्हे, त्यापासून व्यावृत्ति पावणारा व घटत्व या धर्मानें शोभणारा असतो तो घट असें घटाचें लक्षण केल्यास त्याचाही असंभव आहे, असें सांगतात–) 'यथा घटे घटाभावः एवं पटे अपि स विद्यते-' ज्याप्रमाणें घटांत घटाचा अभाव असतो तसा तो पटांतही असतो. मग 'घटः पटः कुतः न स्यात्-' घट पट कां होणार नाहीं व त्याप्रमाणें 'पटः वा घटः किं न-' पट तरी घट कां नाहीं ? [ म्ह० वरील लक्षणासाठीं अगोदर 'अघट' म्ह० काय हें कळलें पाहिजे. 'घटभेद' हेंच अघटाचें लक्षण केलें पाहिजे. पण घटभेदाचा निर्णय घटस्वरूपाच्या निर्णयाधीन आहे. त्याचा निर्णय होईपर्यंत घटभेदरूप घटाभाव तुला अभिमत असलेल्या घटांत जसा संदिग्धरूपानें असतो तसा तो पटांतही असतो. तेव्हां पटच घट कां नव्हे, ही शंका निवृत्त होत नाहीं. म्हणून घटनिरूपणाच्या अधीन असलेलें जें अघटव्यावृत्तिरूप घटलक्षण तें

आत्माश्रयग्रस्त आहे, असा सारांश.]३८४.(स्वाचग्रहाणें घटादिकापासून भिन्न असून जो या घटेंद्रियसंबंधानें निरूपण केला जाणार, तो घट असेंही त्याचें लक्षण होऊं शकत नाहीं, असें सांगतात—)

नेत्राद्यैर्विद्यते यावत्संबंधोऽत्र घटस्य हि ॥
यादृगेव हि संबंधः परस्यापि स तैः समः ॥ ३८५ ॥

अर्थ—'अत्र घटस्य नेत्राद्यैः सह संबंधः यावत् यादृक् एव च विद्यते सः संबंधः परस्य अपि तैः समः.' या प्रदेशीं असलेल्या घटाचा नेत्रादिकांशीं संबंध जेवढा वेळ व जसा संयोगादिरूपाचा असतो तेवढा वेळ व तशाच स्वरूपाचा संबंध दुसऱ्या—त्या घटाहून भिन्न—त्याच्या समीप असलेल्या—पदार्थाचाही त्या नेत्रादिकांशीं समान असतो. ( अर्थात् घटेंद्रियसंबंधच घटाचें स्वरूप निश्चित करूं शकत नाहीं.)३८५.(शंका—)

उदकाहरणे शक्तो घटोऽयमिति चेन्मतम् ॥ घटान्तरादेरेतस्मात्कुतः सोऽयं घटो न हि ॥ ३८६ ॥ उदकाहरणं चायं कुरुते न पटः कुतः ॥ पार्थिवत्वं हि सामान्यं विद्यते तूभयोर्यतः ॥ ३८७ ॥ घटस्य न पटत्वं चेद्घटत्वं च पटस्य न ॥ द्वयोरन्यतरासत्त्वे पक्षपातः कुतो घटे ॥ ३८८ ॥ उदकाहरणे शक्तो घटश्चेद्धि घटो भवेत् ॥ सच्छिद्रादौ घटे न स्याद्घटोऽयमिति धीः क्वचित् ॥ ३८९ ॥ उदकाहरणाभावे तच्छक्तिर्नैव गम्यते ॥ आपाकादिस्थिते कुंभे घटधीस्ते कथं भवेत् ॥ ३९० ॥ उदकाहरणे शक्तमपि भांडादिकं बहु ॥ विद्यते तत्कुतो न स्याद्घटधीशब्दभाक्तदा ॥ ३९१ ॥ घटत्वजातियोगोऽपि निर्वक्तुं नैव शक्यते ॥ जातेः सर्वगतत्वे स्यात्पटेनापि घटादि सः ॥ ३९२ ॥ आकाशो घटसंबद्धः पटेनासौ न योगभाक् ॥ न कदाचिदतस्तस्या एकदेशा स्थितिर्भवेत् ॥ ३९३ ॥

**अर्थ**—' उदकाहरणे शक्तः अयं घटः इति मतं चेत् घटान्तरादेः एतत् स्यात् । सः अयं घटः कुतः न हि—' जो उदक आणण्यास समर्थ

होते. २८९ ( शिवाय कोणतीही शक्ति कार्यलिंगक अनुमानानें ज्ञात होते, पण—) ‘ उदकाहरणाभावे तच्छक्तिः न एव गम्यते.’ जेव्हां उदक आणणें हें कार्य आपण करीत नाहीं त्यावेळीं त्याची ती शक्ति ज्ञात होत नाहीं. तर ‘ आपाकादिस्थिते कुंभे ते घटधीः कथं भवेत्.’ तर भाजावयाच्या कुंभाराच्या आव्यांत असलेल्या घटाविषयीं तुम्ही घटबुद्धि कशी होईल ? २९० ( शिवाय— ) ‘ उदकाहरणे शक्तं भांडादिकमपि बहु विद्यते । तदा तत् घटधीशब्दभाक् कुतः न.’ उदक आणण्यास समर्थ असें पात्रादिकही दुसरें पुष्कळ असतें. तेव्हां असें घटलक्षण केल्यास तें पात्रादिक घटबुद्धि व ‘ घट ’ हें नांव यांस पात्र कां होणार नाहीं. २९१ ( बरें, ‘ घटत्वजातिमान् घटः ’ असें लक्षण केल्यास कोणता दोष येतो तें सांगतात—) ‘ जातेः सर्वगतत्वं वा घटव्यक्तिनियोगः अपि नियन्तुं नैव शक्यते.’ जातीला सर्वगतत्व अथवा घटव्यक्तीशीं योगही अशा अशा प्रकारच्या व्यक्तींमध्येंच असतो, दुसऱ्या प्रकारच्या व्यक्तींत नसतो असा नियम सांगतां येत नाहीं. कारण ‘ तथा सति सः पटेन अपि बलात् स्यात्.’ जाति सर्वगत आहे, असें म्हटल्यास तो घटत्वजातीचा योग पटाशींही बलात्कारानें होईल. ( कारण जातीला विभुत्व आहे, असें मानणें याच सामर्थ्यानें तो पटाशींही होईल; आणि तो तसा होत नाहीं, म्हणून म्हटल्यास जातीला विभुत्व नाहीं, जाति सर्वगत नाहीं, असें म्हणावें लागेल. ) २९२ ( विभु पदार्थांच्या सर्वगतत्वाविषयीं दृष्टान्त— ) आकाशः घटसंबद्धः सन् कदाचित् पटेन सह न योगभाक् इति न । अतः तस्याः स्थितिः एकदेशा भवेत्.’ विभु आकाश घटाशीं संबद्ध असून केव्हांही पटाशीं योगभाक्—संबद्ध नाहीं, असें होत नाहीं. तर तें सर्वांशीं संबद्ध असतें. म्हणून म्ह० कोठें संबद्ध असणें व कोठें नसणें, अशी व्यवस्था अनुपपन्न असल्यामुळें त्या जातीची स्थिति एकदेशीय—एकदेशीं होणारीच आहे असें कबूल करणें भाग आहे. ( अर्थात् जाति विभु आहे, हा पक्ष गळून ती परिच्छिन्न आहे हा पक्ष प्राप्त झाला. ) २९३ ( आतां जाति अपरिच्छिन्न—सर्वगा—विभु आहे या पक्षावर दूषण देतात— )

अर्थ—' अपि सा भावरूपा स्यात् अथवा अभावरूपिणी-' शिवाय ती जाति भावरूप आहे कीं अभावरूप ? ' अभावत्वे च कः अभावः तद्रूपं इति कथ्यताम्-' आणि जाति जर अभावरूप असेल तर कोणता अभाव तिचें रूप आहे तें सांग ३९८. कारण ' वादिभिः अभावः द्विविधः प्रोक्तः नित्यः अनित्यः च-' वाद्यांनीं अभाव दोन प्रकारचा सांगितला आहे. एक नित्य व दुसरा अनित्य. ' प्रागभावः अनित्यः स्यात्-' कार्य उत्पन्न होण्याच्या पूर्वी जो त्या कार्याचा अभाव असतो त्याला प्रागभाव म्हणतात. तो अनित्य आहे. कारण कार्य उत्पन्न होतांच तो नाहींसा होतो. अर्थात् प्रागभाव हें जर जातीचें स्वरूप असेल तर ' सः कस्य अर्थस्य इति न निश्चयः-' तो प्रागभाव कोणत्या पदार्थाचा संबंधी आहे, हा निश्चय होत नाहीं. ( कारण प्रागभाव उत्पन्न न झालेल्या सर्वच पदार्थांचा असल्यामुळें त्याचा अमुकच एका विशेष पदार्थाशीं संबंध आहे, असा नियम करितां येत नाहीं. शिवाय प्रागभाव त्याचा प्रतियोगी उत्पन्न झाला कीं, नाश पावतो, असा तार्किकांचा सिद्धान्त आहे. तेव्हां प्रागभाव हें जर जातीचें स्वरूप मानलें तर- ) ' तदुत्पत्तौ जातेः नाशः सुनिश्चितः-' घटादि प्रतियोगी उत्पन्न होतांच जातीचा नाश अत्यंत निश्चित आहे. ( हेच दोष जाति प्रध्वंसाभावरूप आहे, असें मानलें तरी येतात, असें सुचवून जाति नित्य अभावरूप आहे, हा पक्ष घेतल्यास नित्यपदानें ध्वंसाची व्यावृत्ति शंकापूर्वक सांगतात—) ' नित्यः अपि अभावः जायमानः चेत् असौ घटवत् नित्यः न हि-' तार्किक प्रध्वंसाभाव सादि व अनन्त असतो, असें म्हणतात. ( तर्क-संग्रहसार पृ० ७८ पहा. ) पण जातीच्या स्वरूपत्वानें विवक्षित असलेला नित्यही अभाव जर उत्पन्न होणारा असेल तर तो घटाप्रमाणें नित्य असणें शक्य नाहीं. ३९९, ४०० ( वास्तव उत्पन्न न होणारा जो अत्यंताभाव तोच खरा नित्य अभाव असून तो नित्य अभाव हेंच जातीचें स्वरूप आहे, असेंच वाद्याला म्हणणें भाग आहे. पण त्यावरही कोणता दोष येतो तें सांगतात— ) ' अपरस्य अपि नित्यस्य घटेनैव

1. घटप्रागभावाचा प्रतियोगी घट आहे. ज्याचा अभाव तो त्याचा प्रतियोगी. तर्कसंग्रहसार पृ. ७६ पहा.

किं कुतः च योगः पटेन कस्मात् न इति वैषम्ये इह कारणं नास्ति च-' उत्पन्न न होणारा अत्यंताभावरूप जो दुसरा नित्य अभाव त्याचा घटाशींच कां व कोणता योग–संबंध असावा व पटाशीं कां नसावा, असा प्रश्न कोणीं केला असतां त्याचें समाधान करितां न येणें या वैषम्याचें कारण कांहीं दिसत नाहीं. ( अर्थात् जाति नित्य अभावरूपही नाहीं.) ४०१

( याप्रमाणें जाति अभावरूप आहे, या पक्षाचें निरसन करून ती भावरूप आहे, या पक्षाचेंही निरसन करितात—)

> भावेऽप्यभाववन्न स्यादनित्यत्वं कथंचन ॥
> नित्यतायां च सा नित्या कस्मादिति हि कथ्यताम् ॥४०२॥
>
> विनाशकारणाभावो भवतैवात्र कल्पितः ॥
> कस्मादेष घटे न स्यात्तस्या आश्रयरूपके ॥ ४०३ ॥

अर्थ—' भावे अपि अभाववत् अनित्यत्वं कथंचन न स्यात्-' जाति भावरूप आहे, असें जरी मानलें तरी अभावाप्रमाणें तिचें अनित्यत्व कोणत्याही प्रकारें उपपन्न होत नाहीं. ( कारण जेथें अभाव असतो तेथेंच अनियत्व नियमानें राहतें. त्यामुळें जाति भावरूप असली तरी अनित्य आहे असें जर मानलें तर एका घटाच्या अभावीं तिचा अभावही अवश्य स्वीकारावा लागेल आणि जाति सर्वव्यापक असल्यामुळें सर्व प्रदेशांमध्यें घटाभावाची बुद्धि होण्याचा प्रसंग येईल.) बरें ' नित्यतायां च सा नित्या कस्मात् इति हि कथ्यताम्-' जातीला नित्य म्हणशील तर ती नित्य कशी ? तिला कोणत्या कारणानें नित्य म्हणतां येतें तें सांग ४०२. ( ' विनाशाच्या कारणाचा अभाव हें नित्यतेचें कारण आहे, ' अशा वाद्याच्या म्हणण्याचा अनुवाद करून उत्तर सांगतात— ) ' अत्र विनाशकारणाभावः भवता एव कल्पितः-' या जातीच्या नित्यत्वाचें कारण विनाशाच्या कारणाचा अभाव हें आहे, असें जें म्हणणें आहे तें तुम्हींच कल्पिलेलें आहे. कारण जाति जर वस्तुतः नित्य असती तर तिचा आश्रय–घट-पटादि पदार्थही नित्य असता. कारण आश्रिताचें नित्यत्व आश्रयाच्या नित्यतेवर अवलंबून असतें. तेव्हां ' तस्याः आश्रयरूपके घटे एषः कुतः न स्यात्-' त्या जातीचा आश्रयरूप जो घट

त्यामध्यें हा विनाशकारणाभाव कां नाहीं ? त्यांतही तो असला पाहिजे. पण नसतो. त्यामुळें विनाशकारणाभाव हें नित्यत्वाचें कारण नव्हे. खरा विनाशकारणाभाव अद्वितीय आत्म्यांतच आहे. दुसऱ्या कोठेंही तो नाहीं. तथापि जात्यादिकांमध्यें तो भ्रमानें भासतो. ४०३ ( तुला संमत असलेल्या ज्यातीनेंच अनित्य पदार्थांचा आश्रय करून राहणाऱ्या पदार्थांचें अनित्यत्व सिद्ध होतें, असें सांगतात— )

आश्रितानामनित्यत्वं त्वयैवांगीकृतं यतः ॥
कार्ये भावे घटे दृष्टा तस्याः केन निवार्यते ॥ ४०४ ॥

अर्थ—' यतः आश्रितानां अनित्यत्वं त्वया एव अंगीकृतं । कार्ये भावे घटे दृष्टा । तस्याः केन निवार्यते-' कारण आश्रित पदार्थांचें अनित्यत्व तूंच मानलेलें आहेस. कारण कार्यत्वानें घटांत पाहिलेली अनित्यता तन्निष्ठ जातींतच नाहीं, असें कसें म्हणतां येईल ? तिचें निवारण कोण करील ? ४०४. ( घटत्वजातीचा स्वीकार जरी केला तरी त्या स्वीकाराचें लक्षणत्वानें इतरव्यावृत्तिरूप फळ संभवत नाहीं, असें सांगतात— )

यादृशं तादृशं वास्तु घटत्वं किमनेन नः ॥ अहो भिन्नं पटत्वाद्धि कुत इत्यत्र तद्वद ॥ ४०५ ॥ घटाश्रयत्वादिति चेदहो मोहो महानयम् ॥ यदसिद्धमसिद्धेन साध्यते भवताधुना ॥ ४०६ ॥ एवं विषयता न स्याद्घटशब्दधियोरपि ॥ घटस्य विषयो यस्मात्पटादिश्च घटो यथा ॥ ४०७ ॥ विषयः कोऽयमित्यत्र पृष्टे सति घटो यथा ॥ न ज्ञातो विषयोऽप्येवं भवता नावधार्यते ॥ ४०८ ॥ विषये नियता नैव काचिदर्थक्रियास्ति हि ॥ न जातिर्न च धीशब्दौ तस्यैवाऽसिद्धितोऽधुना ॥४०९॥ उदकाहरणादीनामपि सत्त्वे घटे न च ॥ अयं घटस्त्वया मह्यं कथितोऽस्ति कथंचन ॥ ४१० ॥

अर्थ—' घटत्वं यादृशं तादृशं वा अस्तु । अनेन नः किम्-' किंवा घटत्व तुम्ही जसें सांगतां तसेंच कां असेना ! त्याला मानून आम्हांला

काय करावयाचें आहे ? आम्हांला त्याचा कांहीं उपयोग नाहीं. ( इतरे-
व्यावृत्ति हेंच घटत्वजातिलक्षणाचें फळ आहे, म्हणून म्हणशील तर— ) 'अहो भिन्नं पटत्वात् हि कुतः इत्यत्र तद्वद-' तें पटत्वाहून भिन्न कां असें आहे, त्याचें कारण सांग पाहूं ४०५. 'घटाश्रयत्वात् इति चेत् अहो महान् अयं मोहः । यत् अमुना भवता असिद्धेन असिद्धं साध्यते-' घटत्व घटाचा आश्रय करून राहणारें असल्यामुळें पटत्वाहून भिन्न आहे, म्हणून म्हणशील तर अहाहा खरोखर हा मोठा मोह आहे. कारण आतां तूं असिद्ध हेतूनें असिद्ध साध्य सिद्ध करीत आहेस. ( 'घटत्व पटत्वाहून भिन्न आहे. कारण तें घटाश्रय आहे, घट हा त्याचा आश्रय आहे. घटाच्या स्वरूपाप्रमाणें-' अशा अनुमानानें जर त्याची सिद्धि करूं लागशील तर त्यावरून तुझा अविवेक मात्र प्रकट होईल. कारण हेतु निश्चित असला तरच तो साध्याची सिद्धि करतो. पण घटत्वाचा आश्रय घट आहे, ही गोष्ट संदिग्ध आहे. निश्चित नाहीं. कारण घटत्व घटाश्रय आहे, हें अद्यापि सिद्ध झालेलें नाहीं. कारण घटाच्या स्वरूपाचाच जर अद्यापि निर्णय झालेला नाहीं तर तदाश्रित घटत्वाचा निर्णय कोठून होणार ? अर्थात् असिद्ध हेतूनें साध्याची सिद्धि करणें, हा महा मोह आहे. ) ४०६. ( त्याचप्रमाणें घटशब्दवाच्यत्व किंवा घटबुद्धिविषयत्व हेंही घटाचें लक्षण होऊं शकत नाहीं, असें सांगतात— ) 'एवं घटशब्द-धियोः विषयता अपि लक्षणं न स्यात् । यथा घटः घटस्य विषयः तथा पटादिश्च विषयः-' जसें घटत्व हें घटाचें लक्षण नव्हे त्याचप्रमाणें घट-शब्द व घटबुद्धि यांची विषयता हेंही लक्षण होत नाहीं. कारण जसा घट घटशब्द व घटबुद्धि यांचा विषय आहे, तसाच पटादिक पटशब्द व पटबुद्धि यांचा विषय आहे. त्यामुळें शब्द व बुद्धि यांचा विषय होणें हें लक्षण होऊं शकत नाहीं. कारण त्यापूर्वी घटाच्या स्वरूपाचा निश्चय झाला पाहिजे ४०७. ( या लक्षणावरही पूर्वींचाच असिद्ध हेतूनें असिद्ध साध्याची सिद्धि करणें हा दोष येतो, असें सांगतात— ) 'कः अयं विषयः इति अत्र पृष्टे सति यथा घटः न ज्ञातः एवं भवता विषयः अपि

---

१. घटभिन्न पदार्थांपासून पटाला पृथक्त्वानें जाणणें, हेंच लक्षणाचें प्रयोजन आहे, म्हणून म्हणशील. तर—

न अवधार्यते-' विषय या पदाचा अर्थ काय ? विषय कशाला म्हणतात, असें विचारलें असतां जसा घट जाणलेला नाहीं, तुम्हीं घट या पदार्थाचा जसा निश्चय केलेला नाहीं त्याचप्रमाणें विषय या पदार्थाचें स्वरूपही तुम्हांला निश्चित करितां येणें शक्य नाहीं. ( कारण ' घटाची जी विषयता तीच पटाची कां होणार नाहीं?' या आक्षेपाचें समाधान करितां येत नाहीं. त्यामुळें पूर्वोक्त दोषच येतो. ) ४०८. ( स्वरूपाचा निश्चय झालेला नसल्यामुळें तद्व्याप्य क्रियाचाही लाभ होत नाहीं, असें सांगतात— ) ' विषये काचित् नियता अर्थक्रिया न एव अस्ति हि तस्य एव न जातिः न च धीशब्दौ निरूपयितुं शक्यौ अधुना असिद्धितः-' विषयामध्यें कोणतीही नियत अर्थक्रिया—कोणतीही निश्चित फलनिष्पत्ति नाहींच. जेथें जेथें विषयत्व असतें तेथें तेथें नियमानें अमुक फलनिष्पत्ति असते, जशी अग्नीची दाहक्रिया, असें कांहीं नाहीं. ( ज्ञान हेंच विषयतेचें फळ आहे, म्हणून म्हणाल तर ज्ञानापूर्वी विषयतेची असिद्धि आहे. ) त्या विषयाचीच नियत जातिही सांगतां येण्याजोगी नाहीं. त्या विषयींचा नियत शब्द किंवा बुद्धि यांचेंही निरूपण करितां येण्याजोगें नाहीं. कारण यावेळीं म्ह० या आक्षेपप्रसंगींही त्यांची असिद्धि आहे. ( कारण वर म्हटल्याप्रमाणें अतिप्रसंगाची शंका येते. ) ४०९. ( ज्या तुला उदकाहरणादि लोकप्रसिद्ध हेतु मिळाले असूनही घटाचें निर्धारण करणें दुष्कर झालें त्या तुला विषयाचें निर्धारण करणें दुष्कर होईल हें काय सांगावें ? असें सांगतात— ) ' घटे उदकाहरणादीनां सत्त्वे च अयं घटः त्वया मह्यं न कथंचन कथितः अस्ति-' घटामध्यें उदक आणणें इत्यादि क्रिया प्रत्यक्ष विद्यमान असतांना हा घट तूं मला कोणत्याही प्रकारें सांगितलेला नाहींस. तुला त्याचें स्वरूप सांगतां आलें नाहीं ४१०. ( वरें घटाचा आकारच त्याचें लक्षण आहे, म्हणून म्हणशील तर सांगतों— )

पृथुबुध्नोदरादिः स्यादाकारोऽपि नियामकः ॥
न घटस्यास्य दृश्यन्ते यतः सर्वेऽपि तादृशाः ॥ ४११ ॥
देशकालादिकं चैवं न स्यादस्य नियामकम् ॥
यत एतादृशा भावाः सन्ति लोके सहस्रशः ॥ ४१२ ॥

अर्थ—' पृथुबुध्नोदरादिः आकारः अपि अस्य घटस्य न नियामकः स्यात् । यतः सर्वे अपि घटाः तादृशाः दृश्यन्ते- ' ज्याचें बूड—बुड व पोट पृथु म्ह० मोठें असतें व मान आवळली असते असा आकारही या पुढील घटाचा नियामक—इतरांपासून त्याची व्यावृत्ति करून निश्चय करविणारा नाहीं. कारण तुला अभिमत असलेले सर्वही घट सदृश आकाराचे असतात. वास्तव तेंही पुढें असलेल्या एकाच घटाचें लक्षण होऊं शकत नाहीं. ४११ ( या देशीं राहणें, या कालीं राहणें, हेंही लक्षण होऊं शकत नाहीं. कारण तें अतिव्याप्तिदोषानें दूषित होतें, असें सांगतात— ) ' एवं अस्य देशकालादिकं नियामकं न स्यात् । यतः एतादृशाः भावाः लोके सहस्रशः सन्ति-' वर सांगितलेल्या लक्षणाप्रमाणें या घटाचें देश-कालादिक हेंही नियामक लक्षण होऊं शकत नाहीं. या देशाशीं संबद्ध असलेला हा घट आहे, किंवा या कालाशीं संबद्ध असा हा आहे, असें म्हटल्यानेंही पुढील घटाचा इतर व्यावृत्तीनें निश्चय होऊं शकत नाहीं. कारण तर्कमतांत दिशा व काल यांना सर्वाधारता मानलेली असल्यामुळें घटदेशांत इतर पदार्थांचेंही अस्तित्व असतें. त्यामुळें एतद्देशकालसंबद्ध असे हजारों पदार्थ लोकांत आहेत. ४१२. ( वास्तव घट अनिर्वचनीय आहे. त्यामुळें अज्ञान हेंच त्याचें उपादान आहे. घटाचें उपादान अज्ञान अनुभवाला येत नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. कारण त्याचा जर अनुभव आला नसता तर ' मी जाणत नाहीं ' असें उत्तर सांगणें अशक्य झालें असतें, असें सांगतात— )

किं च यो यो घटो नाम कथ्यते केनचित्त्वया ॥
ज्ञायते च मया तत्र कुत इत्युदिते सति ॥ ४१३ ॥
न जानामीति वचनात्कोपाद्वा दुष्टचेतनात् ॥
उत्तरं नान्यदीक्षेत भवतोऽप्यभिमानिनः ॥ ४१४ ॥

अर्थ—किं च यः यः घटः केनचित् कथ्यते त्वया अभिमानमात्रेण ज्ञायते वा तत्र मया कुतः इति उदिते सति न जानामि इति वचनात् कोपात् वा दुष्टचेतनात् अन्यत् उत्तरं अभिमानिनः अपि भवतः न ईक्षेत-' शिवाय जो जो घट कोणांकडून सांगितला जातो किंवा केवळ

अभिमानानें तुझ्याकडून जाणला जातो त्याविषयीं—'घट' असें सांगणें किंवा जाणणें यांविषयीं—'कोणत्या कारणानें?' असा मी नियामकाविषयीं प्रश्न केला असतां 'मी जाणत नाहीं,' असें सांगणें, किंवा दुष्टभावानें कोप करणें यावांचून दुसरें उत्तर अभिमानी असलेल्याही तुझ्यापासून येणें शक्य नाहीं. (अर्थात् कोपावांचून जें उत्तर तू देशील तेंच अज्ञान घटाचें उपादान आहे.) ४१३,१४ (येथील घटाचें उदाहरण उपलक्षणार्थ आहे. त्यामुळें याच रीतीनें सर्व प्रपंचाचें कारण अज्ञान आहे, असा निश्चय करावा, असें सांगतात—)

एकं घटं यतो नैवं शक्ता वक्तुं कथंचन ॥ कुतो विश्वमिदं कृत्स्नं भवन्तो वक्तुमीशते ॥ ४१५ ॥ भवतामपि सर्वेषामज्ञानमभिमानिनाम् ॥ मदुक्तेः सहकारित्वात्पुरतो भाति सर्वतः ॥ ४१६ ॥ सुदुर्घटमिदं यस्मान्निरूपयितुमंजसा ॥ विश्वं समग्रं तस्मात्तदज्ञानादुत्थितं भवेत् ॥ ४१७ ॥ न हि मायाविनां मायां सकार्यां वेत्ति कश्चन ॥ पश्यन्नपि तथा विश्वं जानाति हि न कश्चन ॥ ४१८ ॥ स्वप्ने पश्येद्यथा रात्रौ सागरं हृदये निजे ॥ सूर्यग्रहणसंयुक्तं मथुरोपवने स्थितः ॥ असंभावितदेशादिरेवमेतच्चराचरम् ॥ ४१९ ॥ मायैषा तस्य देवस्य योऽवाङ्मनसगोचरः ॥ यादृशं तादृशं ह्यस्याः कार्यमेतच्चराचरम् ॥ ४२० ॥ सर्पस्य यदि पादानां विन्यासानम्भसि स्थितान् ॥ अन्धोऽवलोकयेत्तद्वत् शृणुयाद्बधिरोऽपि हि ॥ अनेडमूकवचनं तादृग्विश्वस्य बोधनम् ॥ ४२१ ॥ अतो मायाविनस्तस्य महेशस्य विचेष्टितम् ॥ न कोऽपि किंचिज्जानाति विनाहंकारमात्मनः ॥ ४२२ ॥

अर्थ—'यतः एकं घटं कथंचन वक्तुं नैवं शक्ताः ततः इदं कृत्स्नं विश्वं वक्तुं भवन्तः कुतः ईशते-' ज्याअर्थी एक घटही कोणत्याच प्रकारें सांगण्यास समर्थ नाहीं त्याअर्थी हें सर्व विश्व सांगण्यास आपण कोठून समर्थ होणार? (एका घटाचेंही यथार्थ ज्ञान जर तुम्हांला होणें शक्य

नाहीं तर सर्व विश्वाचें कसें होणार ? ) ४१५. ( अहो पण ' मायां तु प्रकृतिं विद्यात्०- ' इत्यादि श्रुतीवरूनही जगाचें उपादान माया आहे, असा निश्चय होणें शक्य आहे. मग तुम्ही ही घटखंडनाचीच खटपट कशाला करीत आहां ? म्हणून विचाराल तर तें खरें आहे. पण ज्यांच्या बुद्धीला दोषामुळें श्रुत्यर्थही असंभवनीय आहे, असें वाटतें त्यांना आरसा जसा मुखाचा अनुभव करवितो त्याप्रमाणें माझी वरील उक्ति अज्ञानाचा अनुभव आणून देईल ? असें सांगतात– ) ' सर्वेषां भवतां अभिमानिनां अपि अज्ञानं मदुक्तेः सहकारित्वात् पुरतः इव भाति- ' तुम्हां सर्व अभिमान्यांचेंही अज्ञान माझ्या उक्तीला सहकारित्व असल्या- मुळें, ती त्याला साह्य करणारी असल्यामुळें पुढें उभें असल्याप्रमाणें भासतें ४१६. ( अनिर्वाच्यत्वच या प्रपंचाचें मायिकत्व अनुभवास आणून देतें, असें सांगतात– ) ' यस्मात् इदं समग्रं विश्वं अंजसा निरूपयितुं सुदुर्घटं तस्मात् तत् अज्ञानात् उत्थितं भवेत्- ' ज्याअर्थी हें समग्र विश्व साक्षात् निरूपण करतां येणें अत्यंत दुर्घट आहे त्याअर्थी तें अज्ञानापासून उत्पन्न झालेलें आहे ४१७. ( मायिक पदार्थांचें निरूपण करतां येणें शक्य नाहीं, ही गोष्ट व्यवहारांत अनुभवानें सिद्ध झालेली आहे, असें सांगतात– ) ' मायाविनां मायां सकार्यां न हि कश्चन वेत्ति-' मायाव्यांची माया तिच्या कार्यासह कोणी जाणत नाहीं. ( जिचें निरूपण तर करतां येत नाहीं पण जी अगदीं स्पष्ट भासते, ती माया, असें मायेचें लक्षण श्रीविद्यारण्यांनीं पंचदशींत केलें आहे. ) 'तथा विश्वं पश्यन् अपि कश्चन न हि जानाति-' त्याचप्रमाणें हें सर्व जगत् पहात असतांनाही कोणी त्याला यथार्थतः जाणत नाहीं. ४१८. ( स्वप्नाप्रमाणें असंभावित देशादिकांच्या संबंधाचें भान होत असल्या- मुळेंही विश्वाला मायामयत्व आहे, असें सांगतात– ) ' यथा रात्रौ स्वप्ने मधुरोपवने स्थितः सन् सूर्यग्रहणसंयुक्तं असंभावितदेशादि सागरं निजे हृदये पश्येत्- ' ज्याप्रमाणें एकादा सुप्त पुरुष रात्रीं स्वप्नांत मथुरेच्या उपवनांत बसलेला असून सूर्यग्रहणसंयुक्त असंभाव्य देशकालादिसंबद्ध सागराला आपल्या हृदयांत पहातो त्याप्रमाणें हा मूढ हें चराचर जगत् पाहतो. ४१९ ( पण हें अज्ञान स्वतंत्र नाहीं तर ईश्वराच्या शक्तिभूत

असल्यामुळें ईशपरतंत्र आहे, असें सांगतात—) 'यः अवाङ्मनसगोचरः तस्य देवस्य एषा माया। यतः एतत् चराचरं यादृशं तादृशं अतः अस्याः कार्यम्' जो वाणी व मन यांचा विषय न होणारा त्या देवाची ही माया आहे. ज्याअर्थी हें चराचर विश्व अनिर्वचनीय आहे त्याअर्थीं त्या मायेचें कार्य आहे ४२०. (त्या देवाचें ज्यांना ज्ञान आहे, त्यांना प्रपंच तुच्छ भासतो व ज्यांना ज्ञान नाहीं त्यांनाच तो खरा भासतो अशी वस्तुस्थिति असल्यामुळें त्याचें अज्ञानमूलत्व स्पष्ट आहे, असा कार्यिकाची प्रपंचाच्या आकाश विषयक भासाचा दृष्टान्त देतात—) 'यथा नभसि विततान् सर्पस्य पादानां विन्यासान् अन्धः अवलोकयेत् यद्वत् बधिरः अपि हि अनेडमूकवचनं शृणुयात् तादृशं विश्वस्य बोधनम्' ज्याप्रमाणें आकाशांत असलेलीं सर्पाचीं पावलें आंधळ्यानें पहावीं किंवा बहिरा व मुका अशा एकाद्या पुरुषाचें वचन बहिऱ्यानेंही ऐकावें तसें ज्ञानिदृष्ट्या प्रपंचाचें विज्ञान आहे ४२१. (अर्थात् प्रपंचाचें दर्शन हेंच अज्ञानाचें चिह्न आहे, असें सांगतात—) 'अतः मायाविनः तस्य महेशस्य विचेष्टितं आत्मनः अहंकारं विना कः अपि किंचित् न जानाति' यास्तव मायावी जो महेश्वर त्याचें विचेष्टित—मायाकार्य केवळ आपल्या अहंकारावाचून—'मी मायाचेष्टित जाणतों' अशा नुसत्या अभिमानावाचून कोणी कांहीं जाणत नाहीं. ४२२ (म्हणूनच सृष्ट्यादिकांविषयीं अज्ञता, हा कांहीं दोष नव्हे, असें वर सांगितलें आहे—)

एवंभूतेऽतिदुर्बोधे ह्यस्मिन्मायाविचेष्टिते ॥ जगत्यज्ञानमुचितं सर्वेषामिह देहिनाम् ॥ ४२३ ॥ अपि यत्रात्मबीजाता शरीरेऽस्य शरीरिणः ॥ न पश्यति तदप्येष कुतोऽन्यमवलोकयेत् ॥ ४२४ ॥ यैरिन्द्रियैरयं शश्वद्व्यापारान्विविधानपि ॥ नरकस्वर्गमोक्षादिहेतुभूताननेकशः ॥ ४२५ ॥ कुरुते स्वात्मधीबोधात्तान्यप्येष न पश्यति ॥ कुतोऽवलोकयेद्विश्वं स्वान्यरूपमवस्थितम् ॥ ४२६ ॥ सुखदुःखे ममेत्येवं धिया कुर्वन्प्रवर्तनम् ॥ ममशब्दार्थमप्येष न जानाति कुतोऽपरम् ॥ ४२७ ॥ पूर्वजन्मनि किं मेऽभूदागामिन्यपि भावि किम् ॥

इति यो वेत्ति न स्वस्य जानीयात्स कथं परम् ॥ ४२८ ॥ अनुभूतान्यपि स्वेन कृत्स्नशो न स्मरेद्धि यः ॥ आगामि च न जानीयाज्जानीयात्स कथं परम् ॥ ४२९ ॥ अतीन्द्रियेष्वस्मात्प्रत्यक्षं नैव कारणम् ॥ किंतु पित्रादिवचनं प्रमाणं लोक ईरितम् ॥ ४३० ॥ पुरुषास्तेऽपि वेदेन ज्ञानवन्तोऽस्मदादिवत् ॥ वेदस्य वेदेनैव स्याद्रूपं यस्मादपौरुषम् ॥४३१॥ तस्मादस्य न चापेक्षा भवेत्पुरुषवत्सदा ॥ तस्मादेव यदस्माकं कथयेद्वेद ईश्वरः ॥ राजशासनवत्तद्धि ग्राह्यमस्माभिरादृतैः ॥ ४३२ ॥

अर्थ—'एवंभूते अस्मिन् अतिदुर्बोधे मायाविचेष्टिते जगति इह सर्वेषां देहिनां अज्ञानं उचितम्.' अशा प्रकारच्या या अतिदुर्बोध माया-कार्यभूत जगांत येथील सर्व देहवान् जीवांचें अज्ञान उचितच आहे ४२३. ( अहो पण मला मुळीं कशाचें अज्ञानच नाहीं, असें मान-णाऱ्या वाद्याच्या दुराग्रहाचें कैमुत्यन्यायानें खंडन करितात— ) 'अपि अस्य शरीरिणः यत्र शरीरे आत्मधीः जाता तत् अपि पुनः न पश्यति अन्यं कुतः अवलोकयेत्.' शिवाय ह्या शरीरवान् जीवाची ज्या शरीराचे ठिकाणीं आत्मबुद्धि होते त्या शरीरालाही जर तो पहात नाहीं तर दुसऱ्या बाह्य पदार्थाला कोठून पाहील ? ( शरीर व आत्मा यांचें अत्यंत सांनिध्य आहे. त्यामुळेंच जीवाला 'शरीरच मी' असा भ्रम होतो, पण अशा आत्मरूप भासलेल्या शरीराचेंही तत्त्व न जाणणाऱ्या जीवाला शरीराहून भिन्न असलेल्या इतर बाह्य पदार्थांचें तत्त्व कळणें शक्य नाहीं, हें काय सांगावें ? अमुक—अमुकही जर होत नाहीं तर अमुक होणारच नाहीं, हें काय सांगावें ? शक्य असलेली गोष्टही जर घडत नाहीं तर अशक्य असलेली गोष्ट घडणारच नाहीं, हें काय सांगावें, असें जें म्हटलें जातें त्याला कैमुतिक किंवा कैमुत्य न्याय म्हणतात. संस्कृतांत 'हें काय सांगावें' या अर्थाचें 'इति किमु वक्तव्यं' असें वाक्य योजतात. त्यांतील 'किमु' या शब्दावरून हा न्याय रूढ झाला आहे. ) ४२४. ( देहाच्याही आंत असलेलीं जीं इंद्रियें त्यांचें आपल्याला ज्ञान

नाहीं, या गोष्टीचा विचार करून आपल्या अज्ञतेचा तूं निश्चय कर, असें सांगतात— ) 'यैः इंद्रियैः अयं नरकस्वर्गमोक्षादेः हेतुभूतान् विविधान् अनेकशः व्यापारान् स्वात्मधीबोधात् शश्वत् कुरुते तानि अपि न पश्यति । तदा एषः स्वान्यरूपं अवस्थितं विश्वं कुतः अवलोकयेत्-' ज्या इंद्रियांनीं हा जीव नरक, स्वर्ग, मोक्ष इत्यादिकांना कारण होणाऱ्या नानाप्रकारच्या असंख्य व्यापारांस तीं इंद्रियेंच मी आहें, अशा ज्ञानानें सतत करतो त्यांनाही जर पहात नाहीं तर तो स्वतःहून भिन्नरूपानें -'हें' अशा विषयरूपानें अवस्थित असलेल्या विश्वाला कोठून पाहणार ? ( निषिद्ध कर्में नरकाला कारण होतात. विहित काम्य कर्में स्वर्गाला कारण होतात व विहित निष्काम कर्में चित्तशुद्धीच्या द्वारा मोक्षाला कारण होतात, साक्षात् नव्हे, असा भावार्थ. अर्थात् निष्काम कर्मानेंही मोक्ष मिळतो, असें म्हणणारे वेदान्तशास्त्रार्थ जाणत नाहींत, हें उघड आहे. ) ४२६. ( इंद्रियांच्याही आंत असलेल्या विषयांचा बोधक व वारंवार उच्चारला जाणारा असा जो 'अहं-' शब्द त्याचाही अर्थ जर तूं जाणत नाहींस तर तुझा विज्ञानाभिमान वृथा आहे, असें सांगतात— ) 'सुखदुःखे मम इत्येवं धिया प्रवर्तनं कुर्वन् एषः ममशब्दार्थं अपि न जानाति अपरं कुतः-' मला सुख व्हावें, मला दुःख होऊं नये अशा प्रकारच्या बुद्धीनें प्रवर्तन करणारा हा मनुष्य 'मम' या शब्दाचा अर्थही जाणत नाहीं मग दुसऱ्याला कोठून जाणणार ? ४२७. ( अस्मच्छब्दाप्रमाणें -'मी' 'माझा' या शब्दांच्या अर्थाप्रमाणेंच तत्संबंधी सुखःदुखाचें अज्ञानही दाखवितात— ) 'पूर्वजन्मनि मे किं अभूत् । आगामिनि अपि किं भावि इति यः स्वस्य न वेत्ति स परं कथं जानीयात्-' पूर्व जन्मांत मत्संबंधी सुख-दुःखादि काय होतें, पुढील जन्मींही काय असेल, हें जो स्वतःचें जाणत नाहीं तो दुसऱ्याला कसा जाणणार ? ४२८. ( जो अनुभविलेल्या गोष्टीही विसरतो त्याच्या अज्ञानाविषयीं संशयच काय आहे ? असें सांगतात— ) 'यः स्वेन अनुभूतान्यपि कृत्स्नशः न स्मरेत् । आगामि च न जानीयात् स परं कथं जानीयात-' जो स्वतः अनुभविलेल्या गोष्टीही पूर्णपणें स्मरत नाहीं व पुढें कशाचा अनुभव घ्यावयाचा आहे हें जाणत नाहीं तो दुसऱ्याला कसा जाणणार ? ४२९. ( याप्रमाणें जीव

अज्ञानप्रचुर आहेत, असें ठरलें असतां प्रत्यक्ष प्रमाण दोषयुक्त इंद्रियां-पासून उत्पन्न होणारें असल्यामुळें त्याला आभासत्व आहे. म्हणून, प्रत्यक्षविरोधानें वेदार्थाविषयीं असंभावना करूं नये, म्हणजे प्रत्यक्ष प्रमाणाशीं विरोध येत असल्यामुळें हा वेदार्थ खोटा आहे, असें म्हणूं नये, असें सांगण्यासाठीं व्यवहारांतही शब्दाचें प्रामाण्य दाखवितात-) 'अस्मात् अतींद्रियेषु अर्थेषु प्रत्यक्षं नैव कारणं । किंतु पित्रादिवचनं प्रमाणं लोके ईरितम्' या अज्ञानप्राचुर्यामुळेंच भूतकालीन व्यवहार, कुलाचार इत्यादि अतींद्रिय विषयांमध्यें प्रत्यक्ष हें साधन होऊंच शकत नाहीं. तर पिता, माता इत्यादि आप्तांचें वचनच तशा अर्थीं प्रमाण आहे, असें व्यवहारांत सांगितलेलें आहे. ( अशा गोष्टींविषयीं व्यवहारांत वृद्धांचें वचनच प्रमाण मानतात, हें प्रसिद्ध आहे. त्याच न्यायानें धर्मा-दिकांच्या स्वरूपाचा निर्णय इंद्रियांनीं करितां येत नाहीं. त्यामुळें तें अतींद्रिय आहे. म्हणून त्याविषयींही दृष्टिसृष्ट्यादि सांगणारा वेदच -शब्दच प्रमाण आहे.) ४३०. (यावर कोणी लौकिकवादी म्हणेल कीं, आमच्या आईबापांनीं दृष्टिसृष्टि वगैरे सांगितलेली नाहीं, तर ती त्यांनीं जरी सांगितली नसली तरी त्यांच्या गुरूंचाही गुरु जो वेद तो ती सांगतो. अशा आशयानें म्हणतात-) 'ते अपि पुरुषाः अस्मदादिवत् वेदेन ज्ञानवन्तः । वेदस्य ज्ञानं वेदेन एव स्यात् । यस्मात् तस्य वपुः अपौरुषम्-' लोकांमध्यें ज्यांचें वचन प्रमाण आहे ते मनुप्रभृति पुरुषही वेदवाक्यानेंच ज्ञानवान् झाले. जसें आम्ही वेदवाक्यांवरून आत्मज्ञान संपादन केलें त्याप्रमाणेंच मन्वादिकांनीं वेदावरून ज्ञान मिळविलें. ( हें इंद्राचें म्हणणें आहे. ) वेदपुरुषाचें ज्ञान वेदाच्या योगानेंच होईल, दुसऱ्या कोणत्याही साधनानें होणार नाहीं. कारण वेदपुरुषाचें शरीर वेदा-त्मक-अपौरुषेय आहे. म्ह० कोणत्याही पुरुषानें त्याला बुद्धिपूर्वक निर्माण केलेलें नाहीं. तर पुरुषाच्या श्वासोच्छ्वासाप्रमाणें पूर्वीच्या आकारानेंच तें प्रादुर्भूत झालेलें आहे. (याविषयीं 'अस्य महतो भूतस्य निःश्वसितं यदेत-दृग्वेदः-' इत्यादि श्रुति प्रमाण आहे. बृहदा-भाष्यार्थ अ.२ पृ.१८७पहा.) ४३१. 'तस्मात् अस्य पुरुषवत् सदा अपेक्षा न भवेत्-' ज्या अर्थीं या

१ 'ब्रह्म स्वयम्भ्वभ्यानर्षत्-' स्वयंभु शब्दब्रह्म ऋषिसंप्रदायानें प्रादुर्भूत झालें.

वचनं न परित्याज्यं तथा वेदस्य शासनम् ॥ ४३९ ॥ श्रोत्रा वेदस्य विज्ञानात्सुषुप्ताविंद्रियादिकम् ॥ प्राणे विलीयते तद्वदुत्थाने जायते ततः ॥ ४४१ ॥ प्रलीयते यथा सुप्तौ प्राणेऽस्मिन्निंद्रियादिकम् ॥ मरणेऽपि तथा प्राणे एतदेवं प्रलीयते ॥ ४४२ ॥ उत्थाने प्राणतो यद्वत्सर्वमेतत्प्रजायते ॥ जन्मन्यपि तथा प्राणादिदं सर्वं प्रजायते ॥ ४४३ ॥

अर्थ—' यथा अन्धः रूपभेदने चक्षुष्मन्तं स्वजनकं पर्यनुयोक्तुं न शक्तः तथा कः अन्यः पुमान् इह तं पर्यनुयोक्तुं प्रभुः अस्ति- ' जसा अंध पुत्र रूपाचा भेद सांगण्याच्या प्रसंगीं चक्षुःशाली व मान्य अशा पित्याला त्याविषयीं ' तुम्ही असें कसें म्हणतां ! हें तर श्वेतरूप आहे त्याला तुम्ही काळें कसें म्हणतां ? ' असा आक्षेप करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें कोणता बरें दुसरा पुरुष येथें त्या वेदाला प्रश्न करण्यास समर्थ आहे ? कोणी नाहीं ४३८. ( यास्तव आम्ही एवढेंच करावें- ) ' तस्मात् तदुक्तविज्ञाने यावत् बुद्धिः प्रभवति तावत् तस्य प्रसिद्ध्यर्थं प्रयत्नतः यतितव्यम्- ' जीवांना वेदावर आक्षेप घेतां येणें शक्य नसल्यामुळें त्या वेदानें सांगितलेल्या अर्थांचा निश्चय करण्याविषयीं बुद्धि जितकी बारीक—तत्पर होईल तितका आम्हीं यत्न करावा. बुद्धि वेदार्थनिर्णयीं तत्पर व्हावी, म्हणून मोठा यत्न करावा. मोठ्या प्रयत्नानें तिला तत्पर करावें ४३९. ' यथा धर्मात्मनः राज्ञः वा अतिहितस्य पितुः वचनं न परित्याज्यं तथा वेदस्य शासनं श्रोत्रा न परित्याज्यं- ' जसें धर्मात्म्या राजाचें किंवा अतिशय हितकर पित्याचें वचन सर्वथा त्याज्य नसतें तसें वेदाचें शासन—वेदाची आज्ञा श्रोत्याला सर्वथा त्याग न करतां येण्यासारखी असते. सर्व प्रकारें त्याला अत्याज्य असते. ( पुढील श्लोकांतील ' श्रोत्रा ' हें पहिलेंच पद येथें घ्यावें. ) ४४०. ( तात्पर्य— ) ' वेदस्य विज्ञानात् अयं अर्थः सिद्धः- ' वेदाच्या विज्ञानावरून हा अर्थ सिद्ध झाला. ( हा कोणता, तें सांगतात— ) ' सुषुप्तौ इंद्रियादिकं

1 इंद्रियादिक ह्मणजे अंतर्बाह्य इंद्रियें व त्यांचे सर्व व्यापार.

शब्दैः सहाप्येति मनः सर्वैर्ध्यानैः सहाप्येति यदा प्रतिबुध्यते यथा अग्नेर्ज्वलतो विस्फुलिंगा विप्रतिष्ठेरन्नेवमेवैतस्मादात्मनः प्राणा यथायतनं विप्रतिष्ठन्ते प्राणेभ्यो देवा देवेभ्यो लोकाः ॥३॥" तो ऐकत नाहीं, पहात नाहीं, वाक्-नें भाषण करीत नाहीं, ध्यान करीत नाहीं, इत्यादि प्रकारें ते जवळचे लोक म्हणतात. 'अथास्मिन् प्राणे एव०' तर या प्राणांतच एकत्र होतो. 'तदा एनं वाक्०-' त्यावेळीं—मरणसमयीं वाक्—इंद्रिय सर्व नामांसह या प्राणांत लीन होतें. चक्षु सर्व रूपांसह त्यांत लीन होतें. श्रोत्र सर्व शब्दांसह प्राणांत लीन होतें. मन सर्व ध्यानांसह प्राणांत लीन होतें. पण 'यदा प्रतिबुध्यते०-' तो जेव्हां पुनः उत्पन्न—जागा होतो—दुसरें शरीर ग्रहण करतो तेव्हां जसे पेटलेल्या अग्नीपासून विस्फुलिंग—किटाळें निरनिराळ्या दिशांकडे उडतात 'एवमेव०-' त्याचप्रमाणें या आत्म्यापासून प्राण—इंद्रियें आपापल्या स्थानाकडे विशेषतः निघतात. त्या इंद्रियाख्य प्राणांपासून अग्न्यादि देव व देवांपासून लोक म्ह० विषय उदय पावतात. [ म्ह० दुसऱ्या शरीराचें ग्रहण केल्यावर त्याही शरीरांत मोहापासून सर्वथा मुक्त होतो, असा भावार्थ ] ॥ ३ ॥

( या प्रमाणें मरणकाळीं मूर्च्छा व इंद्रियांचा लय सांगून शरीरापासून उत्क्रमण करण्याच्या वेळीं आत्म्याविषयींचा विशेष सांगतात— ) "स यदाऽस्माच्छरीरादुत्क्रामति सहैवैतैः सर्वैरुत्क्रामति । वागस्मात्सर्वाणि नामान्यभिविसृजते । वाचा सर्वाणि नामान्याप्नोति । प्राणोऽस्मात्सर्वान्गन्धानभिविसृजते । प्राणेन सर्वान्गन्धानाप्नोति । चक्षुरस्मात्सर्वाणि रूपाण्यभिविसृजते चक्षुषा सर्वाणि रूपाण्याप्नोति । श्रोत्रमस्मात्सर्वाञ्छब्दानभिविसृजते श्रोत्रेण सर्वाञ्छब्दानाप्नोति । मनोऽस्मात्सर्वाणि ध्यानान्यभिविसृजते मनसा सर्वाणि ध्यानान्याप्नोति सैषा प्राणे सर्वाप्तिः । यो वै प्राणः सा प्रज्ञा या वा प्रज्ञा स प्राणः सह ह्येतावस्मिञ्छरीरे वसतः सहोत्क्रामतः ॥" 'सः-' तो मुमूर्षु 'यदा-' ज्या वेळीं 'अस्मात् शरीरात्-' या प्रत्यक्ष शरीरापासून 'उत्क्रामति-' वर निघून जातो 'सह एव एतैः सर्वैः उत्क्रामति-' तेव्हां या सर्वांसहवर्तमानच वर निघून जातो. 'वाक्-' वाक्-इंद्रिय 'अस्मात्-' या स्वामीपासून 'सर्वाणि-' सर्व 'नामानि-'

स्वविषयभूत नामें 'अभिविसृजते-' सर्वतः सोडून देतें. वाक्-इंद्रिय आपल्या विषयव्यापारापासून सर्वथा उपरम पावून पुनः आपल्या स्वामीला भोग देत नाहीं. 'वाचा सह सर्वाणि नामानि आप्नोति-' प्राण वाक्-इंद्रियासह सर्व नामांना व्यापतो. केवळ वाक्-इंद्रियच प्राणांत लीन होत नाहीं तर ती वाक् आपल्या विषयांसह प्राणांत लीन होते. "प्राणः अस्मात्०-' घ्राणेंद्रिय या स्वामीपासून सर्व गंधांचा परित्याग करते. घ्राणासह सर्व गंधांना मुख्य प्राण प्राप्त होतो. चक्षु सर्व रूपांचा याच्यापासून परित्याग करतो. प्राण चक्षूसह सर्व रूपांना प्राप्त होतो. श्रोत्र या स्वामीपासून सर्व शब्दांचा परित्याग करतें. प्राण श्रोत्रानें सर्व शब्दांस व्यापतो. मन या स्वामीपासून सर्व ध्यानांचा सर्वथा परित्याग करतें. प्राण मनासह सर्व ध्यानांस प्राप्त होतो. 'सा एषा-' तीच ही वर 'स यदा०' या वाक्यानें सांगितलेली 'प्राणे-' प्राणोपाधिक आत्म्यामधील 'सर्वाप्तिः-' विषयेंद्रियादिलक्षण सर्वांची प्राप्ति आहे. (पण हा प्राण म्ह० प्राण-अपान इत्यादि पंचवृत्तिमात्र वायु नव्हे, तर क्रिया-ज्ञान-शक्तियुक्त आत्मा आहे, ह्या पूर्वीच्या अर्थाचेंच स्मरण देतात—) 'यः वै प्राणः-' जो हा प्राण 'सा प्रज्ञा०-' तीच प्रज्ञा व जी प्रज्ञा तोच प्राण. 'सह हि एतौ अस्मिन् शरीरे वसतः सहोत्क्रामतः-' तीं दोघें या शरीरांत बरोबरच राहतात व बरोबरच शरीरापासून निघून जातात. ]

(या पुढील सोळा श्लोकांनीं वरील श्रुतीचें व्याख्यान करितात— )

तस्य प्राणस्य देवस्य द्वेधा सिद्धिरुदीरिता ॥ यथा सिद्धिर्निधानस्य भूमिष्ठस्यांजनेन च ॥ ४४४ ॥ अन्वयव्यतिरेकाभ्यां मरणे प्राण एव हि ॥ सिद्ध्यत्यस्माद्वक्ष्यमाणं ज्ञानं सिद्धिरितीरितम् ॥ ४४५ ॥ व्याध्यादिना यदा दुःखमसह्यं प्राप्नुयात्पुमान् ॥ मुमूर्षुर्बलशून्यत्वाच्छक्तो वक्तुं न चैव हि ॥४४६॥ एवंभूतां तदा वीक्ष्य दशां दीनतमामिमाम् ॥ बान्धवाः परिवृत्यैनं पृच्छन्त्यातुरचेतसः ॥४४७॥ जानासि मां प्रियं पुत्रं मां जानास्यपि ते प्रियम् ॥ एवमादि स उक्तोऽपि यदा काष्ठसमः

पुमान् ॥ न जानाति तदाहुस्त उत्क्रांतज्ञान एव हि ॥४४८॥ यद्यनुत्क्रांतविज्ञानः शृणुयाच्चावलोकयेत् ॥ वदेद्वा पूर्ववन्नायं तादृक्तस्मादचित्तकः ॥ ४४९ ॥ अस्मिन्नवसरे सर्वे वागाद्याः करणाभिधाः ॥ स्वैः स्वैस्तैर्विषयैः सार्धं लीयन्ते प्राण एव ते ॥ ४५० ॥ यदायं जनिमान् भूयात्पुमान्सुप्तप्रबुद्धवत् ॥ तदा प्राणादिमे प्राणा जायन्ते ससुतादयः ॥ ४५१ ॥ मरणावसरे पुंसः स्वामिनो भृत्यवत्स्थिताः ॥ त्यजन्त्येनं यथा नाथमसमर्थं प्रजा इमे ॥ ४५२ ॥ अलब्धवित्तका यद्वद्भटाः संग्राममूर्धनि ॥ त्यजन्ति स्वामिनं तद्वद्वागाद्या मरणे ध्रुवम् ॥४५३॥ यथा वैश्यस्य संत्यागे पत्तने नापणादिकम् ॥ एवं वागादिसंत्यागान्नरि नो वचनादिकम् ॥ ४५४ ॥ रिपुणातिबलिष्ठेन प्रभौ विनिहते यथा ॥ संश्रयन्ति भटाः स्वामिभक्ता अन्यं प्रभोः प्रभुम् ॥ ४५५ ॥ एवमेते सविषया देवाः करणसंयुताः ॥ शरीरे पतिते देहनाथं प्राणं समाययुः ॥ ४५६ ॥ अन्वयव्यतिरेकाभ्यामेवं सर्वाप्तिरिष्यते ॥ प्राणतो नैव तस्मात्स्याद्विभिन्नं किंचिदत्र हि ॥ ४५७ ॥ प्राणप्रज्ञानयो रैक्यमेकदोत्क्रांतिवासतः ॥ यदुक्तं तत्स्थितं यस्मादप्राणे नास्ति वेदनम् ॥ ४५८ ॥ यथा प्राणोऽत्र न श्वासमात्रं किंतु परः पुमान् ॥ तथा प्रज्ञापि नो बुद्धिः किंतु संवित्स्वयंप्रभा ॥४५९॥

अर्थ—' तस्य प्राणस्य देवस्य एषा सिद्धिः उदीरिता । यथा भूमिष्ठस्य निधानस्य अंजनेन सिद्धिः । मरणे अन्वयव्यतिरेकाभ्यां प्राणः एव हि सिध्यति अस्मात् वक्ष्यमाणं ज्ञानं सिद्धिः इति ईरितम्-' पूर्वी अद्वितीयत्वानें वर्णन केलेल्या प्राणोपाधिक देवाची ही पुढील सिद्धि-सिद्धीचें साधन सांगितलेलें आहे. ज्याप्रमाणें भूमींतील निधीची सिद्धि अंजनानें होत असल्यामुळें अंजनालाच सिद्धि असें म्हणतात त्याप्रमाणें मरणसमयीं अन्वय व व्यतिरेक यांच्या योगानें, त्याचें अनुसंधान केलें

असतां प्राणच सर्वात्मा आहे, ही गोष्ट निश्चित होते. म्हणून पुढें सांगितलेलें अन्वयव्यतिरेकज्ञान हींच सिद्धि, असें म्हटलें आहे. ४४४-४४५ 'यदा पुमान् व्याध्यादिना असह्यं दुःखं प्राप्नुयात्-' जेव्हां पुरुष रोगादिकांच्या योगानें असह्य दुःखास प्राप्त होतो, त्या अवस्थेंत तो आतुर होतो, दुःखानें आर्त होतो तेव्हां 'मुमूर्षुःमन्-' मरण्याची इच्छा करतो. 'बलशून्यत्वात्-' त्यानंतर बलशून्य झाल्यामुळें 'वक्तुं शक्तः न च एव हि-' बोलण्यास समर्थ नसतोच ४४६. 'तदा एवंभूतां इमां दीनतमां दशां वीक्ष्य आतुरचेतसः बान्धवाः एनं परिवृत्य पृच्छन्ति-' त्यावेळीं अशा प्रकारच्या या अतिशय दीन दशेस पाहून ज्यांचें चित्त आतुर झालें आहे असे बांधव त्या मुमूर्षूला परिवेष्टित करून असें विचारतात ४४७. 'मां-प्रियं पुत्रं जानासि मां ते प्रियं जानासि इत्येवमादि सः उक्तः अपि यदा काष्ठसमः पुमान् न जानाति तदा ते उत्क्रान्तज्ञानः एव हि इति आहुः-' मला-आपल्या प्रिय पुत्राला तूं जाणतोस का, मला तुझ्या प्रिय मित्राला तरी जाणतोस का, इत्यादि प्रकारचें प्रश्नवाक्य जरी त्याला ऐकविलें-त्याला असें जरी विचारलें तरी जेव्हां तो काष्ठासारखा झालेला पुरुष जाणत नाहीं, पुत्रादिकाला ओळखीत नाहीं तेव्हां ते पुत्रमित्रादिक हा उत्क्रान्तज्ञान झाला आहे, याचें ज्ञान म्ह० श्रुतींत ज्याला चित्त म्हटलें आहे तें उत्क्रान्त झालें आहे, गेलें आहे, असें म्हणतात ४४८. 'यदि अनुत्क्रान्तविज्ञानः भवेत् तर्हि पूर्ववत् शृणुयात्, अवलोकयेत् अथवा वदेत् । अयं तु न तादृक् तस्मात् अचित्तकः-' हा जर अनुत्क्रान्तविज्ञान असता याचें विज्ञान-चित्त शरीरांतून निघून गेलें नसतें तर पूर्वीप्रमाणें यानें श्रवण केलें असतें, अवलोकन केलें असतें व हा बोलला असता, पण हा तसा नाहीं. श्रवण, अवलोकन, भाषण करीत नाहीं. म्हणून हा चित्तरहित आहे. उत्क्रान्तज्ञान आहे ४४९. 'अस्मिन्नवसरे ते करणाभिधाः वागाद्याः सर्वे तैः स्वैः स्वैः विषयैः सार्धं प्राणे एव लीयन्ते-' या ज्ञानोत्क्रमणाचे वेळीं तीं इंद्रियसंज्ञक वागादि सर्व करणें त्या आपापल्या विषयांसह प्राणांतच लीन होतात ४५०. ( लीन झालेल्या त्या वागादिकांसहवर्तमानच तो प्राण दुसऱ्या शरीरांत जातो, व तेथें त्या प्राणांतूनच वागादिक सर्व उत्पन्न होतात.

असें सांगतात— ) ' सुप्तप्रबुद्धवत् यदा अयं मृतः पुमान् जनिमान् भूयात् तदा प्राणात् इमे ससुतादयः प्राणाः जायन्ते.' जसा निजलेला पुरुष जागा होतो त्याप्रमाणें जेव्हां हा मृत पुरुष पुनः जनिमान्—जन्मवान् होतो, शरीर धारण करितो तेव्हां प्राणापासूनच हे वागादिक सुतादि बाह्य विषयांसह उत्पन्न होतात ४५१. ( मरणकाळीं वागादिक प्राण आपापला भोग कां देत नाहींत, या शंकेचें समाधान— ) ' स्वामिनः पुंसः इमे भृत्यवत् स्थिताः वागादयः एनं मरणावसरे त्यजन्ति । यथा असमर्थं नाथं प्रजाः त्यजन्ति तद्वत्.' शरीरेंद्रियांचा अभिमानी, अशा जीवाच्या चाकराप्रमाणें पूर्वी असलेले हे वागादिक प्राण या पुरुषाचा मरणसमयीं सोडतात. जसे रक्षण करण्यास असमर्थ असलेल्या राजाला प्रजाजन सोडतात त्याप्रमाणें ४५२. ( दुसरा दृष्टान्त— ) ' यद्वत् अलब्धवित्तकाः भटाः संग्राममूर्धनि स्वामिनं त्यजन्ति तद्वत् वागाद्याः मरणे ध्रुवम्' जसे वित्त न मिळालेले—ज्यांना धन प्राप्त झालेलें नाहीं, असे योद्धे युद्धाच्या ऐनप्रसंगीं आपल्या स्वामीला सोडतात त्याप्रमाणें वागादिक प्राण आत्मस्वामिमानरूप वित्त प्राप्त न झाल्यामुळें मरणसमयीं निश्चयानें सोडतात ४५३. ( अहो पण वाक्-वाचूनही नामव्यवहार, प्राणावाचूनही गंधव्यवहार इत्यादि कां होत नाहींत, याचें उत्तर— ) ' यथा वैश्यस्य पत्तने संत्यागे आपणादिकं न एवं वागादिसंत्यागात् नरि वचनादिकं न.' ज्याप्रमाणें वैश्यजातीनेंच नगराचा त्याग केला असतां त्यांत वैश्यांचा व्यापारादि व्यवहार होत नाहीं त्याप्रमाणें वागादिकांनीं त्याग केला असतां पुरुषामध्यें वागादिकांचा भाषणादि व्यापार होत नाहीं. ( या कथनानें ' वागादिक आपापला विषय सोडतात व त्यांच्यावांचून त्यांचा व्यापार—त्यांचें कार्य होणें अशक्य आहे, ' इत्यादि अर्थाच्या ' वागस्मात्सर्वाणि० ' इत्यादि चार पर्यायांचें व्याख्यान केलें. ) ४५४. ( तर मग देहांत उपलब्ध न होणारे वागादिक प्राण कोठें जातात, तें सांगतात— ) ' यथा अतिबलिष्ठेन रिपुणा प्रभौ विनिहते स्वामिभक्ताः भटाः अन्यं प्रभोः प्रभुं संश्रयन्ति एवं एते सविषयाः करणसंयुताः देवाः शरीरे पतिते देहनाथं प्राणं समाययुः.' ज्याप्रमाणें अतिबलाढ्य शत्रूनें आपल्या प्रभूला युद्धांत मारलें असतां योद्धे दुसऱ्याचा आश्रय

करण्याची इच्छा करीत असले तरी ते स्वामिभक्त असल्यामुळें दुसऱ्या —प्रभूच्या प्रभूचाच आश्रय करितात शत्रूचा आश्रय करीत नाहींत त्या-प्रमाणें विषयांसह इंद्रियांनीं युक्त असे हे देव शरीर पडलें असतां—तें मूर्च्छायुक्त झालें असतां त्याचा नाथ जो प्राण त्यासच प्राप्त होतात. ( सामंत राजाचे नोकर त्याच्यासाठीं त्याच्या शत्रूशीं लढतात. पण सामंत राजा—त्यांचा स्वामी शत्रूकडून मारला गेल्यास ते शत्रूच्या अधीन होत नाहींत, तर स्वामिभक्त असल्यामुळें आपल्या स्वामीचा स्वामी जो सम्राट् त्याचा आश्रय करितात. त्याच न्यायानें वागादिक ‘ मी मनुष्य आहें’ इत्यादि कार्यकरणाभिमान धारण करणाऱ्या जीवाचे भृत्य आहेत. पण त्यांचा स्वामी जीव मूर्छित झाला असतां देहाचा परम नाथ जो प्राण त्याचा ते आश्रय करितात, असा भावार्थ. ) ४५५—५६. (तात्पर्य—) ‘ अन्वय-व्यतिरेकाभ्यां एवं सर्वाप्तिः इष्यते । तस्मात् अत्र प्राणतः विभिन्नं किंचित् न एव स्यात् हि-’ प्राण असला तर सर्व असतें व तो नसला तर कांहीं नाहीं, तो शरीरांतून निघून गेला कीं सर्वांचा अभाव होतो अशा प्रकारच्या अन्वय व्यतिरेकांनीं प्राणाची सर्वाप्ति—सर्वाला स्वतःमध्यें मिळवून सोडणें, ही प्राप्ति या वाक्यांत इष्ट आहे. तस्मात् या सृष्टींत प्राणाहून भिन्न असें कांहीं एक नाहीं, हें सिद्ध झालें ४५७. ( या मरणाच्या उदाहरणानें प्राण व प्रज्ञा यांचा अभेदही सिद्ध झाला, असें सांगतात— ) ‘ एकदोत्क्रान्तिवासतः प्राणप्रज्ञानयोः ऐक्यं यत् उक्तं तत् स्थितं । यस्मात् अत्राणे भेदनं नास्ति-’ बरोबरच शरीरांतून निघून जाणें व बरोबरच शरीरांत राहणें, या दोन कारणांमुळें प्राण व प्रज्ञान यांचें ऐक्य जें सांगितलें आहे तेंही सिद्ध झालें. कारण प्राण निघून गेल्यावर याचें ज्ञानही नाहींसें होतें. ( प्राणाबरोबर याचें ज्ञानही उत्क्रान्त झालें आहे, तें निघून गेलें आहे, असा मृताच्या जवळ बसलेले लोक व्यवहार करितात ) ४५८. ( पण - ) ‘ यथा प्राणः अत्र न श्वास-मात्रं किंतु परः पुमान् तथा प्रज्ञा अपि बुद्धिः नो किंतु स्वयंप्रभा-’ ज्याप्रमाणें येथें प्राण म्हणजे नुस्ता श्वास नव्हे तर पर पुरुष आहे त्या-प्रमाणें येथील प्रज्ञाही बुद्धि नव्हे तर स्वयंप्रभा संविद् आहे ४५९.

[ श्रुतिः—“ अथ खलु यथाऽस्यै प्रज्ञायै सर्वाणि भूतान्येकं भवन्ति

तद् व्याख्यास्यामः ॥ ४ ॥ ( प्राणामध्यें सर्व भूतांचा एकीभाव सांगितला. आतां प्राण व प्रज्ञा यांचा सर्व प्रकारें एकीभाव सांगण्यासाठीं प्राणाप्रमाणें तिलाही सर्वात्मत्व आहे, असें सांगण्यास आरंभ करितात– ) ' अथ-' प्राणाचें सर्वात्मत्व सांगितल्यानंतर ' खलु-' खरोखर ' यथा-' ज्याप्रकारें ' अस्यै प्रज्ञायै-' या प्रज्ञेंत–ज्ञानशक्तींत–साक्षि चैतन्यांत ' सर्वाणि भूतानि-' विषयांसह स्थिर-चरसंज्ञक सर्व भूतें–वागादि इंद्रियें, ' एकं भवन्ति- ' प्राणाप्रमाणें एकरूप होतात ' तत्-' तें–तो प्रकार ' व्याख्यास्यामः-' अगदीं स्पष्टपणें सर्वप्रकारें सांगूं. ४ ]

संविदेका यथा भूयाद्बहुधाप्येकधा तथा ॥

शृणु राजन्हि वक्ष्यामि तं त्वमेकाग्रमानसः ॥ ४६० ॥

**अर्थ**—' हे राजन् संविद् एका अपि यथा बहुधा भूयात् तथा एकधा स्यात् तं वक्ष्यामि हि । त्वं एकाग्रमानसः सन् शृणु-' हे राजन् प्रतर्दन ! प्रज्ञापदाचा लक्ष्यार्थ अशी स्वयंप्रभा संविद् वस्तुतः एक असूनही जशी उपाधींच्या बहुत्वामुळें बहु प्रकारचीशी होते, त्याचप्रमाणें बहु प्रकारांनीं भासणारीही ती पुनः एकरूप कशी होते तो प्रकार मी आतां सांगणार आहें. तूं एकाग्रचित्त होऊन ऐक ४६०. ( ३,४ )

[ श्रुतिः—" वागेवास्या एकमङ्गमदूहळं तस्यै नाम परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । प्राण एवास्या एकमङ्गमदूहळं तस्य गन्धः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । चक्षुरेवास्या एकमङ्गमदूहळं तस्य रूपं परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । श्रोत्रमेवास्या एकमङ्गमदूहळं तस्य शब्दः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । जिह्वैवास्या एकमङ्गमदूहळं तस्या अन्नरसः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । हस्तावेवास्या एकमङ्गमदूहळं तयोः कर्म परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा। शरीरमेवास्या एकमङ्गमदूहळं तस्य सुखदुःखे परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । उपस्थ एवास्या एकमङ्गमदूहळं तस्यानन्दो रतिः प्रजातिः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । पादावेवास्या एकमङ्गमदूहळं तयोरित्याः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा। प्रज्ञैवास्या एकमङ्गमदूहळं तस्यै धियो विज्ञातव्यं कामाः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा ॥ ५ ॥ " ( एकभावाची प्रतिज्ञा करून प्रथमतः प्रज्ञेचा विभाग सांगतात— ) ' वाक् एव-' वागिंद्रियच ' अस्याः-' या प्रज्ञेचें ' एकं अंगं-' एक भाग—गाईच्या एका

स्तनाप्रमाणें ' अदूह्ळम्-' दोहन करती झाली. वाक्नें प्रज्ञेचा एक भाग आपल्या स्वाधीन करून घेतला. ' तस्यै-' जिच्या एका भागाचें दोहन केलें आहे अशा त्या वाक्-ची ' नाम-' बोलावयाचें सर्व शब्दजात हा ' परस्यात्-' विषयत्वानें परदेशांत म्ह० बहिर्देशांत ' प्रतिविहिता भूत-मात्रा-' भूतभाग विनिर्माण केला, किंवा तिच्या विषयत्वानें बहिर्देशीं निर्माण केलेली भूतमात्रा नाम--शब्दजात आहे. ' प्राण एव०-' घ्राणाख्य प्राणच या प्रज्ञेचें एक अंग स्वाधीन करून घेता झाला. त्याच्या विषयत्वानें बाहेर निर्माण केलेली भूतमात्रा गंध आहे. ' चक्षुरेवास्याः०-' चक्षुच या प्रज्ञेचा एक भाग स्वाधीन करिता झाला. रूप ही त्याची बाहेर निर्माण केलेली भूतमात्रा आहे. ' श्रोत्रमेवास्याः०-' श्रोत्रच त्या प्रज्ञेचें एक अंग स्वाधीन करून घेतें झालें. त्याचा शब्द ही बाहेर निर्माण केलेली भूतमात्रा आहे. ' जिह्वा एवास्याः०-' जिह्वाच प्रज्ञेच्या एका अंगाला स्वाधीन करून घेती झाली. अन्नरस हीच तिच्या विषयत्वानें निर्माण केलेली भूतमात्रा आहे. ' हस्तौ एव०-' दोन हातच हिच्या एका अंगाला स्वाधीन करून घेते झाले. त्यांचें कर्म ही बाहेर विषय-त्वानें निर्माण केलेली भूतमात्रा आहे. ' शरीरमेवास्याः०-' शरीरच या प्रज्ञेचें एक अंग स्वाधीन करून घेतें झालें. त्याच्या बाहेर विषयत्वानें निर्माण केलेली भूतमात्रा सुख-दुःख आहे. ' उपस्थ एव०-' उपस्थच या प्रज्ञेचें एक अंग स्वाधीन करून घेता झाला. आनन्द, रति, प्रजाति, हीच त्याची बाहेर विषयत्वानें निर्माण केलेली भूतमात्रा आहे. ' पादावेवास्याः०-' दोन पाय हेच या प्रज्ञेचें एक अंग स्वाधीन करून घेते झाले. गति ही त्याची बाहेर विषयत्वानें निर्माण केलेली भूतमात्रा आहे. ' प्रज्ञैवास्याः०-' प्रज्ञाच या प्रज्ञेचें एक अंग स्वाधीन करून घेती झाली. तिची बुद्धि, ज्ञातव्य विषय व काम ही बाहेर विषयत्वानें निर्माण केलेली भूत-मात्रा आहे ५. ]

पंच ज्ञानेंद्रियाण्येव पंच कर्मेंद्रियाणि च ॥ देहोऽन्तःकरणं चेति द्वादशात्र विभेदकाः ॥ प्रज्ञाया विषयैः स्वैः स्वैर्व्यापारैर्विषयीकृतैः ॥ ४६१ ॥ नामादानगतित्यागसुखाद्या विषया इह ॥ कर्मेंद्रियाणां कथिताः प्रज्ञाभेदकृता इमे ॥४६२॥

शब्दस्पर्शरूपरसगंधा ज्ञानेंद्रियाहृताः ॥ विषया नियतास्ते हि प्रसिद्धा लोकवेदयोः ॥ ४६३ ॥ देहस्य विषयावेते सुख-दुःखे इहेरिते ॥ तथांतःकरणस्यापि कामाद्या विषयाः श्रुताः ॥ ४६४ ॥ यथा द्वादश गोपाला गामेकां सुपयस्विनीम् ॥ कामधेनुसमां सर्वे दुहन्ति मिलिता अपि ॥ स्वार्थसिद्ध्यर्थमेवं ते वागाद्या अप्यदूदुहन् ॥ ४६५ ॥ शिखां वह्नेर्यथा भिन्नां काष्ठैर्द्वादशभिस्त्विह ॥ भिन्नां वदन्ति मनुजास्तद्वदेतैरिमां वयम् ॥ ४६६ ॥ यथा द्वादशभिर्दीपैः प्रकाशा विषयेष्विह ॥ प्रजायन्ते द्वादशधा तथा भूतेषु बोधनम् ॥ ४६७ ॥

**अर्थ**—' अत्र पंच ज्ञानेंद्रियाणि पंच कर्मेंद्रियाणि देहः अन्तःकरणं च इति द्वादश प्रज्ञायाः विभेदकाः-' वरील श्रुतींत पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, देह व अंतःकरण असे बारा प्रज्ञेचे विभाग करणारे म्हणून विवक्षित आहेत. ( कशाच्या योगानें ते विभाग करितात— ) ' स्वैः स्वैः व्यापारैः विषयीकृतैः विषयैः-' आपापल्या व्यापारांनीं व्यापलेल्या विषयांनीं ते प्रज्ञेचा विभाग करितात. ( वरील श्रुतींत ज्ञानेंद्रियांतील त्वक् व कर्मेंद्रियांतील पायु यांचा देह व उपस्थ यांत अंतर्भाव केला आहे, असें जाणावें. ) ४६१. ' नामादानगतित्यागसुखाद्याः इमे विषयाः इह कर्मेंद्रियाणां प्रज्ञाभेदकृताः कथिताः-' शब्दव्यवहार करणें, घेणें, जाणें, त्याग करणें व आनंद भोगणें, या नांवाचे हे विषय येथें कर्मेंद्रियांच्या प्रज्ञाभेदामुळें झाले असें सांगितलें आहे. ( येथील आदानच श्रुतींतील कर्मपदानें सांगितलें आहे. ' गति ' श्रुतींतील 'इत्या-'पदानें सांगितली आहे. त्याग प्रत्यक्ष सांगितलेला नाहीं. कारण ' पायु ' हें कर्मेंद्रियच त्यांत प्रत्यक्ष उक्त नाहीं. तथापि वर त्याचा उपस्थांत अन्तर्भाव करावा, असें आत्मपुराणकर्त्यांनीं सुचविलें आहे. येथील सुख श्रुतींत ' आनंद-रति-प्रजाति ' या शब्दांनीं उक्त आहे. हे कर्मेंद्रियांचे विषय इंद्रियावच्छिन्न प्रज्ञाभागानें कल्पिलेले आहेत. कारण दृष्टिसृष्टि वर सविस्तर सांगितलीच आहे ) ४६२. ' शब्द-स्पर्श-रूप-रस-गंधाः ज्ञानेंद्रियाहृताः विषयाः नियताः । ते हि लोकवेदयोः प्रसिद्धाः-' शब्द,

स्पर्श, रूप, रस, गंध हे ज्ञानेंद्रियांनीं आदरानें ग्रहण केलेले विषय नियत आहेत. ते सर्व लोक व वेद यांत प्रसिद्ध आहेत. ( त्यांतील स्पर्शाचा सुखदुःखामध्यें अंतर्भाव विवक्षित आहे ) ४६३. 'इह देहस्य विषयौ इति सुखदुःखे ईरिते । तथा अन्तःकरणस्य अपि कामाद्याः विषयाः श्रुताः-' येथें देहाचे विषय सुख व दुःख हे दोन सांगितले ( कारण देहाच्या बाहेर त्यांची उपलब्धि होत नाहीं. ) तसेच अन्तःकरणाचेही काम–इच्छाविशेष व संकल्पादिक विषय श्रुतींत जे श्रुत आहेत तेच येथें भूतमात्राशब्दानें सांगितलेले आहेत ४६४. ( त्यांनीं प्रज्ञेचे विभाग केले याविषयीं दृष्टान्त देतात–) 'यथा द्वादश गोपालाः सर्वे मिलिताः अपि एकां सुपयस्विनीं कामधेनुसमां गां स्वार्थसिद्ध्यर्थं दुहन्ति एवं ते वागाद्या अपि अदूदुहन्-' जसे बारा गवळी सर्व एकत्र मिळूनही एका पुष्कळ दूध देणाऱ्या, म्हणूनच कामधेनूसारख्या गायीचें, आपलें प्रयोजन सिद्ध होण्यासाठीं दोहन करितात त्याप्रमाणें ते वागादिकही एका प्रज्ञेचें दोहन करते झाले. त्यांनीं चिदाभासत्वानें प्रसिद्ध अशा प्रज्ञाभागांस केलें. 'अदूदुहत्' याचाच श्रुतींत 'अदूहळम्' असा विपरिणाम झाला आहे ४६५. ( एका प्रज्ञेचे उपाधिवशात् अनेक भेद होतात याविषयीं दृष्टान्त–) 'यथा द्वादशभिः काष्ठैः भिन्नां वह्नेः शिखां मनुजाः भिन्नां वदन्ति तद्वत् वयं एतैः इमां भिन्नां वदामः-' ज्याप्रमाणें बारा काष्ठांनीं भिन्न झालेल्या अग्नीच्या एकाच ज्वालेला मनुष्य भिन्न म्हणतात त्याप्रमाणें आम्ही–उपनिषद्वादी या प्रज्ञेला या वागादिकांनीं भिन्न केलेली म्हणतों. ४६६ ( ज्या ज्या इंद्रियानें जो जो प्रज्ञाभाग पृथक् केला तो तो इंद्रियाचा विषय त्या त्या इंद्रियाकडून प्रकाशित केला जातो, असा श्रुतींतील 'प्रतिविहिता' या पदाचा अर्थ दाखवितात–) 'यथा द्वादशभिः दीपैः इह विषयेषु द्वादशधा प्रकाशाः प्रजायन्ते तथा भूतेषु बोधनम्-' ज्याप्रमाणें बारा दीपांच्या योगानें येथील गृहादि विषयांमध्यें बारा प्रकारचे प्रकाश उत्पन्न होतात त्याप्रमाणें वागादि बारा इंद्रियांनीं भूतमात्रारूप विषयांमध्यें एकच प्रज्ञास्वरूप बारा प्रकारचें होतें. ( बारा रूपांनीं विषयांस प्रकाशमान करतें, असा भावार्थ. ) ४६७.

[ श्रुतिः—" प्रज्ञया वाचं समारुह्य वाचा सर्वाणि नामान्याप्नोति । प्रज्ञया प्राणं समारुह्य प्राणेन सर्वान् गंधान् आप्नोति । प्रज्ञया चक्षुः समारुह्य चक्षुषा सर्वाणि रूपाण्याप्नोति । प्रज्ञया श्रोत्रं समारुह्य श्रोत्रेण सर्वान् शब्दानाप्नोति । प्रज्ञया जिह्वां समारुह्य जिह्वया सर्वानन्नरसानाप्नोति । प्रज्ञया हस्तौ समारुह्य हस्ताभ्यां सर्वाणि कर्माण्याप्नोति । प्रज्ञया शरीरं समारुह्य शरीरेण सुखदुःखे आप्नोति । प्रज्ञयोपस्थं समारुह्योपस्थेनानन्दं रतिं प्रजातिमाप्नोति । प्रज्ञया पादौ समारुह्य पादाभ्यां सर्वा इत्या आप्नोति । प्रज्ञया धियं समारुह्य प्रज्ञयैव धियो विज्ञातव्यं कामानाप्नोति ॥६॥" (वर वर्णन केल्याप्रमाणें प्रज्ञेचा विभाग सांगून या खंडांत अविभाग सांगतात— ) 'प्रज्ञया-' वाणीनें स्वाधीन करून घेतलेल्या पूर्वोक्त संविदेनें 'वाचं-' वागिंद्रियावर 'समारुह्य-' तादात्म्यसंबंधानें आरोहण करून 'मीच वाक् आहें' अशा अभिमानास प्राप्त होऊन 'वाचा-' पूर्वोक्त प्रज्ञारूप इंद्रियानें 'सर्वाणि नामानि-' सर्व वक्तव्य नामांस—शब्दांस प्राप्त होते. (प्रज्ञेवाचून नुसत्या इंद्रियाला आपल्या विषयास प्राप्त होतां येत नाहीं. म्हणून जें ज्यावाचून उपलब्ध होत नाहीं तें तदात्मक असतें. जसा तंतूवाचून पट उपलब्ध होत नाहीं. म्हणून तो तन्त्वात्मक आहे. किंवा शिंपीवाचून उपलब्ध न होणारें रजत शिंपीच असतें, त्याप्रमाणें इंद्रियावांचून उपलब्ध न होणारा विषय इंद्रियात्मक आहे व प्रज्ञेवांचून उपलब्ध न होणारें इंद्रिय प्रज्ञात्मक आहे. हाच न्याय इतर विषय व इंद्रियें यांस लागू आहे, असें क्रमानें श्रुति सांगते— ) 'प्रज्ञया प्राणं०-' प्रज्ञेनें घ्राणेंद्रियाशीं तादात्म्यास प्राप्त होऊन घ्राणेंद्रियानें सर्व गंधांस प्रज्ञा प्राप्त होते. प्रज्ञेनें चक्षूंशीं तादात्म्य पावून चक्षूनें सर्व रूपांस प्रज्ञा प्राप्त होते. प्रज्ञेनें श्रोत्रेंद्रियावर आरूढ होऊन श्रोत्रानें सर्व शब्दांस प्राप्त होते. प्रज्ञेनें जिह्वेवर आरूढ होऊन 'तीच मी' असा अभिमान धरून जिह्वेनें सर्व अन्नरसांस प्राप्त होते. प्रज्ञेनें हस्तांवर आरोहण करून दोन्ही हातांनीं सर्व कर्मांस प्राप्त होते. प्रज्ञेनें शरीरावर आरोहण करून शरीरानें सुख व दुःख यांस प्राप्त होते. प्रज्ञेनें उपस्थावर आरोहण करून उपस्थानें आनंद, रति, प्रजाति यांस प्राप्त होते. प्रज्ञेनें दोन पायांवर आरोहण करून दोन पायांनीं

गतींस प्राप्त होते. प्रज्ञेनें बुद्धीवर आरोहण करून प्रज्ञेनेंच बुद्धि, विज्ञातव्य, काम यांस प्राप्त होते. ] ६

इदं द्वादशधा सर्वं ज्ञानकर्मेंद्रियात्मकम्॥ शरीरबुद्धिसहितं प्रज्ञातादात्म्यमागतम्॥ स्वं स्वं विषयमाप्नोति प्रज्ञाविरहितं न हि॥४६८॥

अर्थ—( प्रज्ञेचा अविभाग दाखविणाऱ्या वरील श्रुतिखंडाचें व्याख्यान आत्मपुराणकार पुढील एका श्लोकानें करितात— ) 'इदं सर्वं ज्ञानकर्मेंद्रियात्मकं शरीरबुद्धिसहितं द्वादशधा ( यत् उक्तं तत् ) प्रज्ञातादात्म्यं आगतं सत् स्वं स्वं विषयं आप्नोति । प्रज्ञाविरहितं न हि-' हें सर्व ज्ञान-कर्मेंद्रियात्मक करणजात शरीर व बुद्धि यांसह जें बारा प्रकारचें वर सांगितलें आहे तें प्रज्ञेशीं तादात्म्य पावून म्ह० मी वक्ता आहें, श्रोता आहें, द्रष्टा आहें, इत्यादि अभिमानरूप तादात्म्यास प्राप्त होऊन च आपापल्या नाम-रूप-शब्द इत्यादि विषयांस प्राप्त होतें. प्रज्ञेवाचून प्राप्त होत नाहीं. ( अर्थात् प्रज्ञेवाचून इंद्रियांचा अभाव होत असल्यामुळें व इंद्रियांच्या अभावीं विषयांचा अभाव होत असल्यामुळें विषय इंद्रियमात्र व इंद्रियें प्रज्ञामात्ररूप आहेत, त्यामुळें प्रज्ञेचा अविभाग सिद्ध झाला. घट मृन्मात्र असल्यामुळें मृत्तिकेचा जसा अविभाग —अभेद होतो त्याप्रमाणें. ) ४६८.(६)

[ श्रुतिः—" न हि प्रज्ञापेता वाङ्नाम किंचन प्रज्ञापयेत् । अन्यत्र मे मनोऽभूदित्याह । नाहमेतन्नाम प्राज्ञासिषमिति ॥ " ( अहो पण प्रज्ञा काय करावयाची आहे ? वागादि इंद्रियांकडूनच आपापला विषय जाणला जातो, अशी शंका घेऊन प्रज्ञारहित वागादिकांचा त्यांच्या त्यांच्या विषयांशीं संबंध जरी झाला तरी नुसत्या संबंधानेंच विषयाचें ज्ञान होऊं शकत नाहीं, ही गोष्ट सर्वानुभवसिद्ध आहे, असें श्रुति दाखविते—) 'हि-' ज्याअर्थी 'प्रज्ञापेता वाक्-' प्रज्ञारहित वागिंद्रिय 'किंचन नाम-' कोणतेंही वक्तव्य 'न प्रज्ञापयेत्-' स्वतःला किंवा दुसऱ्याला प्रकाशित करीत नाहीं. ( प्रज्ञारहित वाक् आपला व्यापार करूं शकत नाहीं आणि ती प्रज्ञेवाचूनच जर स्वव्यापार करूं लागली तर अविवक्षित किंवा असंबद्ध अर्थही बोलेल, असा भावार्थ. याविषयीं

सर्व लोकांचा अनुभव हेंच प्रमाण श्रुति देते--) 'अन्यत्र-' दुसऱ्या विषयामध्यें 'मे-' माझें म्ह० इंद्रियांचा स्वामी असा जो मी त्या माझें 'मनः-' अन्तःकरण, अशी जी बुद्धिवृत्ति तिचें जनक--आंतील ज्ञान-साधन अशा बुद्धिवृत्तीला उत्पन्न करणारें प्रज्ञासाक्षि 'अभूत्-' होतें, 'इति आह-' असें मनुष्य बोलतो. (मन अन्यत्र असल्यामुळें काय होतें तें श्रुति अनुभवी लोकांच्या म्हणण्याचा अनुवाद करून सांगते--) 'अहं-' मी इंद्रियांचा स्वामी 'एतत्-' तूं सांगितलेलें हें वाक्य --वागिंद्रियाचा विषय 'न प्राज्ञासिषम्-' उत्कृष्टरीतीनें जाणला नाहीं. (दुसऱ्याचें ज्ञान व अज्ञान जरी प्रत्यक्ष नसलें तरी त्याच्या भाषणा-वरून त्याचें अनुमान होऊं शकतें. अर्थात् प्रज्ञारहित वागिंद्रिय आपला व्यापार करूं शकत नाहीं आणि जशी वाक् तशींच इतर इंद्रियें वगैरे, असें सांगतात--) "न हि प्रज्ञापेतः प्राणो गन्धं कंचन प्रज्ञा-पयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह। नाहमेतं गन्धं प्राज्ञासिषमिति-" प्रज्ञा-रहित घ्राणेंद्रिय कोणत्याही गंधाचें ज्ञान करून देत नाहीं. 'माझें मन अन्य विषयामध्यें आसक्त होतें, मी या गंधाला जाणलें नाहीं' असें सांगतो. "न हि प्रज्ञापेतं चक्षू रूपं किंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभू-दित्याह नाहमेतद्रूपं प्राज्ञासिषमिति-" प्रज्ञारहित चक्षु कोणत्याही रूपाचें ज्ञान करून देत नाहीं. 'माझें मन अन्यत्र होतें. त्यामुळें मीं हें रूप जाणलें नाहीं,' असें सांगतो. "न हि प्रज्ञापेतं श्रोत्रं शब्दं कंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह। नाहमेतं शब्दं प्राज्ञासिष-मिति-" प्रज्ञारहित श्रोत्र कोणत्याही शब्दाचें ज्ञान करून देत नाहीं. 'माझें मन अन्यत्र होतें, त्यामुळें मीं या शब्दाला जाणलें नाहीं' असें सांगतो. "न हि प्रज्ञापेता जिह्वान्नरसं कंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽ भूदित्याह। नाहमेतमन्नरसं प्राज्ञासिषमिति-" प्रज्ञारहित रसनेंद्रिय कोणत्याही अन्नरसाचें ज्ञान करून देत नाहीं. 'माझें मन अन्यत्र होतें. त्यामुळें मीं या अन्नरसाला जाणलें नाहीं' असें मनुष्य म्हणतो. "न हि प्रज्ञापेतौ हस्तौ कर्म किंचन प्रज्ञापयेतामन्यत्र मे मनोऽभूदि-त्याह। नाहमेतत्कर्म प्राज्ञासिषमिति-" प्रजारहित हात कांहीं कर्माचें ज्ञान करून देत नाहींत. 'माझें मन अन्यत्र होतें, त्यामुळें मीं हें कर्म

जाणलें नाहीं,' असें मनुष्य सांगतो. "न हि प्रज्ञापेतं शरीरं सुखं दुःखं किंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतत्सुखं दुःखं प्राज्ञासिषमिति-" प्रज्ञारहित शरीर कांहींच सुख व दुःख यांचें ज्ञान करून देत नाहीं. 'माझें मन अन्यत्र होतें त्यामुळें मी हें सुख-दुःख जाणलें नाहीं' असें सांगतो. "न हि प्रज्ञापेत उपस्थ आनन्दं रतिं प्रजातिं कांचन प्रज्ञापयेत् । अन्यत्र मे मनोऽभूदित्याह । नाहमेतमानन्दं न रतिं न प्रजातिं प्राज्ञासिषमिति-" प्रज्ञारहित उपस्थ कोणताही आनंद, रति, प्रजाति यांचें ज्ञान करून देत नाहीं. माझें मन अन्यत्र होतें. त्यामुळें मी या आनंदाला रतीला व प्रजातीला जाणलें नाहीं, असें ह्मणतो. "न हि प्रज्ञापेतौ पादावित्यां कांचन प्रज्ञापयेतामन्यत्र मे मनोऽभूदित्याह । नाहमेतामित्यां प्राज्ञासिषमिति-" प्रज्ञारहित पाय कोणत्याही गतीचा अनुभव देत नाहीं. 'माझें मन अन्यत्र होतें त्यामुळें मीं कोणतीही गति जाणली नाहीं' असें मनुष्य म्हणतो. ज्ञातव्य विषय व काम बुद्धीवाचून उपलब्ध होत नाहीं, हें सर्वांना माहीत आहे. यास्तव श्रुति बुद्धीचाच स्वीकार करून म्हणते—"न हि प्रज्ञापेता धीः काचन सिध्येत् । न प्रज्ञातव्यं प्रज्ञायेत ॥७॥" विज्ञातव्य, काम इत्यादि भेदांनीं भिन्न असलेली कोणतीही धी म्ह० अन्तःकरणवृत्ति प्रज्ञारहित —असाक्षिक—साक्षिरहित सिद्ध होत नाहीं. म्ह० ती उत्पन्न होत नाहीं व जाणलीही जात नाहीं. प्रज्ञातव्य म्ह० बुद्धीचा विषयही साक्षि-प्रज्ञेवाचून जाणला जात नाहीं. यास्तव इंद्रियादिकांना प्रज्ञेची जशी अपेक्षा आहे तशीच प्रज्ञेला इंद्रियादिकांची बाह्य विषयाच्या ज्ञानासाठीं अपेक्षा जरी असली तरी प्रज्ञा सर्व ज्ञानाचा अधार आहे. तिच्या ठिकाणींच सर्व अध्यस्त आहे. यास्तव प्रज्ञेचीच उपासना करावी. ] ७

ज्ञानकर्मेंद्रियाणीह शरीरं धिषणा तथा ॥
प्रज्ञाबलेन जानन्ति स्वबलेन न किंचन ॥ ४६९ ॥
यतो भवन्ति वक्तारो नाज्ञासिष्म वयं त्विदम् ॥
उक्तं दृष्टं सुखं बुद्धमासीदत्र मनो न नः ॥ ४७० ॥

अर्थ—( वागादिक प्रज्ञेवांचूनच विषयाला प्रकाशित कां करीत

नाहींत, म्हणून म्हणशील तर सांगतात-) 'इह ज्ञानकर्मेंद्रियाणि शरीरं तथा धिषणा प्रज्ञाबलेन जानन्ति । स्वबलेन न किंचन-' येथें ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, शरीर, अंतःकरण अशीं हीं बारा करणें प्रज्ञेच्या बळानेंच जाणतात आपल्या बळानें जाणत नाहींत. जाणणें हें प्रज्ञेचेंच सामर्थ्य आहे, इंद्रियांचें नव्हे. कारण प्रज्ञेला अपाय झाला असता विषयाचा प्रकाश होत आहे, असें अनुभवास येत नाहीं ४६९.( या विषयीं लोकांचा अनुभव कसा आहे तें सांगतात-) 'यतः एवं वक्तारः भवन्ति-' कारण लोक असें बोलतात. ( असें कसें ?) 'उक्तं अपि इदं नाम न अज्ञासिष्म-' तुम्हीं बोललेलेंही हें नाम-हा शब्द आम्हांला ऐकूं आला नाहीं. 'दृष्टं सुखं बुद्धं-' त्याचप्रमाणें चक्षूनें पाहिलेलें व शरीरानें सुख घेतलेलें आम्हांला कळलें नाहीं. कारण 'नः अत्र मनः न आसीत्-' आमचें मन त्यांत नव्हतें, तें त्यावेळीं दुसऱ्या कोठें होतें. त्यामुळें इंद्रियांचा व्यापार जरी झाला तरी चित्प्रतिबिंब ग्रहण करणाऱ्या प्रज्ञेचा जर अभाव असला तर विषयप्रकाश होत नाहीं, ही गोष्ट सर्वानुभवसिद्ध आहे. ४७०. ( या सर्व विवेचनावरून प्रज्ञेचा अद्वितीयतारूप अविभाग कसा सिद्ध होतो तें दाखवितात-)

विषया द्वादशैवैते करणैः संगता अपि ॥
प्रज्ञाविरहिता यस्मात्प्रतीयन्ते न कर्हिचित् ॥ ४७१ ॥
ततः प्रज्ञैवैकरूपा प्राणतादात्म्यमागता ॥
अन्वयव्यतिरेकाभ्यां करणानां विबोधिनी ॥ ४७२ ॥

अर्थ—' एते विषयाः द्वादश एव करणैः संगताः अपि यस्मात् प्रज्ञाविरहिताः कर्हिचित् न प्रतीयन्ते ततः प्रज्ञा एकरूपा एव प्राणतादात्म्यं आगता । अन्वयव्यतिरेकाभ्यां करणानां विबोधिनी-' हे नाम-रूपादि बाराच विषय इंद्रियांशीं जरी संबद्ध झाले तरी ज्यापक्षीं प्रज्ञेवांचून केव्हांही प्रतीत होत नाहींत म्ह० मृत्तिकेवाचून मातीचा घट जसा प्रतीत होत नाहीं त्याप्रमाणें प्रज्ञेवांचून प्रतीत होत नाहींत त्याअर्थी इंद्रियें व विषय प्रज्ञामात्र आहेत. त्यामुळें प्रज्ञा एकरूपच आहे, हें सिद्ध झालें. ( प्राणाचा तिच्याहून भेद आहे, म्हणून म्हणाल तर

असेंही नाहीं. कारण ' प्राण व प्रज्ञा बरोबरच राहतात व बरोबर शरीर सोडून जातात ' अशा श्रुतिवचनानें त्यांचा अभेद सांगितलेला असल्या-मुळें ) ती प्राणतादात्म्यास प्राप्त झाली आहे. ( ' अहोपण जिचें तुम्ही एकरूपत्व सांगत आहां ती प्रज्ञा कोणती ' असें विचाराल तर सांगतों— ) जी आपल्या अन्वय-व्यतिरेकांनीं इंद्रियांमध्यें सामर्थ्य उत्पन्न करणारी तीच प्रज्ञा होय ४७१, ४७२. (७)

[ श्रुतिः—"न वाचं विजिज्ञासीत । वक्तारं विद्यात् ।" ( याप्रमाणें इंद्रियें व प्रज्ञा यांचा जर अभेद आहे तर ' तं मामायुरमृतमित्युपास्व-' येथें सांगितल्याप्रमाणें वागादि इंद्रियेंच उपासना करण्यास योग्य होतील म्हणून कोणी म्हणेल तर श्रुति सांगते— ) ' वाचं न विजिज्ञासीत-' वागिंद्रियाची उपासना कर असें जाणूं नये, असा विचार करूं नये तर ' वक्तारं-' वागिंद्रियाचा प्रेरक सर्व इंद्रियवृत्तींचा साक्षी जो आनंदात्मा त्याला ' विद्यात्-' तो प्रज्ञात्मा प्राण वक्ता आयु अमृत आहे, असें जाणावें " न गन्धं विजिज्ञासीत् । घ्रातारं विद्यात्-" गंधाला जाणूं नये, तर गंध घेणारा जो आनंदात्मा त्याला जाणावें, त्याची उपासना करावी. " न रूपं विजिज्ञासीत रूपाविदं विद्यात्-" रूपाला जाण-ण्याची इच्छा करूं नये तर रूपवेत्त्याला जाणावें. " न शब्दं विजिज्ञा-सीत श्रोतारं विद्यात्-" शब्दाला जाणण्याची इच्छा करूं नये तर श्रोत्याला जाणावें. " न अन्नरसं विजिज्ञासीत् । अन्नरसस्य विज्ञातारं विद्यात्-" अन्नरसाला जाणण्याची इच्छा करूं नये तर अन्नरसाच्या विज्ञा-त्याला जाणावें.' न कर्म विजिज्ञासीत कर्तारं विद्यात्-' कर्माला जाणण्याची इच्छा करूं नये. कर्त्याला जाणावें. ' न सुखदुःखे विजिज्ञासीत सुखदुःखयो-र्विज्ञातारं विद्यात्-' सुख व दुःख यांना जाणण्याची इच्छा करूं नये, तर सुख व दुःख यांच्या विज्ञात्याला जाणावें. " नानन्दं न रतिं न प्रजातिं विजिज्ञासीत । आनन्दस्य रतेः प्रजातेः विज्ञातारं विद्यात्-" आनंद, रति व प्रजाति यांस जाणण्याची इच्छा करूं नये, तर आनन्द, रति व प्रजाति यांच्या विज्ञात्याला जाणण्याची इच्छा करावी. " न इत्यां विजि-ज्ञासीत । एतारं विद्यात्-" गतीला जाणण्याची इच्छा करूं नये, गमन करणाराला जाणण्याची इच्छा करावी. ( याप्रमाणें आठ विषयांचा निषेध

करून विषयी आत्म्याचीच उपासना करावी, असें सांगून पहिल्या पर्यायांत वाक्-इंद्रियाचा निषेध करून त्याच्या स्वामीला जाणावें हें जसें सांगितलें तसेंच आतां शेवटच्या पर्यायांतही सांगतात- ) " न मनो विजिज्ञासीत । मन्तारं विद्यात् । " ' मन या इंद्रियाची उपासना कर ' असें समजूं नये तर मनाचा प्रेरक सर्वेंद्रियवृत्तिसाक्षी जो आनंदात्मा त्यास जाणावें. तोच मी प्राण प्रज्ञात्मा मन्ता आयु अमृत आहें, असें जाणावें, अशी उपासना करावी. ]

प्राणप्रज्ञास्वरूपं मां ततो विद्धि प्रतर्दन ॥
मा ते भवतु संदेहो वक्तारं वाग्विवर्जितम् ॥ ४७३ ॥

एवं द्वादशधा योऽयं करणग्राम ईरितः ॥
तत्र सर्वत्र कर्तारं करणग्रामवर्जितम् ॥ ४७४ ॥

अर्थ—( ' अहो पण वर सांगितल्याप्रमाणें प्रज्ञेला सर्वात्मत्व असल्यास विषयांसह वागादिक इंद्रियेंही तिचींच रूपें आहेत, यास्तव त्यांच्याच ठिकाणीं आत्मत्वबुद्धि करण्यास काय हरकत आहे ? ' म्हणून म्हणाल तर वागादिक प्रज्ञारूप जरी असलीं तरी त्यांना संपूर्णता नाहीं. तीं परिच्छिन्न—एकदेशी—प्रज्ञेच्या विभागरूप आहेत. यास्तव प्रज्ञेचें जें इंद्रियादिकांनीं अवच्छिन्न न झालेलें पूर्ण स्वरूप त्याच्याच ठिकाणीं ' मी प्रज्ञात्मा प्राण आहें ', अशा रीतीनें अहंबुद्धि करावी, अशा अर्थाच्या वरील श्रुतीचें व्याख्यान या दोन श्लोकांनीं करितात- ) ' हे प्रतर्दन ! ततः ते संदेहः मा भवतु मां प्राणप्रज्ञास्वरूपं वाग्विवर्जितं वक्तारं विद्धि-' हे प्रतर्दना ! प्रज्ञेला सर्वात्मकत्व असल्यामुळें वागादिकही आत्मत्वानें उपास्य आहेत, असा तुला संदेह न येवो. तर मी प्राणप्रज्ञास्वरूप—पूर्ण वागिंद्रियशून्य वक्ता आहें असें जाण, अशी उपासना कर ४७३.( याप्रमाणें विषय व इंद्रियें यांपासून पृथक् जाणून अवशिष्ट राहिलेल्या रूपाची आत्मत्वानें उपासना करावी असें सांगतात- ) ' एवं द्वादशधा यः अयं करणग्रामः ईरितः तत्र सर्वत्र कर्तारं करणग्रामवर्जितं कृत्वा अवशिष्टं जानीयात्-' अशा रीतीनें बारा प्रकारचा जो हा इंद्रियसमुदाय सांगितला आहे त्यानें विशिष्ट असा जरी कर्ता असला तरी त्याला

इंद्रियसमुदायाहून रहित करून बाकी राहिलेल्या त्याची उपासना करावी ४७४.

[ श्रुतिः—" ता वा एता दशैव भूतमात्रा अधिप्रज्ञं दश प्रज्ञामात्रा अधिभूतं । यद्धि भूतमात्रा न स्युर्न प्रज्ञामात्राः स्युर्यद्वा प्रज्ञामात्रा न स्युर्न भूतमात्राः स्युः न ह्यन्यतरतो रूपं किंचन सिध्येत् । नो एतन्नाना ॥ " ( याप्रमाणें सर्व इंद्रियें व विषय यांच्या साक्षीचें ज्ञान सांगून प्रसंगतः सर्व अनर्थांचें मूळ असें हें संसारचक्र परस्पर सापेक्ष असलेल्या इंद्रिय विषयांच्या योगानें प्रवृत्त होतें, पण त्यांतील कांहीं तरी एक नाहींसें झालें तर तें प्रवृत्त होत नाहीं अशा अभिप्रायानें श्रुति म्हणते— ) 'ताः-' त्या संसारचक्राच्या मूळभूत अशा 'एताः वै' ह्या प्रसिद्ध असलेल्या प्रत्यक्ष व अनुमेय 'दश एव-' दहाच 'भूतमात्राः-' वक्तव्यादि विषय आहेत. 'अधिप्रज्ञं-' त्या प्रज्ञानें म्ह० इंद्रियें, यांना उद्देशून प्रवृत्त होतात. 'दश प्रज्ञामात्राः अधिभूतम्-' दहा इंद्रियें भूतांना–विषयांना उद्देशून प्रवृत्त होतात. 'यत्-' जर 'हि' ह्या प्रसिद्ध 'भूतमात्राः' भूतमात्रा 'न स्युः-' नसल्या तर 'प्रज्ञामात्राः न स्युः-' प्रज्ञामात्रा नसतात म्ह० इंद्रियें निर्विषय होतात व 'यद्वा प्रज्ञामात्राः०-' जर प्रज्ञामात्रा नसल्या तर भूतमात्रा नसतात. म्ह० विषय इंद्रियरहित होतात. त्यांचें ग्रहण होत नाहीं. 'हि-' कारण 'अन्यतरतः-' प्रज्ञामात्रा व भूतमात्रा यांच्यापैकीं कोणत्या तरी एकाच्याच योगानें 'किंचन रूपं न सिध्येत्-' कोणतेंच रूप सिद्ध होत नाहीं. म्ह० विषय विषयाच्याच योगानें किंवा इंद्रिय इंद्रियाच्याच योगानें ज्ञात होत नाहीं. 'तर मग परस्पर सापेक्ष इंद्रियें व विषय यांच्या योगानें प्रज्ञेचाही भेद होईल व तो झाल्यावर 'प्रज्ञायां सर्वाणि भूतानि एकं भवन्ति-' ही प्रतिज्ञा व्याहत होईल' म्हणून म्हणाल तर श्रुति सांगते—'नो एतन्नाना-' हें प्रज्ञामात्रा-भूतमात्रारूप नाना-भेदवान् नाहीं. ]

( याप्रमाणें श्रुतींतील 'प्राण-'पद अद्वितीयार्थपर व 'प्रज्ञा-'पद 'सर्वान्तर' या अर्थपर आहे, हें दाखविलें. आतां त्या दोघांनाही त्रिविधपरिच्छेदशून्यरूप अखंडार्थपरत्व आहे हें स्पष्ट करण्यासाठीं प्रपंच-

मिथ्यात्व दाखविणाऱ्या वरील श्रुतीचा अर्थ पुढील पंधरा श्लोकांनीं आत्म-पुराणकार सांगतात— )

करणं द्वादशविधं व्यापारेणात्मनस्तथा ॥
सहितं वेत्ति यः प्राणस्तं मां जानीहि नापरम् ॥ ४७५ ॥
करणं द्वादशविधं तावांश्च विषयोऽपि हि ॥
भिन्नं नान्योन्यमप्येतत्प्रज्ञयास्य कुतो भिदा ॥ ४७६ ॥

अर्थ—'आत्मनः व्यापारेण सहितं द्वादशविधं करणं यः प्राणः वेत्ति तं मां जानीहि न अपरम्.' आपल्या म्ह० इंद्रियांच्या दर्शन-भाषण-रसन-स्पर्शन-श्रवणादि व्यापारांसह व विषयांसह बारा प्रकारच्या इंद्रियसमूहाला जो प्राण प्रकाशित करतो तोच मी इंद्र आहें, आणखी दुसरा कोणी मी नव्हे असें जाण. ४७५. (' अहो पण त्याला अद्वितीयता कशी ? कारण प्रकाशकाहून प्रकाश्य—विषय भिन्नच असतो,' म्हणून म्हणाल तर सांगतात— ) ' द्वादशविधं करणं च तावान् विषयः अपि हि एतत् अन्योन्यं अपि न भिन्नं । अस्य प्रज्ञया भिदा कुतः.' प्रज्ञा-मात्रा या नांवाचें बारा प्रकारचें इंद्रियजात व तेवढाच म्ह० बारा प्रकारचाच विषयही, हें दोन्ही इंद्रिय-विषयरूप परस्परही जर भिन्न संभवत नाहीं, तर मग त्यांचा प्रज्ञेशीं भेद कोठून असणार ? ( कारण प्रज्ञा त्या दोघांचेंही अधिष्ठान आहे. त्यामुळें त्या दोघांनाही तिची अपेक्षा आहे. प्रज्ञेची अत्यंत अपेक्षा असल्यामुळेंच इंद्रिय व विषय मिथ्या आहेत. म्हणून प्रज्ञेहून तीं भिन्न आहेत, असें निरूपण करतां येत नाहीं. ) ४७६. ( विषय व इंद्रियें यांची परस्पर सापेक्षता व्यक्त करितात— )

विषयो द्वादशविधो भूतमात्रात्मको हि यः॥ करणग्राममाश्रित्य संसिद्धो नान्यथा क्वचित् ॥ ४७७ ॥ एवं हि करणग्रामः प्रज्ञामात्रात्मको हि यः॥ नासौ निर्विषयः सिद्ध्येत्करणं नास्ति-तादृशम् ॥ ४७८ ॥ करणं विषयो वापि यद्येको नापरो भवेत् ॥ तस्य तत्त्वं विहन्येत ह्यन्यापेक्षमिदं द्वयम् ॥४७९॥ पुत्रः पितेति संज्ञेयं नाभात्रे पितृपुत्रयोः ॥ यथा तथैव संज्ञेयं

विषयः करणं त्विदम् ॥ ४८० ॥ विषयः करणापेक्षः करणं विषयं तथा ॥ अपेक्षते यतस्तेन नान्याभावात्परं भवेत् ॥ ४८१ ॥ शरीरमंतःकरणं विहाय करणद्वयम् ॥ सुखदुःखे तथा बुद्धिकामाद्यांश्च विहाय हि ॥ दशेति वचनं ज्ञेयं श्रुतेर्बा-ह्येंद्रियार्थयोः ॥ ४८२ ॥ सापेक्षाणि न सिद्ध्यन्ति ह्यन्योन्या-पेक्षयैव हि ॥ किं त्वन्यनिरपेक्षं तमाश्रित्यैनामवाप्नुयुः ॥ ४८३ ॥ रज्जुसर्पधियौ यद्वत्सापेक्षे नैव सिद्ध्यतः ॥ अन्योन्यं रज्जुमेवैकामनपेक्षां विहाय हि ॥ ४८४ ॥

अर्थ—'यः भूतमात्रात्मकः द्वादशविधः विषयः सः करणग्रामं आश्रित्य सिद्धः अन्यथा न क्वचित्-' जो भूतमात्रात्मक बारा प्रकारचा विषय तो इंद्रियसमूहाचा आश्रय करूनच सिद्ध होतो त्यावाचून केव्हां-ही सिद्ध होत नाहीं ४७७.'एवं हि यः प्रज्ञामात्रात्मकः करणग्रामः असौ निर्विषयः न सिध्येत् । करणं तादृशं नास्ति-' त्याचप्रमाणें जो प्रज्ञा-मात्रात्मक इंद्रियसमुदाय तो विषयावांचून सिद्ध होत नाहीं. इंद्रियही विषयावाचून सिद्ध होत नाहीं. (कारण करण-साधन म्हणून म्हटलें कीं कोणाचें अशी त्याच्या विषयाची अपेक्षा होते. तात्पर्य विषयरूप भूत-मात्रा प्रज्ञामात्रेच्या अधीन असते व इंद्रियरूप प्रज्ञामात्रा भूतमात्रेच्या अधीन असते.) ४७८. (त्यामुळें) 'करणं वा विषयः अपि यदि एकः भवेत् अपरः न भवेत् तदा तस्य तत्त्वं विहन्येत । हि इदं द्वयं अन्या-पेक्षम्-' विषय किंवा इंद्रिय यांतील जर एक कांहीं तरी असून दुसरें नसेल तर त्याचें तत्त्व म्ह० करणत्व किंवा विषयत्वच नाहींसें होईल. विषयरहित इंद्रियाला इंद्रिय म्हणतां येणार नाहीं व इंद्रियरहित विष-याला विषय म्हणतां येणार नाहीं. कारण हीं दोन्ही परस्परांची अपेक्षा करणारीं आहेत. ४७९ 'पितृपुत्रयोः अभावे पुत्रः पिता इति इयं संज्ञा यथा न भवेत् तथा एव तु विषयः इदं करणं इति इयं संज्ञा न-' पिता व पुत्र यांतील एकाच्या अभावीं पुत्र व पिता ही संज्ञाच जशी प्राप्त होत नाहीं त्याप्रमाणेंच विषय व हें करण ही संज्ञाही प्राप्त होत नाहीं. ४८० 'विषयः करणापेक्षः तथा करणं विषयं यतः अपेक्षते तेन अन्याभावात् परं न भवेत्-' विषय इंद्रियसापेक्ष असतो, तसेंच इंद्रिय

विषयाची ज्याअर्थीं अपेक्षा करतें त्याअर्थीं एकाच्या अभावीं दुसऱ्याचा अभावच होतो. ४८१. ( अहो पण श्रुतींत भूतमात्रारूप विषय दहा सांगितले व येथें तुम्ही बारा सांगतां, हें कसें ? उत्तर–) 'शरीरं अन्तः-करणं इति करणद्वयं विहाय तथा सुखदुःखे बुद्धिकामाधानं च विहाय बाह्येंद्रियार्थयोः दश इति श्रुतेः वचनं ज्ञेयं-' शरीर व अन्तःकरण हीं दोन आंतील विषयांचा बोध करून देणारीं इंद्रियें सोडून त्याचप्रमाणें सुखदुःख हा शरीराचा विषय व ज्ञातव्य-काम संकल्पादिरूप अंतः-करणाचा विषय सोडून बाह्य इंद्रियें व बाह्य विषय यांनाच उद्देशून श्रुतीचें दहा हें वचन आहे, असें जाणावें. ४८२ ( 'अहो पण इंद्रियें व विषय याप्रमाणें परस्पर सापेक्ष जरी असलीं तरी त्यांची सिद्धि त्या परस्परांमुळेंच होईल. अर्थात् त्यांची सत्ता व भान यांसाठीं तिसऱ्याची अपेक्षा नाहीं. म्हणजे त्यावरून आत्मा सिद्ध होत नाहीं,' म्हणून म्हणाल तर सांगतात– ) 'सापेक्षाणि अन्योन्यापेक्षया एव न सिद्ध्यन्ति किंतु अन्यनिरपेक्षं तं आश्रित्य एनां अवाप्नुयुः-' ज्या ज्या सापेक्ष वस्तु आहेत त्या त्या परस्परांच्या अपेक्षेमुळेंच–त्यांना परस्परांची अपेक्षा असल्यामुळेंच सिद्ध होत नाहींत. सत्ता-भानरूप सिद्धीस प्राप्त होत नाहींत. तर त्या दुसऱ्या कोणाची अपेक्षा न करणाऱ्या व स्वातिरिक्त–स्वतःहून भिन्न असलेल्या कोणत्या तरी भावाची अपेक्षा करूनच स्वरूपसिद्धीस प्राप्त होतात ४८३. ( यानिषयीं दृष्टान्त– ) 'यद्वत् रज्जुसर्पधियौ सापेक्षे एकां अनपेक्षां रज्जुं एव विहाय अन्योन्यं न एव सिद्ध्यतः-' ज्याप्रमाणें 'हा सर्प' या भ्रमांत 'इदंपदार्थ' म्ह० 'हा' अशा रीतीनें भासणारी रज्जु विशेष्यतेनें भासते व सर्प प्रकार-तेनें भासतो. पण 'सर्प हा' या भानांत याच्या उलट प्रकार भासतो. त्यामुळें रज्जुबुद्धि व सर्पबुद्धि सापेक्ष आहेत. पण त्या निरपेक्ष व एक अशा रज्जूला सोडून परस्परच सिद्ध होत नाहींत. तर रज्जूच्या आश्रयानें-च सिद्ध होतात. ( त्याच न्यायानें दार्ष्टांतिकांतही सापेक्ष इंद्रियें व विषय स्वसिद्धीकरितां ज्याची अपेक्षा करितात तो निरपेक्ष व एक आत्मा सिद्ध झाला. त्याचप्रमाणें सापेक्ष असणें याच दोषामुळें इंद्रियें व विषय यांचें मिथ्यात्व सिद्ध झालें. ) ४८४.

विषयाः करणैः सार्धं न भिन्नास्ते परस्परम् ।। आश्रयाच्च सदैवैते सापेक्षत्वेन हेतुना ।। ४८५ ।। सापेक्षं न मिथो भिन्नं नाश्रयाच्च कथंचन ।। सर्पज्ञानादिकं यद्वत्स्वयं वा रज्जुतोऽपि वा ।। ४८६ ।। विषयाः सर्व एवैते स्वज्ञानान्न पृथक् क्वचित् ।। रज्जुसर्पस्य विज्ञानाद्यथा नान्योऽस्त्यसौ फणी ।। ४८७ ।। कारणादुत्थितानीह जडानि करणैः सह ।। विषयाश्रयभूतानि विज्ञानानि तु देहिनाम् ।। ४८८ ।। विज्ञानद्रष्टृतः प्राणान्न भिन्नानीति कर्हिचित् ।। स्वप्नविज्ञानवद्द्रष्टा प्राज्ञः प्राणस्ततोऽस्ति हि ।। ४८९ ।।

अर्थ—( 'नो एतन्नाना' एवढयाच वरील श्रुतिभागाचें व्याख्यान– ) 'ये करणैः सार्धं विषयाः उक्ताः ते परस्परं आश्रयात् च सदा एव एते सापेक्षत्वेन हेतुना न भिन्नाः-' जे इंद्रियांसह विषय सांगितलेले आहेत ते परस्पर व आपल्या आश्रयाहून सदाच सापेक्षत्व या हेतूनें भिन्न नाहींत. ( 'ते परस्पर व आश्रयाहून भिन्न नाहींत,' ही प्रतिज्ञा व 'सदाच साक्षेप असल्यामुळें' हा हेतु. ) ४८५. 'साक्षेपं मिथः आश्रयात् च कथंचन न भिन्नं सर्पज्ञानादिकं यद्वत् स्वयं वा रज्जुतः अपि वा न भिन्नं तथा-' जें जें सापेक्ष असतें तें तें परस्पर व आश्रयाहून कोणत्याही रीतीनें भिन्न नसतें. जसें वर सांगितलेलें रज्जुसर्पज्ञानादि स्वतः—परस्पर किंवा आश्रयभूत रज्जुस्वरूपाहून भिन्न भिन्न नसतें ४८६. 'सर्वे एते विषयाः स्वज्ञानात् क्वचित् न पृथक् एव । यथा रज्जुसर्पस्य विज्ञानात् असौ फणी अन्यः न अस्ति-' हे सर्व विषय आपापल्या ज्ञानाहून केव्हांही पृथक् नसतात. जसें रज्जुसर्पाच्या ज्ञानाहून हा—रज्जुसर्प भिन्न नसतो ४८७. 'इह करणात् उत्थितानि करणैः सह वर्तमानानि जडानि देहिनां विषयाश्रयभूतानि विज्ञानानि विज्ञानद्रष्टृतः प्राणात् कर्हिचित् स्वप्नविज्ञानवत् न भिन्नानि । ततः द्रष्टा प्राज्ञः प्राणः अस्ति हि-' येथें करणापासून उत्पन्न झालेलीं म्हणूनच जड—वृत्तिरूप करणांसह असणारीं व विषयांचीं आश्रयभूत, अशीं जीं प्राण्यांचीं विज्ञानें तीं सर्व विज्ञानांचा द्रष्टा—प्रकाशक जो प्राण—प्राणपदाचा लक्ष्य अर्थ त्याहून केव्हांही भिन्न

नाहींत. जशीं स्वप्नांतील विज्ञानें विषयांसह द्रष्टा जो साक्षी त्याहून भिन्न नसतात त्याप्रमाणें तीं साक्षींहून भिन्न नाहींत. म्हणून जो सर्व-द्रष्टा प्राज्ञ--प्रज्ञा व प्राण यांनीं उपलक्षित होणारा प्राज्ञ प्राण तोच एक आहे. त्याहून दुसरा कोणी नाहीं, हें सिद्ध झालें ४८८, ४८९.

[ श्रुतिः—" तद्यथा रथस्यारेषु नेमिरर्पिता नाभावरा अर्पिता एवमेवैता भूतमात्राः प्रज्ञामात्रास्वर्पिताः प्रज्ञामात्राः प्राणेऽर्पिताः स एष प्राण एव प्रज्ञात्माऽऽनन्दोऽजरोऽमृतः ॥ " ( नानात्वाच्या अभावाची प्रतिज्ञा करून त्याविषयीं दृष्टान्त सांगतात— ) ' तत्-' त्याविषयीं दृष्टान्त—' यथा-' ज्याप्रमाणें ' रथस्य अरेषु-' रथचक्राच्या अरांमध्यें ' नेमिः-' धांव ' अर्पितः-' अर्पिलेली असते ( नेमि अरांवर राहते ) ' नाभौ अराः अर्पिताः-' नाभीमध्यें--मध्यवर्ती तुंब्यामध्यें अर अर्पिलेले असतात ' एवमेव-' त्याप्रमाणेंच ' एताः भूतमात्राः-' हे उपलब्ध होणारे विषय—नेमिस्थानीय विषय ' प्रज्ञामात्रासु-' अरस्थानीय इंद्रियांमध्यें ' अर्पिताः-' प्रतिष्ठित आहेत. ' प्रज्ञामात्राः-' अररूप इंद्रियें ' प्राणे-' मुखनासिकांतून संचार करणाऱ्या नाभिस्थानीय प्राणांत ' अर्पिताः-' प्रतिष्ठित आहेत. ' सः एषः प्राणः एव०-' तो हा प्राणोपाधिक प्राणच प्रज्ञात्मा आनंद अजर अमृत आहे. स्वयंप्रकाश विज्ञान आनन्दात्मस्वरूप व सर्व विक्रियाशून्य आहे. रथाच्या चक्राच्या मध्यभागीं जें वर्तुळाकार काष्ठ असतें व ज्यांत चाकाचे अर ठोकून बसविलेले असतात ती नाभि, त्यांत ठोकून बसविलेलीं जीं लांब लांब पातळ कांबीसारखीं काष्ठें ते अर, त्यांच्या सभोंवार वर्तुळाकार ठोकून बसविलेली जी पातळ धांव ती नेमि होय. ]

चक्रस्यारेषु लोकेऽस्मिन्नेमिर्यद्वत्प्रतिष्ठितः॥ नाभावराः स्थिता नैव नाभिः कुत्रापि संस्थितः ॥ ४९० ॥ विषयाः करणेष्वेवं करणानि मयीश्वरे॥ प्रज्ञास्वरूपे प्राणेऽस्मिन्नहं क्वापि न संश्रितः ॥ ४९१ ॥ विषयेंद्रियरूपस्य विश्वचक्रस्य सर्वदा ॥ अहं नाभिरिति प्रोक्तो ह्यनन्याश्रयहेतुतः ॥ ४९२ ॥ विषयो विषयी चेति द्वयं संसार ईरितः ॥ अस्य सर्वस्य विज्ञाता प्रज्ञाप्राणो-

ऽहमीरितः ॥ ४९३ ॥ मत्तः प्राणात्मनः प्राज्ञादिदं सर्वं विनिर्गतम् ॥ सदसद्रूपकं विश्वं यत्र मुह्यन्ति सूरयः ॥ मय्यस्ति च तथान्तेऽपि लयमेष्यति मय्यदः ॥ ४९४ ॥ यथैकस्माच्छिशोरेव सृष्टिस्थितिलयाः सदा ॥ राक्षसस्य भवन्त्येवं मत्तो विश्वस्य सर्वदा ॥ ४९५ ॥ एकस्मिन्नेव नभसि सर्वभेदविवर्जिते ॥ यथा भेदाः प्रतीयन्ते मयि भेदास्तथा इमे ॥ ४९६॥ पटे समे यथा चित्रदृष्टौ विषमधीर्भवेत् ॥ एवं मयि समे प्राणे विश्वदृष्टौ विभेदधीः ॥ ४९७ ॥

अर्थ—'अस्मिन् लोके चक्रस्य अरेषु यद्वत् नेमिः प्रतिष्ठितः नाभौ अराः स्थिताः नाभिः कुत्र अपि न एव संस्थितः-' या लोकीं चक्राच्या अरांमध्यें जशी नेमि प्रतिष्ठित असते, नाभींत अर प्रतिष्ठित असतात व नाभि कोठेंही प्रतिष्ठित नसते ४९० 'एवं विषयाः करणेषु करणानि मयि ईश्वरे अस्मिन् प्रज्ञास्वरूपे प्राणे अहं क्व अपि न संश्रितः-' त्याचप्रमाणें विषय इंद्रियांमध्यें, इंद्रियें मज ईश्वरामध्यें म्ह० या प्रज्ञास्वरूप प्राणामध्यें प्रतिष्ठित आहेत. मी कोठेंही संश्रित नाहीं ४९१.'अहं विषयेंद्रियरूपस्य विश्वचक्रस्य सर्वदा अनन्याश्रयहेतुतः नाभिः इति प्रोक्तः अस्मि-' मी कार्यरूप विषय व करणरूप इंद्रियें, यांचा समुदाय एतद्रूप अशा या सर्व संसारचक्राचा 'नाभि-' आश्रय आहें, असें म्हटलेलें आहे. कारण मी सर्वदा अनन्याश्रय आहें. [म्ह० माझा दुसरा कोणी आश्रय नाहीं. चाकाच्या नाभीला जसा दुसरा आश्रय नसतो तर तीच सर्व चक्राचा आश्रय असते तसा माझा दुसरा कोणी आश्रय नाहीं. मी सर्वांचा आश्रय आहें ] ४९२. ( तथापि नाभि व प्राज्ञ यांतील वैधर्म्य सांगतात- ) 'विषयः विषयी च इति द्वयं संसारः ईरितः। अस्य सर्वस्य विज्ञाता प्रज्ञाप्राणः अहं ईरितः-' नाम, रूप इत्यादि विषय व करणत्वानें सांगितलेला समष्टि-व्यष्टिरूप विषयीं हें द्वय एवढाच काय तो हा सर्व संसार आहे. या सर्व संसाराचा विज्ञाता—भासक मी प्रज्ञा-प्राणोपलक्षित आत्मा सांगितलेला आहें ४९३. 'मत्तः प्राणात्मनः प्राज्ञात् इदं सर्वं सदसद्रूपकं विश्वं विनिर्गतं। यत्र सूरयः मुह्यन्ति । मयि अस्ति

तथा अन्ते अपि अदः मयि लयं एष्यति-' मी जो प्राणात्मा प्राज्ञ त्या मजपासून हें सर्व सदसद्रूप विश्व उद्भवलें. ज्या विश्वामध्यें मोठमोठे विद्वान्ही मोहित होतात तें मजमध्येंच आहे व शेवटींही हें विश्व मजमध्येंच लय पावेल. ( प्राज्ञ म्ह० कार्यरूप उपाधिभूत प्रज्ञा व निस्य स्वरूपभूत प्रज्ञा ज्याची आहे तो प्राज्ञ—रथचक्राची नाभि केवळ संयोगद्वारा अर व नेमि यांचा आश्रय होते पण मी विवर्तरूप प्रपंचाची सत्ता व भान यांचें कारण—अभिन्ननिमित्तोपादन आहें. त्यामुळें त्रिकाळीं विश्वाचा आश्रय आहें. अर्थात् श्रुतींतील नाभीचा दृष्टान्त एकदेशी आहे. ) ४९४. ( मी विवर्त्तोपादान आहें, याविषयीं दृष्टान्त— ) ' यथा एकस्मात् शिशोः एव सदा राक्षसस्य सृष्टि-स्थिति-लयाः भवन्ति एवं मत्तः विश्वस्य सृष्टि-स्थिति-लयाः सर्वदा भवन्ति-' ज्याप्रमाणें एका बाळकापासूनच त्यानें आपल्या शरीरांत कल्पिलेल्या राक्षसाचे उत्पत्ति-स्थिति-लय सदा होतात त्याप्रमाणें मजपासून विश्वाचे उत्पत्ति-स्थिति-लय सर्वदा होतात ४९५. ( जड प्रपंचांत अखंड चित्चें भेदानें भान कसें होतें त्याविषयीं दृष्टान्त— ) ' यथा एकस्मिन् एव नभसि सर्वभेद-विवर्जिते भेदाः प्रतीयन्ते तथा मयि इमे भेदाः प्रतीयन्ते-' ज्याप्रमाणें एकाच सर्वभेदरहित आकाशांत भेद प्रतीत होतात त्याप्रमाणें माझ्या ठिकाणीं हे सर्व अनेक जीवरूप भेद प्रतीत होतात ४९६. ( हे भेदही जे बाह्यदृष्टि असतात-बहिर्मुख होऊन उपाधींना पाहतात त्यांनाच भासतात. अन्तर्मुखांना—उपाधीची उपेक्षा करून प्रत्यग्दृष्टि झालेल्यांना भासत नाहींत, असें सुचविण्यासाठीं आणखीं एक दृष्टान्त— ) ' यथा पटे समे चित्रदृष्टौ विषमधीः भवेत् एवं मयि समे प्राणे विश्वदृष्टौ विभेदधीः भवति-' ज्याप्रमाणें चित्राचा आधार असा पट उंच, सखल इत्यादि भेदांनीं हीन—सम असतो तथापि त्यावर रंगांनीं काढलेल्या चित्रांना पाहूं लागलें असतां उंच—सखल इत्यादि विषमबुद्धि होते त्याप्रमाणें मी प्राण जरी सम आहें तरी विश्वाला—उपाधीला पाहूं लागलें असतां माझ्या ठिकाणीं विभेदबुद्धि होते. ( पण चित्राची उपेक्षा करून वस्त्राकडे वृत्ति लावली असतां वस्त्राच्या ठिकाणची विषमदृष्टि जशी जाते त्याप्रमाणें विश्वाची उपेक्षा करून मजकडे वृत्ति लाविली असतां विश्वदृष्टि

नष्ट होते ) ४९७. ( नाभिस्थानीय आत्म्याचीं जीं प्राणादि विशेषणें वरील श्रुतींत आहेत त्यांचा अर्थ सांगतात– )

चतुर्विधानां भूतानां जीवनं मत्त एव हि ॥ तेनाऽप्राणोऽप्यहं प्राणशब्दबुद्धिसमाश्रयः ॥ ४९८ ॥ न प्राणेन नापानेन मर्त्यो जीवति कश्चन॥ प्रज्ञयैव तु जीवन्ति यस्यामेतावुपाश्रितौ ॥ ४९९ ॥ ज्ञानकर्मेन्द्रियगणं सांतःकरणदेहकम् ॥ प्रजानाम्यात्मरूपः सन्प्रज्ञा तेनाहमीरितः ॥ ५०० ॥ मज्ज्ञप्तौ सकलं विश्वं भाति नान्येन हेतुना ॥ तेन प्रज्ञेति नामाहमुदितो वेदवादिभिः ॥ ५०१ ॥ देशकालस्वरूपाख्यभेदत्रयविवर्जनात् ॥ स्वप्रकाशस्वभावाच्च प्रज्ञाहं वा प्रतर्दन ॥ ५०२ ॥ अथवा ज्ञानतो भिन्ना अध्यासानां समाश्रयाः ॥ रज्ज्वादयस्तथा नाहं तेन प्रज्ञेति कीर्तितः ॥५०३॥ स्वसजातिविजातीयवर्जितात्मस्वरूपया ॥ प्रज्ञया नित्ययुक्तत्वात्प्राणः प्राज्ञोऽहमीरितः ॥

अर्थ—' चतुर्विधानां भूतानां जीवनं मत्तः एव हि। तेन अप्राणः अपि अहं प्राणशब्दबुद्धिसमाश्रयः'- चार प्रकारच्या भूतांचें जीवन–जीवनाचें निमित्त मी आहें, माझ्यामुळेंच त्यांचें जीवन होतें. त्याकारणानें मी जरी अप्राण–वायुविशेषात्मक जड प्राणाहून विलक्षण–चिद्रूप आहें, तरी ' प्राण ' हा शब्द व ' प्राण ' असा प्रत्यय यांचा आश्रय–विषय आहें. ( ' जो ' प्राणयति ' जिवंत करतो, जिवंत ठेवतो तो प्राण ' अशा व्युत्पत्तीनें चिद्रूप आत्म्याला प्राण म्हणतां येतें ) ४९८. ( पण चिद्रूप आत्मा जीवनाचा हेतु–जीवननिमित्त कसा ? ही शंका तैत्तिरीय श्रुतीच्या आधारानें घालवितात– ) ' कश्चन मर्त्यः न प्राणेन न अपानेन जीवति । प्रज्ञया एव तु जीवन्ति यस्यां एतौ उपाश्रितौ-' कोणताही मनुष्य-प्राणी प्राणानें व अपानानें जिवंत रहात नाहीं. तर प्रज्ञेनेंच–नित्य चिद्रूप आत्म्यामुळेंच सर्व जिवंत राहतात. ज्या प्रज्ञेमध्यें हे दोघे–प्राण, अपान ' उपाश्रितौ-' केवळ सांनिध्यानेंच प्रवर्तित होतात. ४९९. ( ' प्रज्ञा ' या विशेषणाचा अर्थ– ) ' आत्मरूपः सन् सान्तःकरणदेहकं ज्ञानकर्मेंद्रियगणं प्रजानामि । तेन अहं प्रज्ञा ईरितः-' मी

आत्मरूप होऊन अन्तःकरण व देह यांसह ज्ञानकर्मेन्द्रियगणाला जाणतों. त्यामुळें मी 'प्रज्ञा' म्हटलेला आहे. (सर्वांमध्यें अधिक ज्ञानाला प्रज्ञा म्हणतात. सर्वाला प्रकाशित करणें हेंच ज्ञानाचें सर्वाधिक्य आहे. तें साक्षिरूपानें—आत्मरूपानें सर्वाला प्रकाशित करणाऱ्या माझ्या ठिकाणीं आहे. त्या कारणानें मी प्रज्ञा आहें. ) ५००. ('प्रज्ञा' या शब्दांतील 'प्र' या उपसर्गाचा सर्वोपजीव्यत्वरूप प्रकर्ष हा अर्थ मानून दुसरा अर्थ सांगतात— ) 'मज्ज्ञप्तौ सकलं विश्वं भाति । अन्येन हेतुना न । तेन वेदवादिभिः 'प्रज्ञा' इति नाम्ना अहं उदितः अस्मि-' माझें ज्ञान विद्यमान् असल्यावरच सर्व विश्व भासतें. अन्य प्रकाशानें तें भासत नाहीं. त्यामुळें वेदवेत्त्यांकडून मी 'प्रज्ञा' या नांवानें बोलला गेलों आहे ५०१. ( अपरिच्छिन्नत्व किंवा स्वप्रकाशत्वरूप प्रकर्ष हा 'प्र' शब्दाचा अर्थ मानून प्रज्ञाशब्दाचा आणखीं एक अर्थ— ) 'प्रतर्दन अथवा देशकालस्वरूपाद्यभेदत्रयविवर्जनात् स्वप्रकाशस्वभावात् च अहं प्रज्ञा-' हे प्रतर्दना ! किंवा देशपरिच्छेद, कालपरिच्छेद व वस्तुपरिच्छेद या तीन परिच्छेदांनीं रहित असल्यामुळें व स्वप्रकाशस्वभावामुळें मी प्रज्ञा आहें ५०२. ( लौकिक जड अधिष्ठानाहून वैलक्षण्य, एतद्रूप प्रकर्ष हाच 'प्र' शब्दाचा अर्थ मानून प्रज्ञाशब्दाचा आणखी एक अर्थ सांगतात— ) 'अथवा अध्यासानां समाश्रयाः रज्ज्वादयः ज्ञानतः भिन्नाः अहं तथा न । तेन 'प्रज्ञा' इति कीर्तितः-' किंवा सर्पादि अध्यासांचे आधार रज्ज्वादि पदार्थ बहिःस्वरूप विषय असतात. त्यामुळें ते ज्ञानाहून भिन्न—जड—अचेतन असतात. मी जरी अधिष्ठान असलों तरी तसा विषय—जड नाहीं, तर विषयी—चेतन आहें. त्यामुळें मी 'प्रज्ञा' असें बोललों गेलों आहें ५०३. ( आतां प्राज्ञ असा पाठ घेऊन त्याचा अर्थ— ) 'स्वसजातिविजातीयवर्जितात्मस्वरूपया प्रज्ञया नित्ययुक्तत्वात् अहं प्राणः प्राज्ञः ईरितः-' स्वगत-सजाति-विजातिभेदरहित आत्म्याच्या स्वरूपभूत प्रज्ञेनें नित्य युक्त असल्यामुळें मी प्राण प्राज्ञ असें म्हटला गेलों आहें ५०४.

योऽयं प्राज्ञो मया तुभ्यं कथितो ह्यसक्तपुमान् ॥
प्राणः प्राज्ञः स आत्मा ते स्थावरस्य चरस्य च ॥ ५०५ ॥

अस्मद्धीशब्दगम्योऽयमस्मद्धीशब्दवर्जितः एक ॥ एव जगत्य-स्मिन्नभोवद्भेदवर्जितः ॥ ५०६ ॥ नभसो नभ इत्येव नाना-धिकरणेष्वपि ॥ एकं नाम यथा तद्वदात्मेत्येकं ममात्मनः ॥ ५०७ ॥ स्वप्ने यथा हि बहवः सुखदुःखादिभागिनः ॥ आत्मानस्तद्वदेवेमे न भिन्ना वस्तुतः क्वचित् ॥ ५०८ ॥ एक एव यथा स्वप्ने नानादेहात्मतां व्रजेत् ॥ प्रतर्दन तथै-कोऽहं त्वमन्येऽपि च जन्तवः ॥ ५०९ ॥

**अर्थ**—( आतां पुढील पांच श्लोकांनीं श्रुतींतील आत्म-शब्दाचा अर्थ सांगतात— ) ' यः अयं प्राज्ञः परः पुमान् मया तुभ्यं प्राणः प्राज्ञः असकृत् कथितः हि सः ते आत्मा च स्थावरस्य चरस्य-' जो हा नित्यप्रज्ञायोगामुळें प्राज्ञ पर पुरुष मी तुला प्राण प्राज्ञ म्हणून वारंवार सांगितला तो तुझा व स्थावर जंगमांचा आत्मा—वास्तव स्वरूप आहे ५०५. ( सर्वांच्या आंत असणें या अर्थानेंही हा आत्मशब्द रूढ झाला आहे, असें दाखवीत असतांना त्याला उद्देशून योजलेल्या एक-वचनाचाही अर्थ सांगतात— ) ' अयं अस्मद्धीशब्दगम्यः अस्मद्धीशब्द-वर्जितः एकः एव अस्मिन् जगति नभोवत् भेदवर्जितः-' हा ' अस्मत् ' म्ह० मी या बुद्धीनें व शब्दानें उपलक्षित होतो, पण उपलक्षणभूत ' अहं-' शब्द व बुद्धि यांनीं तो अगदीं रहित आहे. तो एकच आहे. तो या जगांत आकाशाप्रमाणें वास्तविक भेदरहित आहे ५०६. ' यथा नाना अधिकरणेषु अपि नभसः ' नभः ' इत्येव एकं नाम तद्वत् मम आत्मा इति एकं नाम-' ज्याप्रमाणें घट, मठ इत्यादि नाना अधिकरणां-मध्येंही आकाशाचें ' आकाश ' हेंच एक नाम असतें त्याप्रमाणें माझें—आत्म्याचें नाना अधिकरणांतही—अनेक शरीरांतही आत्मा असें एक नांव आहे ५०७. ( आत्मतत्त्व जर एक आहे तर ते अनेक प्रकारचें कसें भासतें ? उत्तर— ) ' यथा हि स्वप्ने सुखदुःखादिभागिनः आत्मानः —प्रमातारः एकेन कल्पिताः तद्वदेव इमे वस्तुतः क्वचित् न भिन्नाः-' ज्या-प्रमाणें स्वप्नांत सुखदुःखादि भोगणारे आत्मे—प्रमाते—जीव एकानेंच दोषामुळें कल्पिलेले असतात त्याप्रमाणेंच हे जागृतींत भासणारे आत्मे

—प्रमाते—जीव कल्पित आहेत. त्यामुळें ते वस्तुतः भिन्न नाहींत ५०८. ( म्हणजे— ) 'यथा स्वप्ने एकः एव नाना देहात्मतां व्रजेत् तथा हे प्रतर्दन अहं त्वं अन्ये अपि जन्तवः एकः एव-' ज्याप्रमाणें स्वप्नांत एकच आत्मा नाना देहांतील आत्मा होतो म्ह० स्वप्नांतही देहच कल्पित असतात व त्यांचा आत्मा पूर्वींचाच असतो त्याप्रमाणें हे प्रतर्दना! मी, तूं व अन्य प्राणीही एकच आत्मा आहे. म्ह० त्यांचे देह कल्पित आहेत. आत्मा तोच एक पूर्वसिद्ध आहे ५०९. ( आतां श्रुतींतील आनंद या पदाचा अर्थ चार श्लोकांनीं सांगतात— )

अनुकूलस्वभावोऽहं सर्वप्रियतमत्वतः॥ आत्मार्थं सर्व एवायं जन्तुरिच्छति सर्वदा॥ सुखादिकं तदर्थं न स्वात्मानं कर्हिचित्क्वचित् ॥५१०॥नन्दः सुखं समाख्यातं मदुक्तोक्तिसमाप्तिकृत्॥आनन्दात्मा ततोऽहं हि निःसीमसुखरूपभृत् ॥५११॥ प्रजापतेः शतं ये स्युरानन्दाः शतवत्सरम् ॥ आनन्दवारिधेस्तेऽपि मम स्युर्हि कणोपमाः ॥ ५१२ ॥ सुखानि ये प्रयच्छन्ति शब्दस्पर्शरसादयः ॥ तेऽपि मामेव मत्प्राप्तिप्रकटीकृतमीश्वरम् ॥५१३॥ यथा समुद्रजो वायुः शीतदोऽत्र नृणां स्मृतः ॥ एवं मत्स्पर्शिनस्तेऽपि विषयाः सुखदाः स्मृताः ॥ ५१४ ॥

अर्थ—'सर्व प्रियतमत्वतः अहं अनुकूलस्वभावः-' सर्वांना अतिशय प्रिय असल्यामुळें मी केवल अनुकूलस्वभाव आहें. मी कोणालाही केव्हांही प्रतिकूल नाहीं. सर्वांना अत्यंत अनुकूल आहें. ( व्यवहारांत विषय प्रिय असतात, त्यांपासून होणारें सुख 'प्रियतर-' अधिक प्रिय असतें, व आत्मा सर्व विषय व विषयजन्य सुख यांचा शेषी—अंगी—प्रधान असल्यामुळें प्रियतम आहे. यास्तव तो आनंद आहे. आत्मा सर्वांचा शेषी आहे, हेंच स्पष्ट करितात— ) 'सर्वः एव अयं जन्तुः सुखादिकं यत् इच्छति तत् सर्वदा आत्मार्थं एव । तदर्थं कर्हिचित् क्वचित् स्वात्मानं न इच्छति-' हा सर्व प्राणी—सर्व प्राणिसमूह सुखादिक जें इच्छितो तें स्वतःसाठींच इच्छितो. ( दुसऱ्यासाठीं केव्हांही इच्छित नाहीं. आपल्याला अभिमत असलेलें सुख आपल्या वैऱ्याला व्हावें, अशी त्याची

केव्हांही इच्छा नसते. ) त्या सुखादिकांसाठीं स्वात्म्याची केव्हांही व कोणत्याही अवस्थेंत तो इच्छा करीत नाहीं. ( अर्थात् सुखादिकही आत्म्यासाठीं हवींशीं वाटत असल्यामुळें आत्मा सर्वांचा शेषी–अंगी आहे, ही गोष्ट सिद्ध झाली ) ५१०. ( या सृष्टींत सर्व बाजूंनीं विषयांपासून प्राप्त होणारें जें सुख त्याची पराकाष्ठा हाच परम आनंद आहे, अशा अभिप्रायानें सांगतात-- ) ' नंदः सुखं समाख्यातम् । मदुक्तोक्तिसमाप्तिकृत् । ततः अहं निःसीमसुखरूपभृत् आनंदात्मा हि-' नंदालाच सुख असें म्हटलें आहे. मीं–ईश्वरानें निःश्वासाप्रमाणें अनायासानें सांगितलेला जो वेद त्याच्या मानुषानंदादिकांचें प्रतिपादन करणाऱ्या ज्या उक्ति त्यांची समाप्ति करणारें–ज्या वेदाच्या उक्ति ज्यांत समाप्त होतात –असें सुख तोच आनंद होय. त्यामुळें मी निःसीमसुखरूप धारण करणारा आनंदात्माच आहें ५११. ( तैत्तिरीयोपनिषदांत मानुष, पितर, गंधर्व, कर्मदेव, जन्मतः सिद्ध देव, प्रजापति, हिरण्यगर्भ इत्यादिकांचे आनंद उत्तरोत्तर शतपट अधिक आहेत, असें सांगितलें आहे. (सार्थ तैत्तिरीयोपनिषद् पृ. ७८-८४ पहा. ) त्यांतील शेवटचे जे हिरण्यगर्भाचे आनंद तेही माझे लेश आहेत. मग इतरांची काय कथा ? असें सांगतात– ) ' प्रजापतेः ये शतवत्सरं शतं आनन्दाः स्युः ते अपि मम आनन्दवारिधेः कणोपमाः स्युः-' प्रजापतीचे जे शंभर वर्षें उपभोगिले जाणारे शतपट आनंद आहेत तेही मज आनंदसागराच्या कणासारखे आहेत ५१२. ( 'एष ह्येवानंदयाति ' या वाक्याचा ( सा. तै. उ. ७४ पृ. पहा) अर्थ याच्या हेतुत्वानें सुचवितात– ) ' ये शब्द-स्पर्श-रसादयः सुखानि प्रयच्छन्ति ते अपि मां एव मत्प्राप्तिप्रकटीकृतमीश्वरं प्रयच्छन्ति-' जे शब्द, स्पर्श, रसादिक विषय सुखें देतात तेही मलाच–वेदान्तवाक्यामुळें होणारी जी माझी प्राप्ति तिच्या योगानें प्रकट केलेल्या ईश्वरालाच देतात. ( म्ह० ज्यांना माझ्या स्वरूपाचा परिचय झालेला असतो ते सर्व सुखांमध्यें उपाधींचा परिहार करून माझीं सत्य-ज्ञानादि लक्षणेंच पाहतात. मूढांना माझ्या स्वरूपाचा परिचय नसतो. त्यामुळें ते उपाधींचींच सुखें आहेत, असें समजतात. ) ५१३ ( हाच अर्थ दृष्टान्तानें स्पष्ट करितात– ) ' यथा समुद्रजः वायुः अत्र नृणां शीतदः स्मृतः- ' ( वायूचा

स्पर्श 'अनुष्णाशीत' आहे. म्ह० तो अग्नीच्या स्पर्शासारखा उष्णही नाहीं व जलाच्या स्पर्शासारखा शीतही नाहीं, पण) त्याप्रमाणें समुद्राशीं संसर्ग पावून आपल्याकडे आलेला वायु भ्रान्त मनुष्यांना शीतद आहे, तो शीतस्पर्शवान् आहे, तो थंड आहे असें वाटतें, (पण वस्तुतः समुद्राच्या कणरूपानेंच तो शीतकर झालेला असतो) 'एवं मत्स्पर्शिनः ते अपि विषयाः सुखदाः स्मृताः-' त्याप्रमाणें 'अस्ति-भाति-प्रियरूप' अशा माझ्याशीं तादात्म्यलक्षण स्पर्शानें युक्त झालेले ते विषयही सुख देणारे आहेत असें मूढांनींच मानलेलें आहे. (पण त्यांतलाही सुखांश माझाच आहे.) ५१४. (पण इंद्रा, तूंच जर सुखरूप आहेस तर प्राण्यांना सर्वदाच सुखाचें भान कां होत नाहीं व विषयच सुख देणारे आहेत, असा लोकांना भ्रम होण्याचें काय कारण आहे? या दोन शंकांचें पांच श्लोकांनीं निरसन करितात— )

सुखैकरूपः सर्वेषां बुद्धिसाक्षी महेश्वरः ॥ प्रज्ञा प्राणोऽहमेतस्य यदाऽज्ञानं नृणां भवेत् ॥ ५१५ ॥ तदावृतात्मरूपास्ते जन्तवो विषयार्थिनः ॥ आप्नुवन्ति महद्दुःखं तत्त्वं वेत्सि प्रतर्दन ॥ ५१६ ॥ विषयप्राप्तितस्तेषां दुःखमेतद्विनश्यति ॥ विनष्टदुःखा धिषणा क्षणं भवति निश्चला ॥ ५१७ ॥ यावन्न जायते जन्तोरिच्छा दुःखकरी परा ॥ तावद्बुद्धिर्मयानंदरूपेणात्मस्वरूपिणा ॥ व्याप्ता सुखैकरूपेव भाति बाह्यार्थनिःस्पृहा ॥ ५१८ ॥ अयःपिण्डो यथा वह्निव्याप्तो भाति हि तादृशः ॥ प्रतर्दन तथा बुद्धिर्मया व्याप्ता सुखं भवेत् ॥ ५१९ ॥

**अर्थ**—'सर्वेषां बुद्धिसाक्षी महेश्वरः सुखैकरूपः प्रज्ञा प्राणः अहं अस्मि-' सर्व जीवांच्या बुद्धिवृत्तींचा साक्षी, महान् ईश्वर, केवल सुखरूप प्रज्ञा प्राण मी आहें. 'नृणां यदा एतस्य अज्ञानं भवेत् तदा आवृतात्मरूपाः ते जन्तवः विषयार्थिनः सन्तः महत् दुःखं आप्नुवन्ति-' पण मनुष्यांना—जीवांना जेव्हां याचें अज्ञान होतें तेव्हां—त्या आत्म्याच्या अज्ञानकालीं ज्यांचें आत्मरूप अज्ञानांतील तमानें आच्छादित झालें आहे असे ते जीव विषयांची इच्छा करणारे होत्साते मोठ्या

दुःखाला प्राप्त होतात. हे प्रतर्दन, ‘ तत् त्वं वेत्सि-’ त्या दुःखाचें तुला स्मरण आहेच ५१६. ‘ विषयप्राप्तितः तेषां एतत् दुःखं विनश्यति-’ ( पुण्यकर्मांच्या परिपाकामुळें ) इष्ट विषयांची प्राप्ति झाल्या-कारणानें त्या जीवाचें हें—इच्छारूपानें परिणत झालेलें रजोरूप दुःख विनाश पावतें. ‘ धिषणा विनष्टदुःखा क्षणं निश्चला भवति-’ तेव्हां बुद्धि दुःखरहित होऊन—जिच्यांतील दुःख—रज शांत झालें आहे अशी होऊन एक क्षणभर निश्चल होते. म्ह० तिच्यामध्यें सत्त्वगुणाचा उदय होतो, व त्यामुळें ती निश्चल होते ५१७. नंतर ‘ यावत् जन्तोः दुःख-करी परा इच्छा न जायते-’ जोंवर प्राण्याला दुःख देणारी—त्याच्या दुःखाची वृद्धि करणारी दुसरी इच्छा होत नाहीं ‘ तावत् मया आनन्द-रूपेण आत्मस्वरूपिणा व्याप्ता अत एव बाह्यार्थनिःस्पृहा बुद्धिः सुखैक-रूपा इव भाति-’ तोंवर आनंदरूप—आत्मस्वरूप अशा मजकडून व्याप्त झालेली [ म्ह० सूर्य आरशांत प्रतिबिंबरूपानें जसा प्रविष्ट होतो त्याप्रमाणें मी जिच्यामध्यें प्रविष्ट झालों आहें अशी ] व त्यामुळेंच बाह्य विषयांविषयीं निःस्पृह झालेली बुद्धि केवल सुखरूप असल्यासारखी भासते ५१८. ( सुखाच्या व्याप्तीमुळें सुखरूपाचा लाभ कसा होतो त्याविषयीं दृष्टान्त— ) ‘ यथा वह्निव्याप्तः अयःपिण्डः तादृशः भाति हि तथा हे प्रतर्दन मया व्याप्ता बुद्धिः सुखं भवेत्-’ ज्याप्रमाणें अग्नीनें व्यापलेला लोखंडाचा गोळा अग्नीसारखा होतो त्याप्रमाणें हे प्रतर्दना, मीं व्यापलेली बुद्धि सुखरूप होते. ५१९. ( ‘अहो पण अशाप्रकारच्या बुद्धीच्या अवस्थेलाच जर लौकिक सुख म्हटलें तर त्या सुखांत कांहींच विशेष नाहीं, असें होईल. सर्व सुख एकप्रकारचेंच होईल,’ अशी शंका घेऊन तिचें समाधान— )

समुद्रान्तःस्थितो राजन्सछिद्रः सर्षपो यथा ॥
स्वप्रमाणेन गृह्णाति नीरं नैवाधिकं क्वचित् ॥ ५२० ॥
एवं विषयजा बुद्धिर्मय्यनन्तसुखोदधौ ॥
पतिता मां हि गृह्णाति स्वसमानं सुखप्रदम् ॥ ५२१ ॥

अर्थ— ‘ हे राजन् यथा समुद्रान्तःस्थितः सछिद्रः सर्षपः स्व-

प्रमाणेन नीरं गृह्णाति । क्वचित् अधिकं नैव-' हे राजा, ज्याप्रमाणें समुद्राच्या आंत स्थित असलेलाही छिद्रयुक्त सर्षप-मोहरीचा दाणा आपल्या प्रमाणाप्रमाणें पाण्याचें ग्रहण करतो, आपल्या प्रमाणाहून अधिक पाणी घेत नाहीं, ( समुद्रांत पाणी जरी हवें तितकें-पुष्कळ-विपुल असलें तरी त्यांत टाकलेला पदार्थ आपल्या सामर्थ्याप्रमाणेंच त्यांतील पाणी आपल्या उदरांत जसा सांठवितो ) ' एवं मयि अनन्तसुखोदधौ पतिता विषयजा बुद्धिः स्वसमानं मां सुखप्रदं गृह्णाति-' त्याप्रमाणें अनंत सुखाचा समुद्र अशा मजमध्यें पडलेली विषयजन्य बुद्धि आपल्या स्वरूपानुसार तिच्यामध्यें स्थित असलेल्या सत्त्वगुणाच्या तारतम्याप्रमाणें सुखप्रद-सुख देणाऱ्या अशा माझें ग्रहण करिते. ( आरशाची स्वच्छता जशी न्यूनाधिक असेल त्याप्रमाणें त्यांत पदार्थाचें प्रतिबिंब न्यूनाधिक स्पष्ट उमटतें, त्याप्रमाणेंच हें समजावें. ) ५२१. ( सर्व लौकिक सुखांनीं इच्छेची शांति झाल्यानेंच अभिव्यक्त होणें व एका विषयाविषयींची इच्छा शांत झाली तरी लागलीच दुसऱ्या विषयाची इच्छा होत असल्यामुळें, इच्छाशांतीमुळें होणारें सुख टिकावू नसून क्षणिक व त्यामुळेंच अनित्य असणें, हें सर्व सुखांना एकसारखेंच लागू आहे, असें सांगतात- )

सुखं क्षुतादिजेऽप्येवमंगजाड्यादिमोचने ॥
तत्रापीच्छानुमातव्या तद्बोधेऽस्ति स्फुटा हि सा ॥ ५२१ ॥
एवं सर्वशरीरेषु सुखदोऽहं न चापरः ॥
आनंदात्मा त्वमेवैष प्रतर्दन न संशयः ॥ ५२२ ॥

अर्थ—' क्षुतादिजे अपि सुखे एवं-' क्षुत म्ह० शिंक येणें, इत्यादिकांपासून होणाऱ्या सुखालाही हाच न्याय लागू आहे. [ म्ह० तेंही सुख इच्छेची शांति होणें, दुसऱ्या इच्छेनें तें प्रतिबद्ध होणें म्ह० क्षणभंगुर असणें इत्यादि इतर सुखासारखेंच आहे. अहो पण शिंकेच्या योगानें आपल्याला सुख व्हावें, अशी इच्छा कोणाला होत नाहीं, म्हणून म्हणाल तर सांगतों— ] ' तत्र अपि अंगजाड्यादिमोचने इच्छा अनुमातव्या-' शिंकेपासून जेव्हां सुख होतें तेव्हांही ' माझ्या अंगाचा जडपणा जाऊं दे ' अशा प्रकारची इच्छा असते असें शिंकेपासून जें सुख

होतें, त्या कार्यावरून अनुमान करावें. (शिवाय त्या इच्छेविषयीं साक्षि-प्रत्यक्ष हें प्रमाणही आहे, असें दाखवितात— ) 'सा तद्बोधे स्फुटा हि अस्ति-' शिंक याची अशी इच्छा शिंकेचा रोध झाला असतां—नाक चोंदलें असतां वगैरे स्पष्टपणें अनुभवास येते. ( शिंक यावी म्हणून आपण नाकांत काडयाही घालतों किंवा तपकीर वगैरे ओढतों. ) ५२२. ( या सर्व विचाराचें फलित सांगतात— ) 'एवं सर्वशरीरेषु अहं सुखदः न च अपरः-' याप्रमाणें म्ह० इच्छेची शांति झाली असतां अभिव्यक्त होणें, या प्रकारें सर्व शरीरांमध्यें मी सुख देणारा आहें. दुसरा कोणी नाहीं. 'हे प्रतर्दन एषः आनन्दात्मा त्वं एव असि न संशयः-' हे प्रतर्दना, हा आनंदात्मा तूंच आहेस, ( सुख देणारा जो मी तेंच तुझें स्वरूप आहे, ) यांत कांहीं संशय नाहीं ५२३. ( आतां श्रुतींतील अजर व अमृत या विशेषणांचें व्याख्यान करितात— )

**एवंभूतस्य नैवास्ति तव देहः कथंचन ॥**

**तदभावात्कथं तस्य धर्मौ स्यातां जरामृती ॥ ५२४ ॥**

**अर्थ**—'एवंभूतस्य तव देहः कथंचन नास्ति एव-' परिपूर्ण आनंद-स्वरूपाला जाणणाऱ्या तुझा देह कोणत्याही प्रकारें नाहींच [ तुला मर्यादित करणारा देह नाहीं. कारण देहच मी असा अभ्यास करविणारी जी अविद्या तिचा वरील ज्ञानानें अभाव झालेला असतो. ] 'तदभा-वात् तस्य धर्मौ जरामृती कथं स्याताम्-' त्या देहाच्या अभावीं त्याचे धर्म—जरा व मरण तुला कसे असणार ? ( त्यांचा तुझ्या ठिकाणीं संभवच नाहीं. ) ५२४.

[ श्रुतिः—" न साधुना कर्मणा भूयान्नो एवासाधुना कनीयान् । " 'साधुना-' शास्त्रविहित पुण्यरूप 'कर्मणा-' कर्मानें 'न भूयान्-' तो अधिक होत नाहीं 'असाधुना-' शास्त्रनिषिद्ध कर्मानें—पापानें 'कनी-यान् नो एव-' तो कनिष्ठ—न्यून होतच नाहीं. कारण ज्याच्या ठिकाणीं क्रिया असते त्याच्याच ठिकाणीं न्यूनाधिक भाव संभवतो. आकाशा-सारख्या अक्रिय पदार्थामध्यें कोणताच अतिशय संभवत नाहीं. ]

**न च ते बुद्धिरप्यस्ति तस्याः साक्षिस्वरूपिणः ॥ तदभावा-त्कथं स्यातामकर्तुः पुण्यपातके ॥ ५२५ ॥ तयोरभावे केन**

त्वमिहामुत्र फलोपभाक् ॥ आधिक्यन्यूनताभ्यां स्त ऐश्वर्यस्य हि सर्वदा ॥ ५२६ ॥ फलोपभोगिनो नित्यं वृद्धिह्रासौ प्रतर्दन ॥ अभोक्तुस्तव केनैतौ स्यातां राजन्नकारणौ ॥ ५२७ ॥

अर्थ—' तस्याः साक्षिस्वरूपिणः ते बुद्धिः अपि न अस्ति-' बुद्धीचा साक्षी असा जो तूं त्या तुझी बुद्धिही नाहीं. ( कारण तूं साक्षी आहेस व बुद्धि तुझा विषय आहे. त्यामुळें तूं बुद्धीहून अगदीं विलक्षण आहेस. तेव्हां वस्तुतः ती तुझी कशी होणार ? ) अर्थात् ' तदभावात् अकर्तुः पुण्यपातके कथं स्याताम्-' त्या बुद्धीचाच अभाव असल्यामुळें अकर्ता असलेल्या तुला पुण्यपाप कसें लागणार ? ५२५. ' तयोः अभावे त्वं इह अमुत्र वा केन फलोपभाक्-' त्या पुण्यपापांच्या अभावीं तूं या लोकीं किंवा परलोकीं कोणत्या हेतूनें फलोपभोक्ता होणार ? ' हे प्रतर्दन फलोपभोगिनः एव ऐश्वर्यस्य आधिक्यन्यूनताभ्यां नित्यं वृद्धिह्रासौ स्तः-' हे प्रतर्दना, फलाचा उपभोग घेणाऱ्याच्याच ऐश्वर्याचें आधिक्य व न्यूनता यांच्या योगानें नेहमीं वृद्धि व क्षय होतात, पण ' हे राजन् अभोक्तुः तव केन हेतुना एतौ स्याताम्-' हे राजा, भोक्ताच नसलेल्या तुझे-वृद्धिक्षय कोणत्या कारणानें होणार ? कारण ' अकारणौ-' त्यांना कांहीं कारणच नाहीं व कारणावांचून कार्य होणें शक्य नाहीं. ( अर्थात् साक्षिस्वरूप आत्म्याच्या बुद्धीचा अभाव आहे. बुद्धीच्या अभावीं अकर्ता जो आत्मा त्याच्या हातून पुण्यपाप होण्याचा संभव नाहीं. पुण्यपापांच्या अभावीं त्याला फलभोक्तृत्वही नाहीं. फलभोक्तृत्वाच्या अभावीं ऐश्वर्याच्या न्यूनाधिकतेमुळें होणारे जे वृद्धि-क्षय ते होत नाहींत, असा भावार्थ. )

[ श्रुतिः—" एष ह्येवैनं साधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्य उन्निनीषत एष उ एवैनमसाधु कर्म कारयति तं यमधो निनीषते । " ' हि-' ज्या अर्थी ' एषः एव-' हा प्राणप्रज्ञोपाधिकच, दुसरा कोणी नाहीं, ' एनं-' शरीरादिकांना आत्मा मानणाऱ्या याच्याकडूनच ' साधु कर्म-' शास्त्रविहित धर्मरूप कर्म ' कारयति-' करवितो, शरीरांत ज्याचा आवेश झाला आहे असा तो स्वतः जरी लोहचुंबकाप्रमाणें व्यापारशून्य असला तरी शरीरावर आत्मत्वाभिमान ठेवणाऱ्या त्याच्याकडून व्यापार करवितो. ( कोणाकडून ? ) ' तं-' त्याच्याकडून कीं, ' यं-' ज्या

स्वर्गाची इच्छा करणाऱ्या प्रसिद्ध कर्मठ सकाम पुरुषाला 'एभ्यः लोकेभ्यः-' या प्रत्यक्ष इहलोकांहून 'उन्निनीषते-' ऊर्ध्व—वर नेण्याची इच्छा करतो. 'एषः उ एव-' हा पूर्वोक्त प्राणप्रज्ञोपाधिकच 'एनं-' या शरीरादिकांना आत्मा मानणाऱ्या पुरुशाकडून 'असाधु कर्म' शास्त्र-निषिद्ध कर्म—पातक करवितो, त्याची इच्छा नसली तरी त्याच्या हातुन करवितो. ( कोणाकडून ? ) 'तं-' त्याच्याकडून कीं 'यं-' ज्या पातक्याला 'एभ्यः लोकेभ्यः-' या इहलोकांहून—मनुष्यादिकांच्या निवास स्थानांहून 'अधः-' खालीं 'निनीषते-' नेण्याची इच्छा करतो. ]

सर्वसाक्षी मया यस्त्वं मद्रूप इह कीर्तितः ॥ स त्वं कर्मपराधीनो नासि क्वापि कथंचन ॥ कारयस्येव बुद्ध्यादीन् किंतु त्वं पुण्यपातके ॥ ५२८ ॥ पुण्यं तं कारयस्येष यं स्वर्गं नेतु-मिच्छसि ॥ पातकं चाधिकं तं यं नरकं नेतुमिच्छसि ॥ ५२९ ॥ पुण्यपापे च तद्बुद्धिं कारयस्यपि देहिनम् ॥ तं यं मानुषलोकं त्वं नेतुमिच्छसि सर्वदृक् ॥ अतः कर्मपराधीनः कथं भवासि मद्वपुः ॥ ५३० ॥

अर्थ—( वरील श्रुतीचें व्याख्यान या तीन श्लोकांनीं करितात— ) 'मया यः त्वं सर्वसाक्षी मद्रूपः इह कीर्तितः असि सः त्वं क्वापि कथंचन कर्मपराधीनः न असि-' मजकडून जो तूं सर्वसाक्षी—सर्वांचा अन्तर्यामी ब्रह्म मद्रूप [ म्ह० माझें जें अद्वयस्वरूप आहे तेंच तुझें आहे असा ] अशा प्रकारें या उपनिषदांत वर्णन केला गेला आहेस तो तूं कोठेंही, केव्हांही व कोणत्याही प्रकारें कर्मपराधीन नाहींस. 'किंतु त्वं बुद्ध्यादीन् पुण्यपातके कारयसि एव-' तर बुद्ध्यादिकांकडून पुण्य व पाप करवितोसच. म्ह० पुण्य-पाप करणाऱ्या त्यांना केवळ स्वसांनि-ध्यानें प्रेरणा करतोस, तें करण्याचें सामर्थ्य देतोस ५२८. ( आतां त्यांतील पुण्य कोणाकडून करवितोस व पाप कोणाकडून करवितोस तें सांगतों— ) 'एषः त्वं यं स्वर्गं नेतुं इच्छसि तं पुण्यं कारयसि-' हा तूं ईश्वर ज्याला स्वर्गाला नेण्याची इच्छा करतोस त्याच्याकडून पुण्य—साधु-कर्म—धर्म करवितोस, 'यं नरकं नेतुं इच्छसि तं अधिकं पातकं कार-

यसि-' ज्याला नरकास नेण्याची इच्छा तूं करतोस त्याच्याकडून अधिक पाप करवितोस ५२९. 'तद्वत् हि-' त्याप्रमाणेंच 'यं मानुषं लोकं नेतुं इच्छसि-' ज्याला तूं मानुष लोकास नेण्याची इच्छा करतोस 'तं देहिनं-' त्या देहाभिमान्याकडून तूं 'पुण्यपापे कारयसि-' पुण्य व पाप हीं दोन्ही करवितोस. ('तर मग ईश्वर सामान्य जीवाप्रमाणें राग-द्वेष-वान् आहे व विषम सृष्टि निर्माण करणाऱ्या त्याच्याकडे वैषम्य व दुःखी, जीवांना उत्पन्न करणाऱ्या त्याच्याकडे निर्दयता हे दोष येतात,' म्हणून म्हणशील तर तसें नाहीं. तर ) तो 'सर्वदृक्-' सर्वद्रष्टा आहे. [ म्हणजे 'पुण्यः पुण्येन भवति पापः पापेन' (बृ. भाष्यार्थ अ. ३ पृ. ५९पहा) या श्रुतीच्या अनुसार प्रत्येक जीवाच्या पूर्वकर्मानुसार तो त्याला पुण्य व पाप यांत प्रवृत्त करतो तो सर्वदृक् म्ह० सर्वज्ञ असल्यामुळें पूर्वकर्मांचाही द्रष्टा आहे, असा भावार्थ. ] 'अतः मद्रूपः त्वं कर्मपराधीनः कथं भवसि-' यास्तव मद्रूप असलेला तूं कर्मपराधीन कसा असशील? ५३०.

[ श्रुतिः—" एष लोकपालः-" ( प्राण्यांना त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार स्वर्गाला व नरकाला नेण्यासाठीं ईश्वरच त्यांच्याकडून साधु व असाधु कर्म करवितो, असें सांगितलें. पण तेंही या शरीरोपाधिरहित चिन्मात्र केवळ नियन्तृत्व या शक्तींत प्रविष्ट झालेल्या अन्तर्यामीच्या ठिकाणींच संभवतें, असें हें श्रुतिवाक्य सांगतें— ) 'एषः-' हा स्वर्ग व नरक यांत नेणारा 'लोकपालः-' साधूंचें सुखाच्या योगानें—सुख देऊन व असाधूंचें दुःखाच्या योगानें पालन करणारा—रक्षण करणारा आहे. ]

य एष त्वं मया प्रोक्तः साक्षी सर्वनियामकः ॥
एष एव जगत्पासि मातृवद्दीनवत्सलः ॥ ५३१ ॥

**अर्थ**—'मया यः एषः त्वं साक्षी सर्वनियामकः प्रोक्तः एषः एव त्वं दीनवत्सलः मातृवत् जगत् पासि-' मजकडून जो हा तूं साक्षी सर्वनियामक म्हणून सांगितला गेला आहेस तो तूंच दीनवत्सल असल्यामुळें मातेप्रमाणें सर्व लोकांचें रक्षण करतोस ५३१.

[ श्रुतिः—" एष लोकाधिपतिः । एष सर्वेशः । " ( पण हा राजाच्या मंत्र्याप्रमाणें कदाचित् लोकपाल असेल, असें कोणाला वाटे

नये म्हणून श्रुति सांगते– ) ' एषः-' हा वर सांगितलेला लोकपाल ' लोकाधिपतिः-' लोकांचा पित्यादिकांप्रमाणें अधिष्ठाता होऊन पालन करणारा आहे. (तथापि 'एकाद्या राजाप्रमाणें याचें ऐश्वर्य संकुचित असेल' असें कोणी समजेल म्हणून श्रुति सांगते– ) 'एषः-' हा पूर्वोक्त लोकांचा अधिपति ' सर्वेशः-' सर्व भूत भौतिकांचा ईश–नियता आहे. ]

अधिष्ठाय तथा सर्वं स्वकीयत्वेन देवराट् ॥
स्वामीव विविधैर्भोगैः पासि सर्वानहर्निशम् ॥ ५३२ ॥
एष सर्वान्हि शूरादीन्मर्यादासेतुभेदकान् ॥
राजेव स्वबलेनैव नियच्छासि महेश्वरः ॥ ५३३ ॥

अर्थ—' तथा सर्वं जगत् स्वकीयत्वेन अधिष्ठाय त्वं सर्वान् अहर्निशं विविधैः भोगैः स्वामी इव पासि-' ( वरील श्रुत्यक्त दोन विशेषणांचें दोन श्लोकांनीं व्याख्यान– ) त्याचप्रमाणें सर्व जगाचा स्वकीयत्वानें अधिष्ठाता होऊन म्ह० हें सर्व जगत् माझें आहे, असा अभिमान धरून तूं सर्व जीवांना अहोरात्र नानाप्रकारच्या भोगांनीं एकाद्या लौकिक स्वामीप्रमाणें रक्षितोस. जसा व्यवहारांतील गृहस्थ आपल्या आप्त-बांधवांना नानाप्रकारच्या भोगांनीं तृप्त करतो त्याप्रमाणें तूं सर्वांना तृप्त करतोस. कारण तूं ' देवराट्-' अग्न्यादि देवांचा किंवा शम-दमादिसंपन्न दैवीसंपत्तियुक्त पुरुषांचा राजा आहेस ५३२. ' एष त्वं महेश्वरः मर्यादासेतुभेदकान् सर्वान् स्वबलेन एव राजा इव नियच्छसि-' हा तूं महेश्वर पुण्यवान् स्वर्गाला जावेत, पापी नरकाला जावेत, अशा प्रकाराची जी ईश्वरकृत मर्यादा तिचे जे सेतु–रक्षण करणारे वेद-ब्राह्मणादिक, त्यांचे विरोधी सर्व शूर, मायावी वगैरे, त्यांचें स्वसामर्थ्यानेंच एकाद्या राजाप्रमाणें नियमन करतोस. ( शेतांतील किंवा नदींतील पाणी आडविण्यासाठीं जे माती-लांकूड इत्यादिकांचे बांध घातलेले असतात त्यांना सेतु-धरण असें म्हणतात. त्यांना फोडून किंवा इतर कांहीं लोकमर्यादा तोडून प्रजेचें नुकसान करणाऱ्या–प्रजेला दुःखी करणाऱ्या दुष्टांना दंड करून राजा जसें त्यांचें नियमन करतो त्याप्रमाणें तूं आत्मा महेश्वर वेद-ब्राह्मणादि मर्यादा पाळकांना पीडा देणाऱ्या दुष्टांचें त्यांना दंड करून नियमन करतोस. ५३३.

[ श्रुतिः—" स म आत्मेति विद्यात् । स म आत्मेति विद्यात् ॥ " ' सः-' तो वर सांगितलेला सर्वेशत्वादि गुणविशिष्ट 'मे-' माझा—इंद्राचा —या वक्त्याचा ' आत्मा-' स्वरूप आहे, ' इति विद्यात्-' असें जाणावें. ( अध्यायाची समाप्ति झाली हें सुचविण्यासाठीं ' स म आत्मेति विद्यात् ' या वाक्याची द्विरुक्ति केली आहे. )

इति ऋग्वेदान्तर्गत कौषीतकिब्राह्मणारण्यकोपनिषदाचा तिसरा अध्याय समाप्त.

---

समः सर्वेषु भूतेषु स्थावरेषु चरेषु च ॥
महाभूतोपमो देव आत्मा ते कथितो मया ॥
एवं मामात्मरूपेण विजानीहि प्रतर्दन ॥ ५३४ ॥

अर्थ—( वरील वाक्याचें व्याख्यान- ) ' मया सर्वेषु स्थावरेषु चरेषु च भूतेषु समः महाभूतोपमः देवः आत्मा ते कथितः-' मी सर्व स्थावर व चर भूतांमध्यें—चराचरांमध्यें सम व आकाशाची ज्याला उपमा आहे असा, स्वयंप्रकाश आत्मा तुला सांगितला. ' प्रतर्दन एवं मां आत्मरूपेण विजानीहि-' हे प्रतर्दना, याप्रमाणें मला तूं आत्मरूपानें जाण ५३४. ( असें हें निरूपण केल्यानें वराची पूर्ति झाली, असें दाखवितात- )

एतद्धिततमं मन्ये मनुष्याय न चापरम् ॥ एवं हिततमं प्राह ह्यात्मज्ञानं शतक्रतुः ॥ प्रतर्दनाय सर्वज्ञः सत्यपाशवशंगतः ॥ ५३५ ॥ प्रतर्दनोऽपि तं मत्त्वा शक्रतुल्यपराक्रमः ॥ अनुज्ञातोऽथ शक्रेण जगाम स्वपुरं प्रति ॥ ५३६ ॥ प्रारब्धकर्मनिर्वाणं कुर्वन्नानाविधां श्रियम् ॥ उपभुज्यास्य देहस्य पाते शक्रमवाप सः ॥ ५३७ ॥

अर्थ—'मनुष्याय च एतत् हिततमं मन्ये न च अपरं-' आणि मनुष्याला हेंच अतिशय हित आहे, असें मी समजतों, दुसरें नाहीं. ( आतां कथेचा अवशिष्ट भाग पूर्ण करितात- ) ' सर्वज्ञः शतक्रतुः सत्यपाशवशंगतः सन् प्रतर्दनाय एवं हिततमं आत्मज्ञानं प्राह-' सर्वज्ञ इंद्र सत्यरूपी पाशाच्या अधीन झालेला असा होत्साता— ' वरं ते ददानि-' मी तुला वर देतों, या

सत्यवचनाच्या अधीन होऊन प्रतर्दनाला याप्रमाणें अत्यंत हित असें आत्मज्ञान सांगता झाला ५३५. त्यानंतर ' शक्रतुल्यपराक्रमः प्रतर्दनः अपि तं मत्वा अथ शक्रेण अनुज्ञातः स्वपुरं प्रति जगाम-' इंद्रासारखाच ज्याचा पराक्रम आहे असा प्रतर्दन त्याला आत्मा मानून—इंद्रच माझा आत्मा आहे, असें जाणून इंद्रानें ज्याला अनुज्ञा दिली आहे असा तो आपल्या काशिनगरास परत गेला ५३६. आपल्या राजधानींत आल्यावर ' सः प्रारब्धकर्मनिर्वाणं कुर्वन् नानाविधां श्रियं उपभुज्य अस्य देहस्य पाते शक्रं अवाप-' तो प्रतर्दन प्रारब्ध कर्माची समाप्ति करणारा असा होत्साता—फलोपभोगानें प्रारब्ध कर्म क्षीण करण्यासाठीं नानाप्रकारच्या ऐश्वर्याचा उपभोग घेऊन या वर्तमान शरीराचा पात झाल्यावर इंद्राला—आत्म्याला—परमात्म्याला प्राप्त झाला. ( तो ब्रह्मभावास —विदेह मोक्षास प्राप्त झाला. ) ५३७. ( या ज्ञानाची दुर्लभता सांगतात—)

एवं हिततमं ज्ञानं महद्भिर्महतो वरात् ॥ महद्भ्यः प्राप्तमेत-त्तद्यदिदं कथितं तव ॥ ५३८ ॥ अस्याज्ञानद्धि गुरवः शिष्यतां प्राप्नुवन्ति हि ॥ गुरुत्वं हि यतो लोके गुरुज्ञानसमाश्रयात् ॥ ५३९ ॥ ज्ञानस्य गौरवं नास्मादपरस्य हि विद्यते॥ गुर्वीयं वसुधा तस्माद्दक्षिणास्य भवेन्न वा ॥ ५४० ॥ गुरुशब्दो हि लोके स्यादधिकार्थस्य वाचकः ॥ सर्वस्मादधिको ह्यात्मा तदीयं च ततो गुरुः ॥ ५४१ ॥

इतिश्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यानंदात्मपूज्यपादशिष्येण श्रीशंकरानंदभगवता विरचित उपनिषद्रत्न आत्मपुराणे कौषीतकिसारार्थप्रकाशे इंद्रप्रतर्दनाख्यानं नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

अर्थ—' एवं हिततमं ज्ञानं महद्भिः महतः वरात् महद्भ्यः प्राप्तं-' याप्रमाणें हें हिततम ज्ञान प्रतर्दनासारख्या मोठ्या अधिकाऱ्यांनीं मोठ्या वराच्या योगानें इंद्रादिकांसारख्या मोठमोठ्या गुरूंपासून संपादन केलें आहे. ( कोणतें ज्ञान? तर ) ' यत् इदं तव कथितं- ' जें हें मीं तुला सांगितलें ' तत् एतत्- ' तें हें ५३८. ( तें हिततम ज्ञान इंद्रासारख्यांपासून

प्रतर्दनासारख्यांस प्राप्त झालें आहे. आतां शिष्याची पुढील अध्यायांतील विषयांची जिज्ञासा उत्पन्न करणारे श्रीशंकरानन्द या आत्मज्ञानाच्या अभावीं मोठी हानि कशी होते तें दाखवितात-- ) 'अस्य अज्ञानात् हि गुरवः शिष्यतां प्राप्नुवन्ति हि-' या आत्मतत्त्वाच्या अज्ञानामुळेंच जे गुरु असतात ते शिष्यत्वास प्राप्त होतात. 'यतः लोके गुरुज्ञानसमाश्रयात् हि गुरुत्वं-' कारण व्यवहारांत श्रेष्ठ ज्ञानाचा उत्तम प्रकारें आश्रय केल्यामुळेंच मुख्य गुरुत्व प्राप्त होत असतें. ( त्यामुळें आत्मज्ञानी शिष्यही गुरुत्वास प्राप्त होतात. ) ५३९. ( ज्ञानालाच गुरुत्व कसें, तें सांगतात-- ) 'ज्ञानस्य यत् गौरवं तत् अस्य एव । अस्मात् अपरस्य न एव विद्यते-' ज्ञानाचें जें गुरुत्व--श्रेष्ठत्व तें याच ज्ञानाचें आहे. या ज्ञानाहून दुसऱ्या ज्ञानाला महत्त्व नाहीं. (म्हणूनच छांदोग्यश्रुतीनें या ज्ञानाच्या बरोबरीची दुसरी दक्षिणाच नाहीं, असें सांगितलें आहे, असें सांगतात-- ) 'इयं वसुधा गुर्वी । तस्मात् अस्य दक्षिणा भवेत्-' ही पृथ्वी गुर्वी आहे. ज्ञानही गुरु आहे. त्यामुळें ही पृथ्वी या ज्ञानाची दक्षिणा कदाचित् होण्याचा संभव आहे. पण वस्तुतः 'न वा भवेत्-' ती याची योग्य दक्षिणाच होऊं शकत नाहीं ५४०. 'गुरुशब्दः हि लोके अधिकस्य वाचकः स्यात्-' व्यवहारांत गुरुशब्द अधिक, मोठा या अर्थाचा वाचक आहे. ( परम महत्त्व परमात्म्यामध्येंच पर्यवसान पावलें आहे. त्यामुळें ) 'सर्वस्मात् अधिकः आत्मा-' सर्वांहून अधिक आत्मा आहे. 'ततः गुरुः-' त्यामुळें तो गुरु आहे. 'तदीयं च गुरु-' व त्याचें जें ज्ञान तेंही त्याच्या संबंधामुळेंच गुरु--महत्--श्रेष्ठ आहे. ५४१.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत--उपनिषद्रत्नाढ्य
आत्मपुराणाच्या कौषीतकिसारार्थप्रकाशनामक दुसऱ्या
अध्यायाचें--प्राकृत व्याख्यान समाप्त झालें.

श्रीकृष्णार्पणमस्तु

---

१ 'यद्यप्यस्मै इमामद्भिः परिगृहीतां धनस्य पूर्णां दद्यादेतदेव ततो भूय इति' जरी या ज्ञानदात्याला ही समुद्रपरिवेष्टित धनानें पूर्ण पृथ्वी दिली तरी हें ज्ञानच त्या समुद्रयुक्त पृथ्वीहून अधिक आहे. छान्दो-भाष्यार्थ पृ. १६० पहा.

